# प्रस्तावना.

आतां मराठी भाषेचा प्रवेश बी. ए. परीक्षेच्या ऐच्छिक विषयांत झालेला असल्यामुळें, खालीं, म्हणजे दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून भाषाविषयाचा अभ्यास विशेष काळजीपूर्वक व्हावयाला पाहिजे अशी स्थिति प्राप्त झाली आहे. त्यांतून दुय्यम शिक्षणाच्या अखेरीस जी परीक्षा होते त्या परीक्षेस स्वभाषा हा विषय नेमिलेला असून अर्वाचीन गद्यग्रंथ नेमण्याचा उपक्रम बोर्डानें ( The Joint Examination Board ) केल्यामुळें या पुस्तकासारखीं पुस्तकें, किंवा स्वतंत्र ग्रंथ, तयार होऊं लागलीं आहेत व व्हावयालाही पाहिजेत. अशाच हेतूनें कै. प्रि. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं हें पुस्तक तयार केलें होतें. गेल्या आक्टोबरच्या सुटीच्या आरंभींच पुस्तक तयार झालें होतें व सुटींत प्रस्तावना लिहिण्याचा वासुदेवरावांचा हेतु होता. सुटीच्या आरंभींच ते पुण्याबाहेर गेले व परत आले ते मरणोन्मुख अशा स्थितींतच आले. त्यांच्या मृत्यूमुळें पुस्तकाचें काम थोडेसें मागें पडलें. विशेष वाईट वाटण्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या प्रस्तावनेला आपण अंतरलों.

आमच्या शाळांतून मराठी भाषेचा—स्वभाषेचा—अभ्यास कसा व्हावा, मुलांनीं काय वाचावें, व तें कसें, हे प्रश्न फार महत्त्वाचे आहेत. वासुदेवरावांसारख्या अनुभवी शिक्षकाकडून व तेजस्वी लेखकाकडून या विषयावर जें लिहिलें गेलें असतें त्याची किंमत आज फार होती. अशा प्रस्तावनेच्या अभावीं त्यांनीं केलेल्या वेंच्यांवरूनच त्यांच्या मतांविषयीं अनुमानें आपल्याला बांधलीं पाहिजेत. मराठी ही

आपली भाषा आहे, ती जिवंत आहे, व वाढती आहे या गोष्टी लक्षांत घेऊनच तिचा अभ्यास झाला पाहिजे. दुसऱ्यांनीं काय लिहिलें, कसें लिहिलें, या गोष्टी जितक्या महत्त्वाच्या, तितक्याच किंबहुना त्याहू-नही थोड्याशा जास्तच महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे या भाषेंत—ही आपल्या रोजच्या व्यवहाराची भाषा म्हणून—आपले विचार मुद्देसूदपणानें, नीटनेटके व जोमदारपणानें व्यक्त करावयाला,—बोलावयाला व लिहा-वयाला-शिकणें हें प्रत्येक मराठ्याचें कर्तव्य आहे, असाच अभिप्राय कै. वासुदेवरावांनीं दिला असता असें मला वाटतें. आणि याच दृष्टीनें उताऱ्यांचा संग्रह या पुस्तकांत केला आहे. शेवटीं शिकणारे व शिक-विणारे या सर्वांनीं हाच उदात्त हेतु मनांत धरून हें पुस्तक वाचावें एवढी त्यांना विनंती करितों.

फर्ग्युसन कॉलेज-पुणें.
१२ फेब्रुवारी १९२२.

गणेश हरी केळकर.

# विषयानुक्रमणिका.

सदरहू उताऱ्यांचा उपयोग करण्याची परवानगी खालील सद्गृहस्थांनीं दिली आहे त्यांचीं नांवें.

| | |
|---|---|
| **१ राव. वि. मो. महाजनि.** | सृष्टिसुंदरीची दिवाळी |
| **२ रा. न. चिं. केळकर.** | ( मराठे व इंग्रज ) सुभाषित व विनोद |
| **३ रा. ल. रा. पांगारकर.** | मोरोपंतचरित्र |
| **४ रा. शि. म. परांजपे.** | काळ |
| **आर्यभूषण छापखान्याचे मालक** | ( कै. ह. ना. आपटे यांचे पुस्तकाबद्दल. ) |
| **रा. एम्. एस्. गोळे.** | ( कै. प्रि. गोळे यांचे पुस्तकाबद्दल. ) |
| **रा. यशवंत गोपाळ आगरकर.** | ( कै. प्रि. आगरकर यांच्या लेखाबद्दल. ) |
| **रा. शंकर गणेश गडकरी.** | कै. रा. ग. गडकरी यांच्या पुस्तकाबद्दल. |

**वरील सद्गृहस्थांचे प्रकाशक फार उतराई आहेत.**

# वाग्विहार



## भाग २

## हरी नारायण आपटे

("केवळ स्वराज्यासाठीं.")

### सांपळ्यांत सांपडलेला सिंह

सांपळ्यांत सांपडलेल्या सिंहाप्रमाणेंच संभाजीची हुबेहूब अवस्था झालेली होती. त्या शूर प्राण्याला सांपळ्यांत घालून अतोनात पिडलें, त्याची उपासमार करून त्याचीं अस्थिचर्में उरविलीं, तथापि त्याच्या डोळ्यांतील तेज जसें अणुरेणुमात्र कमी होत नाहीं; उलट अंतर्यामीं भडकत जाणाऱ्या संतापाग्नीनें जसें तें वाढतच जातें, त्या प्रमाणेंच हुबेहूब संभाजीची अवस्था झाली होती. त्या सिंहाला ज्याप्रमाणें अगदीं अनावर अशी अस्वस्थता उत्पन्न होते, त्याप्रमाणेंच संभाजीलाही झाली होती आणि तो आपल्या तंबूंत एकसारखा इकडून तिकडे तिकडून इकडे करीत होता. मध्येंच त्याला अगदीं स्वस्थ उभें राहून विचार करण्याची लहर येई. आणि ती लहर सुमारें पांच सात मिनिटें टिकते न टिकते तों पुनः कबजी-पाशीं जाऊन कांहीं तरी भडभड बोलण्याची लहर येई. या बोलण्यांत अर्थातच औरंगजेबास व मुसलमानी राज्यास आणि धर्मास अद्वातद्वा शिव्या असत. याप्रमाणें भडभड बोलण्याची लहर संपली कीं, लागलीच स्वारी पुनः अगदीं एकांतांत जाऊन, कांहीं

वेळ जणूं काय आजपर्यंत केलेल्या कर्मांचा पश्चात्ताप करीत बसे. अशी स्थिति चालली होती. औरंगजेब बादशहानें त्याची बरदास्त एखादे दुष्मानाप्रमाणें ठेवलेली नव्हती; राजाला योग्य अशीच ठेविली होती; ही गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे. औरंगजेबाच्या मनास एकपरीनें हा मुसलमान होणें शक्य नाहीं असें तर वाटतच होतें, परंतु न जाणों आपण त्याला चांगल्या तऱ्हेनें वागविलें व सर्व दख्खनचें राज्य तुझ्या स्वाधीन करतों म्हटलें, तर कदाचित् त्याचें मन मुसलमान होण्याकडे वळेल असेंही वाटे. आशा मोठी जबरदस्त वागुरा पसरते. संभाजीच्या कानांवर या गोष्टी गेल्या नव्हत्या असें नाहीं. आणि त्या गेल्या होत्या यामुळेंच औरंगजेबाबद्दल त्याचें चित्त अत्यंत क्रोधमय झालें होतें. तो जर एकदां आपल्यापुढें येऊन स्पष्टपणें बोलेल तर आपण त्याची सोळा आणे फजिती करूं, असा त्याचा निश्चय झाला होता. आणि तो जणूं काय अगदीं वाटच पहात बसला होता, कीं केव्हां आपली व त्याची समक्ष गांठ पडते.

राजा संभाजीनें राजारामास पाठविलेलें पत्र मागें एका प्रकरणांत वाचकांस पहावयास सांपडलें आहेच. त्या पत्रांत वर्णिल्याप्रमाणेंच संभाजीच्या मनाची खरोखरच स्थिति झालेली होती. गेल्या दहा वर्षांत आपल्या हातून काय काय अनन्वित कृत्यें घडलीं तीं सर्व मधून मधून त्याच्या डोळ्यांपुढें दिसूं लागलीं. आणि आपल्या वडिलांनीं, थोरल्या महाराजांनीं, काय काय पराक्रमाच्या, स्वदेशहिताच्या आणि स्वधर्मसंरक्षणाच्या गोष्टी केल्या, त्या आणि आपण त्याच्या अगदीं उलट अशा किती केल्या त्या सर्व त्याच्या डोळ्यांपुढें उभ्या राहून त्यांचा विरोध स्पष्टपणें त्याला दिसूं लागला. मोठमोठ्या

मुत्सद्द्यांनीं, स्वराज्याचें हित पाहणाऱ्यांनीं, आपणांस कळकळीनें उपदेश केला असतां आपण तो ऐकला नाहीं, त्यांना धुडकावून लावलें, त्यांचा अपमान केला, आपण या राज्यांत राहूं नये असें त्यांना वाटलें आणि ते भराभर घरीं बसले. अगर शेवटीं नाइलाज म्हणून कित्येक तर मुसलमानांच्या पदरीं जाऊन राहिले. थोरल्या महाराजांनीं जितका प्रांत मिळविला, त्यांत भर घालावयाची एकीकडेच राहिली, परंतु त्यांतला मुलूख एकामागून एक आपण किती तरी घालविला. महाराज आज जर हयात असते, तर त्यांनीं विजापूर मोगलांच्या ताब्यांत जाऊं न देतां आपण आपल्या ताब्यांत घेतलें असतें. आणि मोगली राज्याच्या ऐवजीं तेथें मराठी राज्य स्थापन केलें असतें; तें आपल्या हातून झालें नाहीं तर नाहींच. उलट आपले आपण किल्ले एक एक एक एक मोगलांच्या ताब्यांत जाऊं दिले. आपल्याबद्दल कोणाच्याही मनांत प्रीति म्हणून राहिली नाहीं. जो तो आपल्यास नांवें ठेवूं लागला. वडिलांच्या कीर्तीला आपण काळिमा आणला. राज्यसूत्रें हातांत घेतलीं, तीं प्रत्यक्ष आपल्या सावत्र आईला हालहाल करून मारून! आणि सर्व आयुष्यभर क्रूरपणाचीं नीचपणाचीं कृत्यें केलीं. व्यसनाधीन होऊन कुलीनपणा विसरलों. या सर्व गोष्टी आपल्या हातून झाल्या याबद्दल त्याला या वेळीं खरा खरा पश्चात्ताप झाला आणि त्या सर्व त्याच्या मनांत उभ्या राहून त्याला असें वाटलें कीं, पुनः जर तेच सर्व दिवस, तींच सर्व वर्षें आपल्याला नव्यानें प्राप्त झालीं, तर आपण खचित खचित सर्व आयुःक्रम निराळा करूं. पण मेलेला माणूस आणि गेलेला काळ कधीं पुनः दृष्टीस पडावयाचा आहे?

संभाजीस हे सर्व विचार सुचत व पश्चात्ताप होई हें सर्व खरें. परंतु तें केव्हां? तर एकांतांत. कबजी कलुषा जवळ नसल्यावेळीं मात्र सुचत. कबजी भेटला, आणि त्यानें आपलें तें वाग्जाल पसरलें व शराबाचा पेला पुढें केला, कीं तें सर्व संपलेंच. पुनः त्याची पूर्वस्थिति होई. मग आपण तुरुंगांत आहोंत, आपल्या व आपल्या लोकांचा कट्टा दुस्मान् जो अलमगीर बादशहा, त्याच्या ताब्यांत आहोंत, त्यानें दया करून दिलेलें अन्न खातों आहोंत, त्यानें कृपा करून पाठविलेलें मद्य आपण पितों आहोंत, हें सर्व तो अगदीं विसरून जाई. कबजी कलुषानें कांहीं मंत्रतंत्र करून त्याला अगदीं भारून टाकून आपलासा करून टाकला होता, असें बखरीकार म्हणतात. तें खरें असो वा खोटें असो; परंतु कबजी कलुषाचें त्याच्यावर अगदीं विलक्षण प्रकारचें वजन होतें, यांत तिळमात्र संदेह नाहीं. कोणी कशीही महत्त्वाची व शहाणपणाची गोष्ट सुचवो, संभाजीनें कबजीला विचारून मग काय तें करूं असें उत्तर द्यावयाचें, आणि त्याचें अनुमोदन पडलें, तर ती गोष्ट करावयाची, नाहीं तर साफ दूर सारावयाची. कबजी म्हणजे एक नीच असा कनोज ब्राह्मण होता आणि तो वाममार्गी असल्यामुळें व मंत्रतंत्राची कांहीं माहिती त्यास असल्यामुळें, त्याचप्रमाणें त्याचे अंगीं गोड बोलण्याचा मोहक गुण असल्यामुळें, त्यानें संभाजीवर विलक्षण छाप बसवून दिली होती. एका बखरीकारानें असेंही लिहिलें आहे कीं, कबजीबावाची स्त्रीही फार चतुर होती. अर्थात् तिनेंही आपला मोहपाश राजावर पाडला असावा. बावाखेरीज त्याला कधींही कांहीं सुचलें नाहीं. कांहींही राजकारण

निघो, कोणी कांहींही सल्ला विचारण्यास येवो, कबजीबावाकडे बोट दाखवून राजे आपल्या बेहोषपणांत गुंग असावयाचे, हा क्रम चालू होता. कबजी तर बोलून चालून राजास बुडविण्यासच पहात होता हें उघड होय. त्यानें राजास पक्कें भुरळ पाडलें होतें. आणि आपल्या हातीं एकंदर राज्यकारभार घेऊन त्याची धूळधाण चालविली होती. संभाजीमहाराजांस हें कळत नव्हतें असें नाहीं, परंतु वळत नव्हतें. इतकेंच नव्हे, तर संभाजी एकटा असला, म्हणजे त्यास या सर्व गोष्टी कळत, पश्चात्ताप होई, क्वचित् कबजी-बावाच्या हेतूबद्दल व प्रामाणिकपणाबद्दल शंकाही येई. परंतु कबजीचें दर्शन झालें, कीं सर्व कांहीं एके बाजूस राहिलेंच. मुकारीबखान व इलाचीबेग यांनीं संभाजीस पकडण्याच्या वेळीं सुद्धां, केवळ कबजीबावासाठीं वाट पाहिल्यामुळेंच संभाजी शत्रूच्या हातीं सांपडला असें ग्रंथांतरीं सांपडतें. ज्यावेळीं शत्रूचे लोक नजीक आल्याची वार्ता आली, त्याच्या आदले दिवशीं, संगमेश्वराहून मुक्काम हलविण्याचें ठरल्याप्रमाणें, बहुतेक बरोबरचें लष्कर पुढल्या मुक्कामाला जाण्यासाठीं निघून गेलें होतें. महाराजांजवळ केवळ अगदीं शेलकीच मंडळी होती. ही स्थिति इलाचीबेग यास सूर्याजी पिसाळानें जाऊन कळविल्यामुळें त्यानें ताबडतोब हल्ला करण्याची लगट केली. शत्रूचे लोक आले हें पहातांच उरलेल्या मंडळीपैकींही कांहीं लोक झपाझप तेथून चालते झाले. आणि महाराजांच्या जवळ पुरता पन्नास लोक सुद्धां राहिला नाहीं. इलाचीबेग अगदीं जवळ येऊन ठेपला. दाराजवळ आला तेव्हां अंबाजी नांवाच्या इमानी नोकरानें महाराजांजवळ येऊन विनंती केली कीं, "मी महाराजांस

पाठूंगळी मारून बचावून नेतों." परंतु महाराजांनीं त्याला उत्तर दिलें कीं, 'बोवा कुठें आहेत? त्यांना बोलावून आणून मग ते काय सांगतील तसें करावयाचें.' ही जों वाटाघाट होते आहे तों शत्रू पुढें येऊन त्यानें वाड्याभोंवतीं गराडा घातला. "घालूं दे घातला तर. मी आतां मंत्र म्हणून व तंत्र करून आई जगदंबेचा धांवा करतों, कीं सगळया शत्रूंचा पार धुव्वा उडून जाईल," असें म्हणून कलुषानें सर्व थट्टेवारी नेण्याचा प्रयत्न केला. इतक्यांत अंबाजीनें आपल्या आग्रहपूर्वक विनंतीनें महाराजांकडून वेषांतर करवून बाहेर जाण्याचें कबूल करविलें. तरी सुद्धां कबजीबावासाठीं त्यांचा जीव घोंटाळला, आणि त्यांनीं विलंब केला. तितक्यांत शत्रूचे लोक वाड्यांत शिरले, त्यांच्यापैकीं एकानें महाराजांस ओळखलें. मग काय विचारतां? तेव्हांच पकडून कैद केलें. आणि ताबडतोब त्याच्या बरोबरीच्या मंडळींनाही कैद केलें. त्यांपैकीं कांहींनीं राजाच्याजवळ रहावयाचीच इच्छा केली होती. अंबाजीला तीच इच्छा होती. त्यानें पळून जाण्याची मुळींच इच्छा केली नाहीं. मात्र त्याला फार फार वाईट वाटलें कीं, आपण आपल्या यजमानास सोडविण्याकरितां इतकी खटपट केली असतां आपल्याला यश आलें नाहीं, आतां आपला मालक मोगलांच्या स्वाधीन सांपडला, तेव्हां काय होणार आहे हें उघडच दिसतें आहे. परंतु आपण जवळ असल्यानें वारंवार वारंवार योग्य सल्ला तरी देऊन त्याची कानउघाडणी करूं. मग काय होईल तें पाहतां येईल. न जाणों आतां अगदीं कडेलोटाचा वाईट प्रसंग आला आहे. तेव्हां कदाचित् त्याचें मन ताळ्यावर येईल.

कबजीबावासही मुकारीबखानानें कैद केलेंच होतें. मात्र एवढेंच केलें, कीं संभाजी व कबजी या दोघांस एकत्र ठेविलें नाहीं. न जाणों कोण्या वेळीं काय युक्ति करतील आणि निघून जातील. कबजी हा राज्यनाशासाठीं दिल्लीहूनच हेर पाठविला होता असें मुकारीबखानास वाटत नव्हतें. तेव्हां त्याला त्याचा विश्वास येईना. आपल्या यजमानाला सोडविण्यासाठीं हा आपली विलक्षण बुद्धि उपयोगाला लावून कांहीं तरी करावयाचा. संभाजी व कबजी याप्रमाणें कैदेंत एकमेकांपासून दूर असून मुकारीबखानाच्या बरोबर मजल दरमजल करीत तुळापुराकडे चालले होते. कबजीचें दर्शन नसल्यामुळें संभाजीस झाल्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप करण्यास व त्या पश्चात्तापाच्या भरांत मागें दिलेलें पत्र राजारामास लिहिण्याची स्फूर्ति झाली व सवड मिळाली. यामुळें तें पत्र लिहिलें जाऊन अंबाजीच्या हातीं राजारामाकडे गेलें. नाहीं तर कधीं जातें कीं नाहीं याची बरीच शंका होती. असो.

याप्रमाणेंच कबजीचा संभाजीवर कांहीं विलक्षण मोह पडलेला होता. तो कोणत्याही प्रकारें कमी होऊन त्याचे डोळे उघडणें शक्य नव्हतें. आणि यदाकदाचित् आतां तसे डोळे उघडले असते तरी काय उपयोग होता? कांहीं नव्हता, हें संभाजी स्वत: जाणून होताच. त्यामुळेंही तो आतां अधिक बेफिकीर झाला असावा. कसेंही असो. परंतु संभाजीच्या मनाची स्थिति आतां मोठी चमत्कारिक झाली होती खरी. आपला शिरच्छेद झाला तरी पतकरला; परंतु वेळप्रसंग पडला, तर आपण औरंगजेबाला सडकून शिव्या देऊन त्याची व त्याच्या धर्माची निर्भर्त्सना केल्याखेरीज रहावयाचें नाहीं

असा त्याच्या मनाचा पक्का निश्चय झालेला होता. आणि तसा प्रसंग येईल कधीं याबद्दल तो वाट पहात होता. इतकेंच नव्हे, तर तो लवकर यावा याबद्दल त्याला अतिशय उत्कट इच्छा झाली होती. आपल्या पश्चात् राजाराम चांगल्या तऱ्हेनें स्वराज्य संभाळील, आणि धनाजी जाधव वगैरे मंडळी त्याला उत्तम प्रकारें पाठबळ देतील अशीही त्याची खात्री होती. आज मित्तीस आपल्याला सोडविण्यासाठीं येऊन औरंगजेबाला तोंड देऊन लढणें, त्यांस शक्य नाहीं; कारण आपण फौजेची स्थिति अगदीं नादान करून ठेवली आहे, हेंही तो विसरला नाहीं. कबजीच्या संगतींत नसतांना त्याचें चित्त अगदीं शुद्ध असे, असा अनुभव अनेकवार आला होता. त्याप्रमाणेंच सध्यांचीही वेळ होती. तो पहारेकऱ्यांच्या देखत बादशहास व मुसलमानी धर्मास अतोनात शिव्या देई. मनांतला हेतु हा कीं, त्यांनीं जाऊन बादशहाकडे वर्दी द्यावी आणि वर्दी बादशहास पोंचली म्हणजे त्यानें संतापून आपल्यास काय करावयाचें तें एकदां करून टाकावें. किती दिवस झाले, तरी तो प्रकार जेव्हां होईना, तेव्हां त्याला साहजिकच अशी शंका येऊं लागली कीं, आपण काय अद्वातद्वा बोलतों तें बादशहाच्या कानापर्यंत जात नसावें, आणि म्हणून त्यानें अधिक जोरानें बोलण्याचा परिपाठ सुरू केला. कबजीबावाच्या देखत तो असें बोलला म्हणजे बावा त्याला हुश्श हुश्श करून दाबीत. परंतु तो ऐकत नसे. असें होतां होतां आजपर्यंतचे दिवस गेले. आणि आज एका अगदीं क्षुल्लक कारणावरून कबजीबावाविषयीं त्याचे एकाएकीं डोळे उघडले. कबजी त्याचे

तंबूंत आला आणि बोलणें निघतां निघतां एकदम संभाजीनं अलमगीर बादशहास अगदीं न भूतो न भविष्यति अशा शिव्या देण्यास सुरुवात केली. आजपर्यंत संभाजीच्या तोंडून बाहेर पडल्या नाहींत असल्या शिव्या आज त्यानें उच्चारल्या त्या कानीं पडतांच कबजीससुद्धां फार चमत्कारिक वाटलें आणि तो सहज संभाजीस म्हणाला, "महाराज, महाराज, हें आहे काय? आपण आज सर्वस्वीं त्यांच्या ताब्यांत आहों. आजपर्यंत त्याच्या कानावर सर्व गोष्टी गेल्याच असतील, परंतु आजच्या या गेल्या तर क्षणभरसुद्धां आपल्याला ते जिवंत ठेवणार नाहींत. कांहीं विचार करा. उगीच आपल्या हातानं आपल्यावर उद्यांचं मरण आज ओढून आणूं नका. आज नाहीं उद्यां आपल्याला तो चांडाळ ठार करणार याबद्दल शंकाच नाहीं, पण आपणच आपला मृत्यु अगदीं आमंत्रण देऊन, आग्रहाचें आमंत्रण देऊन, आणायचा! याला म्हणावं तरी काय?"

"कबजीबावा, तुम्हांसारख्या ब्राह्मणांत आणखी माझ्यासारख्या वीराच्या बच्यांत अंतर असतें तें हेंच. तुम्ही भटजी जीवाचे आशाळभूत. जीव बचावण्यासाठीं किती नीचपणा करावा लागला, तरी करणार. आणखी आम्ही! आम्ही नीचपणा येऊं लागला, तर मरण पतकरूं. पण असें कैदेंत राहून—आणखी त्यांत मोगलासारख्यांच्या कैदेंत राहून—दिवसानुदिवस काढणार नाहीं. जीव बचावत असला, आपला हेतु साधत असला तर तुम्ही भटें काय वाटेल तें कराल. मी तर मुद्दाम मुद्दाम पहिल्या दिवसापासून औरंगजेबाची आणखी त्याच्या धर्माची वाटेल तशी विटंबना करतों आहें. पण

कोणी अल्लाचा लाल असा अजून पुढें येईना, कीं तो सगळं कांहीं अक्षरशः बादशहाला जाऊन सांगून त्याला चिडवून चिडवून संताप आणील. काय, आणखी कोणाविषयीं काय बोलूं म्हणजे त्या शिखा-नष्टाला संताप येईल तेंच मला समजत नाहींसं झालं आहे. तूं तरी जाऊन आतां सांग मी काय काय म्हणतों आहें तें. म्हणजे तो येऊन एकदांचा काय तो निकाल करून घेईल."

"पण महाराज, तुम्ही आपल्या जीवावर इतके कां उदार झालां? कैदेंत असलां म्हणून होतं काय? तुमच्या सोन्याच्या ताटांत कांहीं कमती आहे का? मग कां उगीच? स्वस्थ कां बसाना?"

"अरे या अशा जेवणाचा....या जेवणाचाच तर मला अतो-नात संताप आला आहे. माझ्या हातांत हत्यार नाहीं. तेवढं असतं तर केव्हांच आपली आत्महत्या करून घेतली असती. पण काय उपयोग? त्या शिखानष्ट थेरड्याला संताप आणून आपण आपला वध करून घ्यायचा एवढाच काय तो आतां या अपमानाच्या स्थितींतून सुटण्याला उपाय उरलेला आहे. पण तो साध्य कसा व्हावा? कबजीबावा, तुला कांहीं नाहींना याबद्दल वाटत? तूं आपला खुशाल जेवतोस खातोस. अपमान आणि मान तुला कांहीं नाहीं असं स्पष्ट दिसतं."

"महाराज, मला मानापमान आहे का नाहीं, आणखी मला संताप येतो का नाहीं हें माझं मला ठाऊक. आपल्याला तें काय सांगूं? मला तर त्याचा इतका संताप येतो कीं,—पण काय आपलेच ओंठ आणि आपलेच दांत.—पण इलाज नाहीं. नुसता संताप करून काय करणार? मला संताप येण्याला जितकं कारण आहे तितकं

कारण तुम्हांला सुद्धां नाहीं. पण कारण असून उपयोग काय? आणखी नुसतं संतापून उपयोग काय? संतापून आणखी शिव्या देऊन आपले हाल मात्र करून घ्यायचे इतकंच. दुसरं काय?"

"तेंच. तेंच मी म्हणतों तेंच, तूं हालांना भितोस. मी या अपमानाला भितों. मला हा अपमान नको. कितीही हाल झाले तरी हरकत नाहीं असं वाटतं, आणखी या अपमानापेक्षां कितीही हाल करून त्यानं जीव घेतला तरी पतकरला. अरे, मला त्यानं आपल्यापुढें नेऊन एकदां उभं करावं, नाहीं तर त्यानं तरी माझ्यापुढें येऊन उभं रहावं म्हणजे हा शिवाजीमहाराजांचा बच्चा कितीही बहकला, तरी त्याचं पाणी कसं आहे तें त्याला दाखवीन."

इतकें बोलून तो फारच संतापला आणि इकडून तिकडे हिंडूं लागला. "मला तो मुसलमान करून टाकायला पहातो आहे हें काय मला कळलं नाहीं असं समजतोस? मी मुसलमान होईन असं त्याला वाटतं? मी आपला धर्म सोडीन? मग कशाला कशाला त्या महात्म्याच्या पोटीं आलों? त्याला माझ्या समक्ष ती गोष्ट तर काढूं दे, कीं त्याला खूप तऱ्हेचं उत्तर देईन. असं उत्तर देईन कीं, त्या घटकेस, त्या क्षणीं, मला ठार मारावं असंच त्याला वाटेल. बोल. बोल. तुला जर त्यानं मुसलमान हो म्हणजे तुला सोडतों असं सांगितलं तर होशील का?"

"मला कशाला तो तसं म्हणतो आहे? आणखी तसं म्हटलं तर मी काय करीन त्याची बढाई आतांच मी कशाला मारूं?" "एकूण मी नुसती बढाई मारतों असं तुझं म्हणणं?" "छे. छे. आपण बढाई मारतां असं मी नाहींच म्हणत. पण महाराज, जीव

हा सगळ्यापेक्षां प्यारा आणखी त्या जिवासाठीं काय वाटेल तें सुद्धां करणारे प्राणी जगांत असतात."

"असतील. असतील पण मी त्यांतला नाहीं."

"पण मी कुठें म्हणतों आपण त्यांतले आहांत म्हणून? आपण नाहींच. माझी अगदीं खात्री आहे. पण आपण तरी इतकं जीवावर उदार काय म्हणून व्हावं? आपण आज जीव वांचवला तर उद्यां पुन: राज्य मिळणार नाहीं म्हणून कशावरून? धर्म धर्म तो काय? आपण ज्या मार्गानं परमेश्वराकडे जाऊं तो धर्म. अमक्याच मार्गानं गेलों तर धर्म आणि दुसऱ्या मार्गानं गेलों तर अधर्म, असं का आहे? आपण वाममार्गांत होतों. पण त्या मार्गाला दोष देणारे, त्या मार्गाला अगदीं नीच मार्ग समजणारे असे लोक आहेतच कीं नाहीं? मग यदाकदाचित् आपण म्हटलं कीं, होतों बोवा मी........"

परंतु कबजीबोवास पुढें बोलूं देण्याइतकासुद्धां संभाजीस धीर निघेना. कबजीबोवाच्या मनांत आपण मुसलमान झालों तरी हरकत नाहीं असा अर्थ दिसतो हें त्यानें जाणलें. आणि एकदम त्यानें त्याच्या अंगावर धांवून जाऊन म्हटलें, "काय? काय? तुझीच जीभ हे शब्द बोलते आहे? तुझीच? कबजीबावा तुझीच? का दुसऱ्याच कोणा पिशाच्चाचा तुझ्या देहांत संचार होऊन तें बोलतें आहे? अरे दुष्टा! मला आजपर्यंत तूं..........पण तूं कोण? मला माझे लोक सांगत होते, तो तर तूं खरोखर नव्हेसना? मला अशा फांशांत पाडून नादाला लावून मुसलमानांच्या तावडींत सांपडण्यासाठीं, माझ्या मराठ्यांच्या स्वराज्याचा नाश करण्यासाठीं, तर

या दुष्ट अलमागिरानं खरोखर तुला माझ्या राज्यांत पाठवला नाहींना? होय. होय. चंदीच्या रघुनाथपंतांनीं मला वारंवार लिहून असंच सांगितलं. पण मी त्या वेळीं जागा झालों नाहीं. माझ्या वडिलांच्या वेळच्या, थोरल्या महाराजांच्या वेळच्या, मुत्सद्द्यांनीं मला किती वेळां बजावलं, किती वेळां सावध करण्याचा प्रयत्न केला, पण मीं तिकडे लक्ष दिलं नाहीं. त्यांना मूर्ख ठरवलं. त्या सगळ्यांच्या डोक्यावर, माझ्या स्वतःच्या सुद्धां डोक्यावर तुला मीं बसवलं. अगदीं खचित खचित, तूं मला मुसलमान होण्याचा उपदेश करतोस, तो तूं अगदीं खात्रीनंच त्या चांडाळ दुष्ट बादशहाचा हेर—केवळ माझा आणखी माझ्या द्वारानं मराठी राज्याचा सत्यानाश करण्यासाठीं तूं आलास." 'आज, माझे डोळे उघडताहेत. आः आतां डोळे उघडून काय उपयोग? उपयोग काय?'

"नाहींच. नाहींच." कबजीबावा झटकन् दूर गेले होते तेथून उत्तर करतात. "नाहींच; खरोखरच आतां कांहीं उपयोग नाहीं. तूं असं आतां एवीतेवी मला म्हणतोस, तर मीच तुला सांगतों, कीं मूर्खा, आतां या डोळे उघडण्याचा कांहीं सुद्धां उपयोग नाहीं. आतां मी सांगतों तसं कर तरच कांहीं तुझं तारण आहे. नाहीं तर........"

"काय? नाहीं तर काय? दुष्टा माझ्या डोळ्यांसमोरून नीघ, नाहीं तर आत्तां, आत्तां या घटकेस तुझ्या नरडीचा घोट घेईन. आजपर्यंत तुझ्या नादीं लागून कितीक लोकांचे नाहक खून केले. किती ब्रह्महत्या माथीं घेतल्या. त्यांत ही तुझी हत्या कांहीं पापाला भर घालणार नाहीं, उलट पहिल्या पापांतलं कांहीं कमीच होईल." असें म्हणून तो त्याच्या अंगावर धांवला.

## डोळे कसे उघडले ?

संतापानें संभाजीचें सर्वांग थरथरूं लागलें होतें. कबजीबावा दूर उभा राहून अशा रीतीनें पहात होता, कीं जणूं काय तो सर्व प्रकार पाहून त्यास आंतून गुदगुल्याच होत होत्या असें दिसलें. कांहीं हिंस्र प्राणी असे असतात कीं, त्यांनीं आपला बळी धरला म्हणजे एकदम त्यास जिवें मारीत नाहींत, त्याचे हाल करून त्या हालांत त्याची कशी काय अवस्था उडते तें पहात असतात. त्या पहाण्यांतच त्यांना एक प्रकारचा अवर्णनीय आनंद होत असतो. त्याचप्रमाणें जो नीच वृत्तीचा व दुष्ट मनुष्य असतो, त्यानें आपल्या नीचपणानें व दुष्टपणानें एकाद्या बलाढ्याचा नाश केला, म्हणजे तो नाश होत असतां त्याची जी दुरवस्था होत असते तीही पण पाहण्यांत त्या नीचास फार आनंद होतो. तशीच स्थिति कबजीची झाली होती. आज इतकीं वर्षें जो व्यूह रचला त्याचें खरें फळ संभाजीस कैद करून धरून आणला तेव्हां नव्हे, तर इतकी दुरवस्था होण्याला आपण—त्याच्या अगदीं विश्वासाचें स्थान जे आपण तेच—कारण झालों, हें त्यास कळून, जो कांहीं त्याच्या अंगाचा नामर्द संताप होतो आहे, आपल्याशींच जीं तो मनगटें चावतो आहे तें सर्व पहाण्यांतच त्या सर्व व्यूहाचें खरें खरें चीज होय असें त्यास वाटून परमावधीचा आनंद झाला. आतां आपलें याच्या हातून कांहीं सुद्धां वांकडें होणार नाहीं; आतां यास खुशाल आपलें सर्व कारस्थान सांगावें आणि आणखी वाटेल तितकें चिडवावें व मौज पहावी अशी त्यास उत्कट इच्छा झाली. आणि त्या अनावर इच्छेनें व त्या अपरिमित आनंदानें भरलेल्या दुष्ट

पणानें तुळतुळणाऱ्या नेत्रांनीं तो त्याच्याकडे पहात होता. संभाजीच्या हातीं ना शस्त्र ना अस्त्र अशी स्थिति त्यानेंच करविली होती. तेव्हां तो आपल्यास कांहींही इजा करूं शकणार नाहीं हें तो पूर्णपणें जाणत होता. आणि म्हणूनच त्याची जीभ विशेष लुबलुबूं लागली. संभाजी अंगावर धांवून आला तरी तो बेताबाताच्या अंतरावरच पळून जाऊन त्याला तेथून म्हणतो, "राजा, या तुझ्या नामर्द संतापांत कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां अर्थ नाहीं. आजपर्यंत माझा चांगला उपदेश ऐकून जसा येथपर्यंत आलास, तसाच आणखी थोडासा पुढें चल, म्हणजे तुझी पुनः पूर्वीची स्थिति येईल इतकंच नाहीं, तर तूं दक्षिणचा बादशहा होशील आणखी मग मी तुझा वजीर होऊन, आपण शेवटपर्यंत आपला सगळा काळ मोठ्या मौजेंत घालवूं. पहा, थोडक्याकरितां उगीच आपला जीव धोक्यांत घालून गमावूं नकोस. तुला काय कोणत्याही धर्माचा मी म्हटलं, तरी सारखंच........"

संभाजीला त्या बोलण्यानें इतका संताप चढला, कीं कांहीं पुसूं नये. त्या नीच मनुष्याचा जीव कसा घेऊं, नरडीचा घोट कसा घेऊं असें त्यास झालें आणि त्याच्या हाताशीं जें काय लागलें, तें फेंकून तो बोवाजीच्या पाठीस लागला. परंतु बोवाजीनें तो मारा चुकवून "पहा बोवा, मी तुझ्या बऱ्याची म्हणून गोष्ट सांगतों आहें. यावर तुझी मर्जी. अतिशय रोगांनीं पीडलेल्या माणसास औषध नकोसंच होतं तशी तुझी स्थिति झाली आहे, त्याला काय करायचं?" असें म्हणत त्यानें तेथून काळें केलें. संभाजी शरीरप्रकृतीनें फार दणगट व धिप्पाड. त्याच्या हातांत जर तो

कलुषा त्या वेळीं लागला असता, तर केव्हांच त्याची मुंडी त्यानें मुरगळून टाकली असती. कदाचित् जरासंधाप्रमाणें उभा फाडून-सुद्धां टाकला असता. कबजी कलुषास हें पक्केपणें ठाऊक होतें. संभाजीचे सर्व मनोविकार इतके उत्कट होते कीं, ते कधींच त्याला आवरतां येत नसत. या चांडाळास आतां धरून मारलें पाहिजे असें मनांत येतांच त्यानें त्याच्या मागोमाग धूम ठोकली. जसें एखादें भेकड बकरें पाठीमागें वाघ लागलासें पहातांच ब्यां ब्यां करीत जीव वांचविण्यासाठीं सैरावैरा धांवत सुटावें आणि बिचारें, कोठें-सुद्धां वाट मिळेनासें होऊन, धांवून धांवून अगदीं थकल्यावर तोंड वासून पडावें, त्याप्रमाणें कलुषाची त्या वेळीं स्थिति झाली. तो धांवून धांवून थकून एका पहारेकऱ्याच्या पाठीशीं जाऊन उभा राहिला. संभाजी संतापानें अगदीं नुसता अंध झाला होता. त्यानें त्या पहारेकऱ्याची गचांडी धरून झटक्यासरशीं त्यास एका बाजूस सारलें आणि जोरानें कलुषाचें मानगूट धरून त्यास ताडकन् खालीं पाडलें. अत्युत्कटमनोविकारी लोक असतात त्यांचे सर्वच मनोवि-कार फार जालीम असतात. प्रेम असेल त्या वेळीं तेंही अतिरेकाचें असतें आणि तें बदलून त्याच्या जागीं द्वेष उत्पन्न झाला, म्हणजे तोही भयंकरच असावयाचा. संभाजी अशाच व्यक्तींपैकीं एक होता. कबजी कलुषानें आजपर्यंत आपल्याशीं अशा तऱ्हेनें विश्वासघात केला, असें कळल्या क्षणापासून संभाजीच्या पायाची आग मस्तकास गेली होती, आणि संतापाग्नि इतका भडकला होता कीं, त्याला त्या कबजीच्या प्राणांची आहुति मिळाली तरच तो शांत होण्याचा संभव होता.

मानगूट धरून खालीं आपटण्याबरोबर डोळे पांढरे झालेला कबजी कलुषा कासावीस होऊन एकदम ओरडून म्हणतो: " राजा, राजा, अरे मी ब्राह्मण आहें, तुझ्या वडिलाचें काय ब्रीद होतें तें स्मर. आणखी ब्राह्मणाला सोडून दे. ब्रह्महत्या डोक्यावर घेऊं नकोस. तुझा व माझा आजपर्यंतचा संबंध मनांत आण. आणखी........" ते त्या दाबलेल्या गळ्यांतून गुटमळत गुटमळत आलेले शब्द कानीं पडतांच तो संतापांध संभाजी आपले दांत ओंठ करकरून चावून म्हणतो, "लेका, आजपर्यंतच्या सर्व हत्यांनीं मला पाप लागलं असेल पाप! पण आज जर तुझा प्राण घेतला तर त्या मागल्या सगळ्या पापांचं क्षालन होऊन जाईल. एक एक टिपूससुद्धां पाप राहणार नाहीं, असलं जबर पुण्य लागेल." असें म्हणून त्यानें त्याच्या तोंडावर एक अशी चपराक लगावली व मानगूट धरलेली बेचक अशी जोरानें आवळली, कीं कबजीची जीभ तर बाहेर आली. एका दोन क्षणांचाच काय तो अवकाश. आणखी अणुरेणुमात्र जोर अधिक झाला असता तर कबजीचा प्राण त्याची कुडी सोडून गेला असता. त्याची जीभ दांताओंठांच्या बाहेर निघालीच होती. 'मला सोडा, मला सोडा' हे किंवा अशा अर्थाचे कांहीं शब्द त्याच्या गळ्यांत अडखळत अडखळत फार अस्पष्टपणें बाहेर पडण्यासाठीं प्रयत्न करीत असावेत असें दिसलें. इतक्यांत त्याच्या डेऱ्याभोंवतालचे पहारेकरी व आजूबाजूच्या इतराच्या डेऱ्यांवरील लोकही तेथें धांवून आले आणि दोघांचौघांनीं संभाजीचा हात हिसकून कबजीची मान त्यांतून सोडविली. कबजी बिचारा बेशुद्धच पडला होता. संभाजीनें त्यास

जोरानें एक लाथ मारिली. आणि 'मेला असलास तर ठीकच झालें. मेला नसलास तर माझ्या हाताला तुझा प्राण घेतल्याचा विटाळ लागावयाचा नव्हता असेंच मी समजतों' असें म्हणून तो तेथून आपल्या तंबूकडे चालता झाला. एक वेळां हातांतून लोकांनीं सोडविलेल्या शत्रूला पुनः धरून मारण्यांत त्यास पुरुषार्थ वाटला नाहीं.

आपल्या तंबूंत गेल्यानंतर एखाद्याच्या डोळ्यांवर आलेली गुंगी उतरून त्याची जशी स्थिति व्हावी त्याप्रमाणेंच संभाजीची स्थिति झाली. कबजी कलुषा आजपर्यंत आपला मित्र, मोठा शहाणा गुरु, असें त्यास वाटत असे. परंतु तोच आपला अतिशय मोठा थोरला शत्रु असें आज स्पष्टपणें दिसून आलें. गेल्या दहा वर्षांत जीं जीं अनन्वित कृत्यें त्याच्या हातून झालीं, तीं तीं सर्व त्याच्या नेत्रांसमोरून एकामागून एक जशीं घडत गेलीं तशीं तशीं विस्तारानें दिसूं लागलीं. ज्या ज्या व्यक्तींचे त्यानें खून करविले, त्या त्या व्यक्ति त्याच्या डोळ्यांसमोर दिसूं लागल्या. प्रथमतः राज्यकारभार हातीं घेतांच रायगडावर चढून कंक व सरनौबत व कान्होजी भांडवलकर इत्यादि मंडळी वाड्यांत सदरेस होती त्यांजला धरून कैदेंत घातल्याचा देखावा त्याच्या डोळ्यांसमोर दिसूं लागला. सोमाजी नाईक बंकी यास टकमकी कड्यावरून लोटून देण्याचा हुकूम करून तें अमानुष कृत्य त्या वेळीं आपण आपल्या नजरेनें जसें पाहिलें, तसेंच आज आतां या क्षणींही आपण पहातों आहोंत असें त्यास दिसलें. आजच्या आणि त्या दिवसाच्या पहाण्यांत फरक एवढाच कीं, त्या वेळीं एखाद्या मदांध पुरुषाप्रमाणें आपली स्थिति झालेली होती. त्या वेळीं तें पहात असतां मनास अणुरेणुमात्र खेद किंवा

दिक्कत वाटत नव्हती. परंतु या वेळीं तेच आपण पश्चात्तापानें अगदीं व्याप्त होऊन तोच देखावा फार निराळ्या दृष्टीनें पहात आहों. मोरोपंत प्रधान व अण्णाजी सचिव यांस कैद करून त्यांचे हातीं पायीं बेड्या घालण्याचा जो उपक्रम त्यावेळीं केला, त्यांचीं घरेंदारें लुटविलीं व त्यांवरून नांगर फिरविला तें सर्व कृत्य पुनः डोळ्यांसमोर उभें राहून जसजसें घडलें तसतसें याही वेळीं पश्चात्तापास कारण झालें. मोरोपंत प्रधान आपल्याकडून तशा संकटस्थितींतही आपणांस उपदेश करीत आहे व थोरल्या महाराजांच्या लौकिकाची आठवण देऊन चाड बाळगण्याविषयीं सुचवीत आहे; परंतु आपण त्याची थट्टा करून त्यास मारून टाकण्याची दहशत घालीत आहों असेंही पण त्यास दिसलें. त्यानंतर आपण वाड्यांत राणीवशांत जाऊन आपली मातोश्री सोयराबाई हिचा तपास लावून ती सांपडून जीव वांचविण्यासाठीं इकडून तिकडे सैरावैरा धांवत आहे आणि आपण पकडवून ‘ राज्यलाभासाठीं महाराजांना विष घालून मारलंस नाहीं का ?’ असे कठोर शब्द बोलून आपल्या देखत पकडवून एका भिंतीला कोनाडा करवून आंत चिणून टाकली आणि त्याप्रमाणें तीन दिवस तिचे होणारे हालहाल पाहून आनंद मानीत आहोंत हेंही पण त्यास दिसलें. आतांपर्यंत डोळ्यांपुढें उभे राहिलेल्या सर्व देखाव्यांत हा देखावा अत्यंत हृदयभेदक होता. सोयराबाईची अतिशय दुःखित व भयभीत अशी ती पहिले दिवसाची चर्या, त्याचप्रमाणें दुसऱ्या दोन्ही दिवशीं तीवर हळूहळू येत चाललेली प्रेतकळा आज या घटकेस त्यास तितक्याच स्पष्टपणें दिसत असून मनास जाळीत आहे हें उघड दिसलें. आपल्या डोळ्यांपुढें

हात धरले असतां दृष्टीआड होईल असें वाटूनच कीं काय तो तीनतीनदां आपले दोन्ही हात पसरून डोळे झांकून धरीत होता; परंतु उपयोग काय? तो स्वतःच्या दुष्ट कृत्याचा अप्रतिम देखावा त्याच्या दृष्टीआड कांहींही केल्यानें होईना. सोयराबाई जणूं काय मरतां मरतां आपल्यास भयंकर शाप देते आहे आणि तें सर्व अक्षरशः खरें होणार असें आपलें मन आपल्यास सांगत आहे असें त्यास वाटलें व आज भित्तीस जी आपली दुरवस्था झाली आहे, ती तिच्या त्या शापाचेंच फळ होय असेंही पण त्यास वाटूं लागलें. पुष्कळसा प्रयत्न केल्यानंतर तो मातृघाताचा भयंकर देखावा त्याच्या डोळ्यांसमोरून दूर होऊन त्याचे जागीं पुढलीं असंख्य अशीं अनन्वित कृत्यें एकामागून एक त्यास दिसूं लागलीं. तो चांडाळ कलुषा येऊन भेटल्या दिवसापासून तर त्या सर्व कृत्यांची जणूं काय एकसारखी रांगची रांग लागून राहिली. त्या सर्व वर्षांत बऱ्या लोकांनीं बरें म्हणण्याजोगें किंवा आपण शुद्धीवर असतां आपणास तरी बरें वाटण्याजोगें एकही कृत्य त्यास कोठें दिसेना. जिकडे पहावें तिकडे ज्या कोणाचे खून केले त्यांचे प्रेतरूप चेहरे. ज्या कोणास कैदेंत टाकलें आणि ज्यांचीं घरेंदारें लुटलीं त्यांचे रुष्ट अविषण्ण चेहरे. यांखेरीज कोठें कांहीं दिसेना. आपल्या जवळ अगदीं नजीक असे जे लोक होते, त्या सर्वांच्या चर्येवर आज ह्या प्रसंगीं त्यास दोन प्रकारच्या छाया दिसूं लागल्या. एक छाया आपण त्यांचेकडे पहातों आहोंत हें त्यांस ठाऊक असतां वेळची; आणि दुसरी आपण त्यांचेकडे पहात नाहीं अशी त्यांची समजूत असतां त्या वेळची. एका छायेच्या योगानें असें दिसे कीं, जणूं

काय ते सर्व आपणास देवाचा अवतार मानून आपली अनन्यभावें सेवा करण्यास तयार आहेत. आणि दुसऱ्या छायेच्या योगानें असें दिसें कीं, जणूं काय त्या लोकांपैकीं प्रत्येकजण आपल्या नरडीचा घोट केव्हां घेण्यास सांपडेल असें वाटूनच आपल्याकडे पहात आहे. प्रत्यक्ष कबजी कलुषा आपणास एका हातानें शराबाचा पेला पुढें करून घ्या म्हणून आग्रह करीत आहे आणि दुसरा हात आपल्या पाठीमागच्या बाजूस नेऊन त्या हातांत धरलेली बरची आपल्या मानेंत मारण्याची संधि पहात आहे, असें त्यास आतां दिसूं लागलें आणि हा त्याचा मागल्या बाजूस नेलेला हात त्यावेळीं कां दिसला नाहीं याबद्दल आश्चर्य व पश्चात्ताप आज त्यास होऊं लागला. कबजी कलुषा रोज रोज मदिरा आणि मदिराक्षी या दोन रूपांनीं घटकोघटकीं विषाचे पेले पिण्याबद्दल आग्रह करीत असे आणि आपण तें अमृत म्हणून समजून कोणाची परवा न करतां घटाघट पीत होतों व चंदीचे रघुनाथ पंडित वगैरे मंडळींनीं सदुपदेशाचे खरे खरे अमृताचे पेले आपल्या ओंठांजवळ आणिले असतांही ते विषानें भरलेले असें समजून त्यांचा अव्हेर केला व ते देणारांची अप्रतिष्ठा करण्यास मागें घेतलें नाहीं, हेंही त्यास आज स्पष्टपणें दिसूं लागलें.

एखाद्या मनुष्यास अर्धवट निद्रा आणि अर्धवट जागृति अशी स्थिति असतांना ज्याप्रमाणें स्वप्नें पडावीं आणि त्यांत कांहीं अनुभवलेल्या गोष्टी आणि कांहीं कधींही न अनुभवलेल्या गोष्टी यांचें विलक्षण मिश्रण व्हावें व सगळेंच कांहीं खरें असें वाटावें, त्याप्रमाणेंच संभाजीची अवस्था झाली होती. स्वभावतःच

संभाजीचें मन फार घट्ट असे. परंतु सध्यां जो प्रसंग त्याजवर आला होता त्यामुळें त्याचे मनावर यत्किंचितही त्याचा ताबा राहिला नव्हता. मध्येंच त्यास वाटे कीं, आपण आपल्या ऐन अमदानी-मधील चैनबाजीचा अनुभव घेत आहों. कलुषा आपणास शराब पाजून आपण स्वतः रचलेलीं हिंदी भाषेंतील काव्यें—जीं सगळीं अनोनात उत्तान शृंगारपर होतीं तीं—, म्हणून दाखवीत आहे आणि तीं ऐकण्यांत तल्लीन झालेले आपण आपल्या वारांगनांकडे डोळे मिचकावीत मिचकावीत ‘वहावा कवीजी, खूप बहार केलीत’ असें म्हणत त्यास जवळ ओढून घेऊन घट्ट मिठी मारीत आहों. परंतु हा देखावा जों दिसतो न दिसतो तोंच आपण मिठी मारलेला कवीजी कबजी नसून एक भला थोरला कृष्णसर्प आहे, आणि आपणास छातीवर दंश करीत आहे, असा त्यास भास होई. असा भास झाल्याबरोबर तो लागलाच शुद्धीवर येई, आणि इकडे तिकडे पाहूं लागे. डोळे चोळी. आपण सर्व पाहिलें तें खरोखर पाहिलें, कीं आपल्यास नुसता भास झाला, हें त्यास समजत नसे. आणि त्यामुळें आपण आहोंत कुठें, करतों आहोंत काय आणि एकंदर चाललें आहे तरी काय, ह्याचें ज्ञान त्यास मुळींसुद्धां नसावें असें दिसलें. त्याचे मनाचें बस्तान अगदीं बिघडलें. त्याचें मस्तक ठिकाणावर नाहीं अशी स्थिति झाली. आणि तो अगदीं वेड्याप्रमाणें होऊन आपल्या त्यां तंबूंत भिरी भिरी हिंडूं लागला. पुनः त्याचें मन ठिकाणावर येईपर्यंत किती तरी तास गेले. त्या दिवशीं त्याची अशी स्थिति होई कीं, त्याचें मस्तक अतिशय भ्रमल्यामुळें त्यास झोंपेची गुंगी येई. परंतु क्षणभर ती गुंगी राहिली न राहिली तोंच पूर्वीं सांगितलेल्या

देखाव्यांपैकीं एखादा भयंकर देखावा एकदम त्याच्या नजरेसमोर उभा राही. आणि त्यांतील प्रेतें पाहून तो किंकाळी फोडल्याप्रमाणें करूनच आपल्या तारवटलेल्या डोळ्यांनीं आपल्या सभोंवतालीं टकमका पाहूं लागे. परंतु कांहीं वेळानें त्याचें मस्तक आणि त्याचें मन हीं बेतावर येऊन आपण कोठें आहोंत व कशा स्थितींत आहोंत हें त्याच्या चांगलें ध्यानांत येई. आणि त्या रात्रीं त्याच्या त्या श्रमलेल्या डोक्यास कांहीं विसावा मिळाल्यामुळें त्याच्या मनाची क्षुब्धता बहुतेक कमी झाली. परंतु ती क्षुब्धता कमी झाल्यानंतर त्याचें मन दुसऱ्याच प्रकारच्या वेडानें घेरलें गेलें. आपल्या मनांत त्यानें असा निश्चय केला कीं आतां काय होईल तें करून बादशहाकडून आपला प्राणघात होईल अशी तजवीज करावयाची व या त्याच्या निश्चयास अनुसरूनच त्याचें हल्लींचें वर्तन होतें.

परंतु यास अशा स्थितीमध्यें टाकून आपण राजाराम व त्याचा अनोळखी वाटाड्या यांचा प्रवास कोठपर्यंत आला आहे तें पाहूं.

---

# महादेव शिवराम गोळे.

( हिंदुधर्म आणि सुधारणा. )

[ १ ]

## शहरवासी होण्याचे ऱ्हासकारक परिणाम.

वरिष्ठ जातींनीं आपलीं मुलें विद्याव्यासंगांतून काढायाचीं असा विचार केला, तर त्यानीं करावें काय असा प्रश्न येतो. व या प्रश्नाचा विचार करूं लागलें म्हणजे वरिष्ठ जातींस विलयास नेणारें दुसरें कारण लक्षांत येतें. वरिष्ठ जातींस आपलें अस्तित्व राखण्याकरितां केवढे दुर्धर भगीरथ प्रयत्न केले पाहिजेत हें पुढील विवेचनावरून लक्षांत येईल. सर्व बाजूंनीं त्यांस मृत्यूनें घेरलें आहे; त्यांतून ते कसा आपला बचाव करून घेतील, ईश्वर जाणे!

युरोपीय राष्ट्रें विलक्षण विद्याव्यासंग करीत आहेत, तेव्हां त्यांच्या समाजांत कशी घडामोड चालली आहे ती पहा. जे पुरुष ज्ञानानें व पराक्रमानें अत्यंत ऊर्जित दशेस येऊन राष्ट्रास अलंकारभूत होतात, त्यांच्या मागें त्यांचें नांव चालविण्यास मुळींच संतति रहात नाहीं, किंवा जी राहते ती फार कमी योग्यतेची असते, व तिचाही नाश कांहीं थोड्या पिढ्यांनीं होतो. समाजांत जे अगदीं वरिष्ठ वर्ग त्यांचा निःसंतान होण्याकडे कल असतो. सरासरीनें सहा पिढ्यांचे आंत मोठ्या पुरुषाचें कूळ विलयास जातें; व बहुधा दत्तक घेऊन, किंवा अशाच दुसऱ्या तऱ्हेनें कुळांत नवीन जोरदार बीज आणून, कूळ राखावें लागतें. कोणत्याही वर्गातील निवडक माणसें श्रेष्ठत्व

मिळविण्याकरितां जसजशीं अधिक बुद्धिपरिश्रम करूं लागतात, तसतशीं तीं उदयास येतात, परंतु संततीचे कामीं तीं निरुपयोगी होतात. हे बुद्धि-परिश्रम जेथें फार थोडे तेथें कायमचा बुद्धीचा ठेवा असता; तेथेंच संततिही विपुल असते. इकडे वरिष्ठतेस आलेल्या माणसांचीं कुळें नष्ट होत असतात, तिकडे कांहीं पुरुष खालच्या वर्गांतून बुद्धीचा ठेवा आणून उत्कर्षास येत असतात व नवीन वरिष्ठ कुळें स्थापित असतात. याप्रमाणें, बुद्धि-परिश्रम न करणारे व दारिद्र्यांत अंगमेहनतीनें दिवस कंठणारे जे खेड्यापाड्यांतील शेतकरी व मजूर लोक, ते समाजाचा अचळ पाया आहेत. त्यावर इतर वर्गांची इमारत आहे; तिचा कळस नित्य ढांसळून पडत असतो, परंतु खालच्या वर्गांतून पुनः तो नवा तयार होऊन उभारला जातो. समाजाची वृद्धि केळीच्या झाडाप्रमाणें आहे. खुंटास खालून नवे नवे कोंब फुटून तें वाढत असतें; वर आलेले फळांचे घड परोपकारास लागतात, बीजाचे उपयोगीं पडत नाहींत.

वरिष्ठ वर्ग आपलें सर्व सामर्थ्य खालच्या वर्गांतून घेऊन येतात, त्याच्या प्रकाशानें जगांत देदीप्यमान होतात व तें संपतांच विलुप्त होतात. युरोपीय प्रसिद्ध माणसांची स्थिति विजेच्या दिव्यांप्रमाणें आहे. त्यांस लागणारें सामर्थ्य कोठें तरी अप्रसिद्ध भिकार जागीं यंत्रद्वारा तयार होऊन येतें; ज्या तारांतून त्याचा ओघ वाहतो त्यांकडे कोणाचें लक्ष जात नाहीं; दिव्यांचा प्रकाश मात्र अशा ठिकाणीं पडतो कीं, सर्व टकमका पाहूं लागतात व आश्चर्यभरित होतात.

या रीतीनें प्रसिद्ध पुरुषांची एक लाट ऊंच चढून जों उतारास लागते, तों खालून दुसरी वर येऊन तिची जागा घेते. वरिष्ठ वर्गांत विवाह न करणाऱ्या स्त्रिया व पुरुष फार; व जे विवाह होतात तेही वयें फार वाढल्यावर. ज्ञानमार्गास लागलेल्यांमध्यें विवाहाची इच्छा कमी असावी हें साहजिकच आहे; संततीचेंही प्रमाण त्यायोगें त्यांमध्यें फार कमी असतें. परंतु खालीं दरिद्री लोकांत पाहूं गेलें तर विवाहाची इच्छा प्रबळ व त्यांचे विवाहही लवकर होतात; पुढें संतति पुष्कळ होते. धान्य स्वस्तें जाहलें कीं विवाहास ऊत येतो, हें पाहून बर्क म्हणे कीं मनुष्यांची उत्पत्ति तोंडावाटे होते ( Man breeds at the mouth ), म्हणजे खायला मिळालें कीं संततीस तोटा नाहीं. ब्रह्मदेवाचे भक्त समाजाच्या तळाशीं आहेत, विष्णूचे भक्त मध्यंतरीं आहेत, पृथ्वीवर अजिंक्य होऊन कैलासवासी होणारे शिवभक्त माथ्यावर आहेत. या अशा तऱ्हेनें युरोपीय समाज आपली शाश्वती राखून बलाढ्य होत आहे. जो पुरुष थोरवीस येऊन जगावर छाप ठेवतो, त्याच्या बापानें किंवा आज्यानें स्वतः हातानें कनिष्ठ प्रतीचें काम करून कुटुंबाचा गुजारा केलेला असतो. सारांश, कनिष्ठ वर्गांत व वरिष्ठ वर्गांत जें अंतर असतें तें फार थोड्या पिढ्यांचें. या वरिष्ठ पायरीवरच्या लोकांस मुलें असल्यास तीं उतारास लागून शहर सोडून क्रमानें खेड्यांत परत जातात. इमर्सन म्हणतो त्याप्रमाणें हें समाजचक्र चालण्यास जेवढी मध्यानुसारी गति असेल तितकी मध्यापसारी गति अवश्य आहे. जो खेड्यापाड्यांत सृष्टीच्या समोर कनिष्ठ प्रतीचीं कामें करितो, सृष्टीवर प्रत्यक्षपणें अन्नोदकाकरितां अवलंबून राहतो, सृष्टीची संगति सोडीत

नाहीं, दुःख, दारिद्य आणि अज्ञान यांनीं व्याप्त असा दिसतो, त्याच्या मेंदूंत व शरीरांत सृष्टि सामर्थ्याचा ठेवा कणांकणांनी क्षणोक्षणीं सांठवीत असते. तो ठेवा संततींत कमीजास्ती प्रमाणानें संक्रमित करण्याची त्यास शक्ति असते. त्या संततींत जो अधिक सामर्थ्यवान् होतो तो खेडें सोडतो, शहरांत जातो. प्रथम बहुधा शारीरिक श्रम विशेषसे करतो, त्याच्या पुढील पिढ्या मानसिक श्रम विशेषसे करितात. त्यांतील एक पिढी उदयास येते; त्या पिढींत मूळचा सामर्थ्याचा ठेवा संपतो, तेव्हां तें पुनः मिळविण्याकरितां व पूर्वजांची वृत्ति अंगीकारण्याकरितां, तिच्या पुढील पिढ्या खेड्यांत परत येतात, नाहीं तर मुळींच नष्ट होऊन जातात. हें असें चक्र आहे; यानें युरोपीय समाजास स्थैर्य आलेलें आहे. अतिरिक्त प्रजेची वाट लावण्याची सृष्टीची ही विलक्षण योजना आहे. कर्मभूमींत आधीं पुण्यसंचय करून देव किंवा देवांचा राजा इंद्र व्हावें; नंदनवनांत कल्पवृक्षाच्या छायेखालीं यथेष्ट सुख अनुभवावें; स्वर्गांगनांशीं विलास करावा; कर्मभूमींतील लोकांवर उपकार करावे, त्यांकडून हविर्भाग घेऊन पोट भरावें, त्यांस पूज्य व्हावें, त्यांचे स्तुतिमंत्र ऐकावे, स्वर्गीच्या सुखाची त्यांस गोडी लावावी; परंतु आपलें पुण्यसामर्थ्य संपतांच कर्मभूमींत येऊन पडावें. समाजाच्या चालू राहटीचें हें आलंकारिक वर्णन आहे. या राहटींत नरकाचीही योजना आहे. ज्यांस तामसी वृत्तीनें, दुर्व्यसनानें, मोहानें, किंवा परोपकाराच्या दुष्ट संवयीनें गांठलें, त्यांचे समाजांत हाल होत असतात; त्यांस कैदेंत टाकून, भ्रष्ट ठरवून, छळ करून, हरतऱ्हेनें निसंतान करून, त्यांनीं जगांतून आपलें अस्तित्व दूर करावें असें

समाजाचें त्यांशीं आचरण असतें. खालीं समाजकंटक कापूनकाढ-ण्याचें काम चालू आहे, वर समाजरचनेचीं उत्कृष्ट फळें व फुलें तोडून त्यांचा आस्वाद घेण्याचें कार्य सुरू आहे.

याप्रमाणें ही घडामोड युरोपीय समाजांत चालली आहे; तींतच त्यांचें स्थैर्य व प्रगति आहे. खेड्यांत बुद्धि पडित असते. सृष्टि-सांनि-ध्यानें आरोग्य येतें. बुद्धि व आरोग्य यांचा खेड्यांत जो संचय होत असतो तो शहरांत जातो, तेथें उद्योगाचे कामास लागतो, व क्रमानें सर्व खर्चून जातो. खऱ्या उपयुक्त सामर्थ्याचा ओघ जोंवर खेड्यांतून शहरांत वाहत आहे तोंवर समाजास धक्का नाहीं. हीच गोष्ट हिंदु समाजास लागू आहे. परंतु हिंदु समाजांत व युरोपीय समाजांत एक मोठा भेद आहे तो असा कीं युरोपीय राष्ट्रांतील सर्व लोक एकजातीय आहेत; व जो उदयास येईल तोच वरिष्ठ जातीचा होतो. यामुळें थोर पुरुष उत्पन्न करण्यांत जें सामर्थ्य खर्च होतें तें कोणत्याही एकाच जातीचें होत नाहीं, सर्वांचें मिळून होतें. कोणत्याही एकाच वर्गाची हानि होत नाहीं, व म्हणून तिचा बोभाटाही नाहीं, या देशांत याहून फार भिन्न स्थिति आढळते.

एतद्देशीयांच्या बुद्धीचा विकास सृष्टिक्रमाप्रमाणें सावकाश होत गेला असता, तर फारसें नुकसान झालें नसतें, परंतु एकदम बुद्धि-परिश्रमांची आवश्यकता जेव्हां उत्पन्न झाली तेव्हां समाजांत बुद्धि-परिश्रमांवर उपजीविका करण्याचा ज्या वर्गाचा प्रघात होता, त्याच वर्गावर विद्येचा सर्व भार पडला. ते वर्ग म्हणजे वरिष्ठ जातीचे होत. या जाति पूर्वी खेड्यांत व शहरांत सारख्याच प्रमाणानें वांटलेल्या होत्या. म्हणजे शहरांतील दशांश लोक वरिष्ठ जातीचे असले तर

खेड्यांतील दशांश लोक वरिष्ठ जातीचे असत. त्याचा धंदा लिहिण्यावाचण्याचा, कारकुनीचा, सावकारीचा, धर्म-कर्में करण्याचा व करविण्याचा, निव्वळ भिक्षेचा किंवा कांहीं न करितां राहण्याचा होता. हीच स्थिति आजमित्तीपर्यंत कायम राहिली असती तर वरिष्ठ जातींचा ऱ्हास वेगानें झाला नसता. परंतु वास्तविकपणें असें घडत आहे कीं वरिष्ठ जाति खेडीं सोडून शहरांत येऊन राहूं लागल्या आहेत. त्यांचा खेड्यांत निर्वाह चालत नाहीं; त्यांस खेड्यांत चैन पडत नाहीं. कारण खेड्यांत दिवसानुदिवस दारिद्र्य वाढत आहे. शेतकऱ्यांचेंच पोट भरण्याचें मुष्कील झालें आहे, तेव्हां त्यांकडून व्यवहाराच्या किंवा धर्मकर्माच्या द्वारें जी वरिष्ठ जातींस प्राप्ति व्हावयाची ती फार कमी झाली आहे. तसेंच खेड्यांत सावकारी करणें म्हणजे अत्यंत त्रासाचें, व वारंवार निर्दयतेचें काम झालें आहे. इनामदार वगैरे जे लोक पूर्वीं खेड्यांत स्थायिकपणें राहत होते, तेही स्वस्थ बसूं नये, कांहीं धंदा करावा, म्हणून शहरांत येत आहेत. जुन्या तऱ्हेचे कांहीं लोक अद्यापि खेड्यांतून असतील, परंतु त्यांचीं मुलें विद्याग्रहणास योग्य होतांच त्यांची शहरांत रवानगी होत आहे. हीं मुलें पुनः खेड्यांत जाऊन स्थायिकपणें राहण्याचा संभव नाहीं. तात्पर्य हें कीं, सृष्टीच्या समोर राहून, सृष्टीचीं बाळकें बनून, बुद्धीस स्वस्थ ठेवून, आरोग्य संपादून, साधेपणानें व संतोषानें आयुष्य घालविणारे लोक वरिष्ठ जातींत आतां राहिले नाहींत. सृष्टीसामर्थ्याचा खर्च व खराबा करणारे मात्र सर्व झाले आहेत, सृष्टीचे अंकावर स्वस्थ पडून सामर्थ्याचा संचय करणारे लोक नाहींसे होत आहेत. खेड्यांत राहण्याचा

प्रसंग सरकारी नौकरीमुळें आला तर तें दुर्भाग्य वाटतें. खेड्यांत परत जाऊन तेथें स्थायिक होण्याचा कोणाचाही विचार दिसत नाहीं. खेड्यांत राहणें भाग झालें तर मुलें तरी शहरांत पाठवून दिलींच पाहिजेत. खेड्यांत राहून तीं गांवढळ होतील, शहरांत गेलीं तर विद्वान् होतील, असें वाटतें. तेथें गेल्यावर तीं कशीं चरकांत सांपडतात तें मागें सांगितलेंच.

गेल्या हजार दोन हजार वर्षांच्या अनुभवानें जो एक सिद्धांत समाजांत रूढ झाला होता तो गेल्या तीस चाळीस वर्षांच्या विद्याव्यासंगानें अगदीं विसरून जात चालला आहे. उत्तम शेती, मध्यम व्यापार व कनिष्ठ नौकरी, असा तो पूर्वींचा सिद्धांत होता. कृषिगोरक्ष्य करणाऱ्या खेडवळांस वैश्य वर्गांत घालून त्यांस वेदविद्येचाही अधिकार दिला व त्यांची योग्यता शहरांतील हरहुन्नरी लोकांहून आमच्या शास्त्रकारांनीं अधिक ठरविली, हें प्रथमदर्शनीं चमत्कारिक दिसतें. परंतु हें त्यांनीं या सिद्धांतास अनुसरून फार दूरदृष्टीचें काम केलें. कृषिगोरक्ष्यास महत्त्व दिलें व या खेडवळ वैश्यांच्या धर्मकर्मांकरितां ब्राह्मणांनींही खेड्यांत जाऊन स्थायिक व्हावें ही योजना केली. शेतकऱ्यांच्या स्थितींतून नागरिक वाण्यांच्या स्थितींत क्रमानें उत्क्रांति होत जावी असाही त्यांचा उद्देश दिसतो. परंतु हल्लीं ती योजना व तो उद्देश व्यर्थ झाला आहे. या सिद्धांतांत ठरविल्याच्या उलट क्रमानें चालण्यांत फायदा आहे असें हल्लीं वरिष्ठ जातींस वाटूं लागलें आहे; म्हणूनच ते खेड्यांतून पळ काढीत आहेत.

पूर्वी कोणी पुरुष उदयास आला तर तो इनाम, जहागीर वगैरे मागत असे. तितक्या योग्यतेचा नसला तर आपला संचितार्थ चार बिघे जमीन विकत घेण्यांत खर्च करीत असे. या रीतीनें आपली प्राप्ति खेड्यांत पाठवून तेथें मालमत्ता करायाची, वृद्धपणीं किंवा फावल्यावेळीं तेथें रहावयास जायाचें, पूर्वीची खेड्यांत जी थोडी-बहुत वडिलोपार्जित जमीन असेल ती राखण्याकरितां विलक्षण खट-पट करायाची—ती हरळीची मुळी शाश्वतची—अशी उपजत-बुद्धीप्रमाणें प्रबळ प्रेरणा गेल्या तीस चाळीस वर्षांपूर्वींपर्यंत लोकांत जागृत होती. त्या वेळचे पेन्शनर खेड्यांत परत जाऊन रहात होते. त्यांच्या बुद्धीची वाढ सावकाशपणें झालेली असल्यानें त्यांची धर्म-श्रद्धा कायम असे. कोठें क्षेत्रीं जाऊन रहावें, कांहीं व्रतनियम आचरावे, यात्रा कराव्या, परमार्थ जोडावा, वेदांतविचार करावा-ही बुद्धि म्हातारपणीं त्यांस सुचून त्या वयीं त्यामध्यें विलक्षण कर्तृत्व दिसे. कारण, खेड्यांतून आले त्या वेळचा साधेपणा शहरांत राहिले तरी गेलेला नसे—बाराबंदीचें रूपांतर शर्टमध्यें त्याच्या काळीं होत नसे—त्यामुळें शहरांत राहिलें काय किंवा खेड्यांत जाऊन आपल्या मालमत्तेची व्यवस्था पाहिली काय, त्यांस सारखेंच होतें. जो कोणी कुटुंबांत पराक्रमी होईल त्यानें खेड्यांत मालमत्ता करून आपल्या-पुढील पिढीस साधें, मग तें आळसाचें कां होईना, आयुष्य घालवि-ण्याची तर्तूद करून ठेवावी, हा पूर्वीचा परिपाठ होता. त्यांत वरिष्ठ जातींचें शाश्वत हित होतें.

गेल्या तीस चाळीस वर्षांत महाराष्ट्र देशांत बरेच पुरुष पुष्कळ योग्यतेस चढले आहेत; त्यांपैकीं कोंकणांतल्या किंवा देशावरच्या

खेड्यांतून मूळ किती आले व पुणें, मुंबई वगैरे मोठ्या शहरांतील स्थायिक कुटुंबांत किती निपजले, हें निश्चित करणें सोपें आहे. खेड्यांतून येणारांचें प्रमाण फार मोठें आहे असें दिसतें व त्यावरून खेड्यांतील आळशी व अविद्वान् वरिष्ठ जातींत बुद्धिसामर्थ्य सांचत असतें या सिद्धांताची सत्यता दृष्टीस पडते. हल्लीं शाळांमध्यें खेडीं सोडून नवीनच आलेल्या मुलांत अधिक तेज दिसतें याचें कारणही तेंच होय. ज्या जातींस बुद्धिसामर्थ्यानें निर्वाह करायाचा आहे, त्यांचा खेड्यापाड्यांत पुष्कळसा भरणा असल्यावांचून निभाव लागा-याचा नाहीं. परंतु तोच हल्लीं अगदीं संपुष्टांत येत चालला आहे.

विनाशकाले विपरीतबुद्धिः! अलीकडील तीस वर्षांत आतां सांगितल्याप्रमाणें जे लोक खेड्यांतून बुद्धीचा सांठा घेऊन शहरांत आले ते आपल्या सामर्थ्यानुरूप विद्या संपादून, अधिकार मिळवून, पैसा कमावूं लागले. युनिव्हर्सिटीच्या द्वारें अतिरिक्त विद्याव्यासंगाचीं त्यांस उत्कृष्ट साधनें मिळालीं. त्यांच्या बुद्धीचा आकस्मिकपणें अत्यंत विस्तार झाला. जेवढा अधिक विस्तार तेवढी तिची खोली मात्र कमी झाली, उथळपणा वाढला. शुद्ध बुद्धिवादाचा पंथ जो युरोपांत तीस वर्षांपूर्वीं म्हातारा होत चालला होता तो या देशांत येऊन तरुणरूप घेऊन विद्वानांस मोह पाडूं लागला. उत्क्रांति-तत्त्वांचा अद्यापिही कोणास फारसा बोध नाहीं, तेव्हां तो यापूर्वीं कोठून असणार? तेव्हांच्या नवीन विद्वानांनीं वडिलांची वृत्ति सोडली; त्यांस खेड्यांत परत जाणें रुचेनासें झालें. त्यांच्या खेड्यां-तील इष्टेटी विक्रीनें किंवा इतर मार्गांनीं नाहींशा होत चालल्या. त्यांनीं शहरांत घरेंदारें खरेदी करण्याचा सपाटा सुरू केला. ते

शहरचे स्थायिक रहिवासी बनूं लागले. ती हरळीची मुळी गेली; भ्रमाचा भोंपळा हातीं आला. नौकरी प्रथम, नंतर व्यापार, शेती असलीच तर तिचें अविच्छिन्न उत्पन्न शहरांत कुटुंब राहून मिळाल्यास बरें, नाहीं तर फुंकून टाकली. याप्रमाणें वरिष्ठ जातीच्या विद्वान् लोकांस नवी बुद्धि होत चालली. संपत्ति खेड्यांत जाईनाशी झाली, तीं भिकार होत चाललीं, मग तेथून वरिष्ठ जातींचीं कुटुंबें उठून जाऊं लागलीं.

सुमारें तीस वर्षांपूर्वी हें जें ग्रामीणांचें पौरीभवन होऊं लागलें, त्याचेंच नांव सामाजिक सुधारणा हें आहे. शुद्ध बुद्धिवादाच्या नादानें त्या वेळीं हल्लींच्या सर्व घातक सुधारणांस आरंभ झाला व वरिष्ठजातीयांच्या ऱ्हासास आरंभ झाला. पहिली सुधारणा तीच सर्वांत घातक, व ती खेडीं सोडून शहरांत स्थायिक होण्याची. दुसरी सुधारणा द्रव्योपार्जनाकरितां पिढीमागें पिढी विद्येच्या चरकांत घालून तिची अमर्याद व अकालिक वाढ करूं पाहण्याची. तिसरी सुधारणा शहरांत राहून सर्व साधेपणा सोडून देण्याची व पुष्कळ मालमत्ता जंगम स्थितींत राखण्याची. (विद्वानांचीं मुलें मंद निघून, जंगम जिनगी डोळ्यांपुढें पाहून चैनीस व दुर्व्यसनास लागलेलीं व त्या चैनीच्या पायीं प्रथम जंगम व नंतर स्थावर जिनगीचा फन्ना उडवून कंगाल झालेलीं जिकडे तिकडे दिसत आहेत. ज्यांनीं शहरांत कुटुंबें स्थायिक केलीं, त्यांपैकीं फारच थोड्यांचीं मुलें कुटुंबास ऊर्जित दशेस आणण्याच्या स्थितींत आहेत.) चवथी सुधारणा धर्मास मोठा धक्का देऊन दुर्बळ करून बुद्धिवादानें नास्तिकता उत्पन्न करण्याची. या सुधारणेंत अनेक दुसऱ्या सुधारणांचा संग्रह होतो.

जातिभेद मोडण्याचा, मूर्तिपूजा बंद पाडण्याचा, धार्मिक कृत्यांचा उपहास करण्याचा, वगैरे अनेक प्रयत्न धर्मनाशाच्या थोरल्या सुधारणेचीं अंगें आहेत. या सर्व बुद्धि-प्रयुक्त सुधारणांमध्यें दूर-दृष्टि नाहीं; अहंकाराचें वारें भरून त्यांस फुगारा आला आहे. वरिष्ठ-जातीयांची त्यामुळें आत्मघातक मार्गाकडे प्रवृत्ति झालेली आहे. सर्वांचा ऱ्हास संततींत उत्तमपणें प्रगट होत आहे.

शहरांतल्या स्थायिक वासानें जे मनुष्याच्या शरीरावर व मनावर परिणाम होतात, ते बहुतेक अनिष्ट आहेत. शहरांत कोंडल्या जागेंत रहावें लागतें, शुद्ध हवेंत जितका वेळ जावा तितका जात नाहीं. शहरांत सभ्यतेचे नियम अधिक कडक, त्यामुळें शरीर अधिक आच्छादित राहातें, तें नाजूक होतें व ऋतुमानाप्रमाणें त्याची काळजी घेण्यांत थोडी चूक झाली कीं आरोग्यास लहानमोठा धक्का बसतो. शहरांत खाण्यापिण्यांत वारंवार अपरिमितपणा होतो; अति गोड, अति मसालेदार व ( अपरिचितत्वामुळें ) अपाच्य, असें अन्न वारंवार खाण्यांत येऊन कोठा बिघडतो; व अशी स्थिति अनेक व्याधींस कारण होते. विद्याव्यासंगी लोकांस आहाराच्या मानानें शहरांत श्रम कमी पडतात; जेवण चमचमीत व काम पुळपुळीत ही स्थिति पुष्कळांची असते. जेथें लोकवस्ती दाट, तेथें सहजगत्या रोगाचें प्राबल्य असावयाचें; इकडे प्रकृति क्षीण करीत रहावें, तिकडे औषधें घेत असावें; जीव शरीरांत कृत्रिमपणें राखण्याचा प्रयत्न नित्य करीत राहिलें पाहिजे. जसजसें शहर मोठें असेल तसतसे चैनीचे पदार्थ तेथें अधिक विपुल असावयाचे; दुर्व्ययांत व दुर्व्यस-नांत पडण्याची इच्छा अधिक प्रबळ व्हावयाची. स्वतःच्या सुख-

समृद्धीकरितां कुटुंबाची हेळसांड होण्याचे प्रसंग कर्त्या पुरुषावर शहरांत फार येतात. तसेंच जो कर्ता पुरुष त्यासच अतिशय विवंचनांचा ताप असतो; त्याचीं मुलेंमाणसें त्यास मदत करण्यास नालायक असतात; बुद्धीचें काम शेतीच्या कामासारखें नाहीं, त्यांत सर्वांचा उपयोग होऊं शकत नाहीं. याप्रमाणें हीं अनेक कारणें शहरवासी मनुष्याची प्रकृति आंतून क्षीण व पोकळ करण्यास नित्य नित्य कारण होतात. स्वतः मनुष्य औषधपाणी घेऊन आपला बचाव करून राहील, परंतु जें आरोग्याचें तत्त्व मनुष्याच्या शरीरांतून गेलें तें संततींत उतरण्याचा संभव कोठें राहिला? ज्या बुद्धीस वडिलांनीं वैकल्य आणिलें, ती चिरंजीवांत निर्दोषपणें कशी उतरेल? या कारणानें पुरुषाच्या बुद्धींत व आरोग्यांत जीं व्यंगें उत्पन्न होतात तीं संततींत अवतरतात, दर पिढीस त्यांचीच वृद्धि होत जाते व अखेरीस कुटुंबाचा निर्वंश होतो.

बुद्धीचे अतिरिक्त परिश्रम व शहरची वस्ती, यांपैकीं एक एक कारणही कुळास निसंतान करण्यास समर्थ आहे; मग हीं दोन्ही जेव्हां कोणत्याही जातींत उत्पन्न होतात, तेव्हां ती जात अवश्य विनाशपंथास लागेल यांत संशय नाहीं. सर्व वरिष्ठ जाती या पंथास लागल्या आहेत. परकीयांच्या दृष्टीनें आपण सुधारलेले दिसलों व आपलें वर्तन त्यांस आवडलें, म्हणजे खरी सुधारणा झाली, खरें सद्वर्तन झालें, अशी इंग्रजी विद्येनें समजूत करून दिली आहे. या अनुकरणांत जें काय होईल तें होवो, असा सर्वांचा निग्रह होत आहे. त्या कारणानें संततीस बुद्धिश्रमांपासून

विश्रांति मिळावी हा विचार प्रबळ होत नाहीं, जें द्रव्य मिळेल तें आपणां स्वतःस सजविण्यांत, बायकामुलें सजविण्यांत, घर सजविण्यांत किंवा विचारस्वातंत्र्य प्रगट करणाऱ्या दुर्व्यसनांत व दुरुपभोगांत खर्च होऊन जातें; व एकंदरीनें पुढील संततीच्या मागचा बुद्धिपरिश्रमाचा कांच कालगतीनें वाढत जातो. हा आधुनिक सर्व सुधारणांचा निश्चित परिणाम आहे. अशा वर्तनानें नौकरींतून व्यापारांत जाण्यास जें भांडवल पाहिजे व जी इच्छा पाहिजे तीदेखील उत्पन्न व्हावयाचा संभव नाहीं, मग शहरवाशाचा खेडवळ होण्याचें तर लांबच राहिलें!

## सुधारणा सुचविण्यांत केवढी सावधगिरी राखणें जरूर असतें ?

ज्या युरोपीयांस आपलें वर्तन व आपली सुधारणा पसंत पडावी म्हणून आमचा प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें प्रयत्न आहे, ते आमचे हितचिंतक आहेत खरे, परंतु शास्त्रज्ञ नाहींत, किंवा दूरवर विचार पोंचविणारे नाहींत, किंवा आमचीं सुखदुःखें सानुकंपपणें पहाणारे नाहींत, हीच मोठी दुर्भाग्याची गोष्ट आहे. त्यांचे सर्व विचार कोते पडतात, त्यामुळें बाह्य वर्तनाबद्दल ते इकडे शाबासकी देत असतात, अंतर्गत बुद्धि-वैकल्य पाहून तिकडे तिरस्कारयुक्त होतात. या अशा लोकांहून जे अधिक विचारी त्या लोकांस पसंत पडेल अशा तऱ्हेनें आपणांस वागलें पाहिजे. ज्यामध्यें बिलकुल दुराग्रह नाहीं असा इमर्सनसारखा मनुष्य आपणांसंबंधानें काय

देणें कठीण जाईल. केवळ सामर्थ्य व महत्त्वाकांक्षा याच्या दृष्टीनें बोलावयाचें तर मराठ्यांचें राज्य इंग्रजांनीं घेतल्याबद्दल त्यांचा राग न येतां, हातचें राज्य गमावण्याचा जो नादानपणा मराठ्यांनीं दाखविला त्याचा मात्र राग येतो खरा.

मराठ्यांच्या मानानें इंग्रजांना राज्य मिळविण्याला किती तरी अधिक अडचणी होत्या हें कोणीही कबूल करील. इंग्रज सहा हजार मैलांवरून हिंदुस्थानांत आले; मराठे आपल्या देशांत आपल्या घरींच होते. इंग्रजांना सर्व मुलुख परका होता; त्यांना मुद्दाम प्रत्यक्ष प्रवास करून माहिती मिळवून नकाशे काढल्याशिवाय त्या मुलखाचा परिचय होणें शक्य नव्हतें. मराठ्यांना सर्व मुलुख खडान्‌खडा माहीत होता; ज्या अवघड वाटा, दर्‍या, खोरीं, जंगलें मराठ्यांच्या नित्य पायाखालचीं तीं हुडकून काढणें व त्यांतून फिरणें हें इंग्रजांना जवळ जवळ अशक्य होतें. इंग्रजांचा पायच मराठी मुलखाला लावूं देऊं नये असा मराठ्यांनीं प्रथम निर्धार केला असता तर इंग्रजांच्या सत्तेचें बीज इकडे रुजलें नसतें; मग त्याचा एवढा मोठा प्रचंड वृक्ष होण्याचें तर दूरच! विलायती मालच मुळीं आपणास नको असें मराठ्यांनीं प्रथमपासून ठरविलें असतें म्हणजे इंग्रज व्यापार कसचा करितें? निदान त्यांच्या व्यापारावर जबरदस्त जकाती बसविल्या असत्या तरी व्यापार किफायतशीर होत नाहीं असें पाहून लवकरच गाशा गुंडाळला असता. इंग्रज व्यापारी पदरीं फौज ठेवूं लागले असें आढळून येतांच तरी मराठे सावध कां झाले नाहींत? इंग्रजी सत्तेच्या उंटाचें पिल्लूं त्यांच्या डोळ्यांसमोर वाढत होतें तें त्यांना कां दिसूं नये? आणि दिसल्याबरोबर त्यांनीं त्याला घरांतून घालवून

देण्याचा कां प्रयत्न करूं नये? इंग्रजांच्या जवळ बंदुकी, तोफा वगैरे लष्करी सरंजाम जमत चाललेला पाहून मराठ्यांनींही ताबडतोब असा सरंजाम आपला आपण तयार करण्याचे कारखाने कां काढूं नये? हत्यारांचा कायदा तेव्हां खचित नव्हता! युरोपियन राष्ट्रें हिंदी लोकांस हत्यारें विकण्यास एका पायावर तयार होतीं, व इंग्रजांशिवाय इतर अनेक युरोपियन लोक मराठ्यांच्या पदरीं नोकर म्हणून राहून त्यांचें सैन्य कवाईत शिकवून तयार करण्यास, व तोफा-बंदुकांचे कारखाने काढून चालविण्यास तयार होते. इंग्रज सहा हजार मैलांवरून हिंदुस्थानास आले तसें त्यांचें उदाहरण पाहून धाडस करून मराठ्यांना युरोपास जाऊन हिंदुस्थानांत उपलब्ध नसणाऱ्या विद्या शिकण्यास, स्नेही मिळविण्यास व व्यापार संपादण्यास नको कोणीं म्हटलें होतें? इंग्रजांच्या मनांत राज्यलोभ कितीही प्रबळ असता तरी त्यांच्या पदरीं लष्करभरतीला हिंदी लोकच मिळाले नसते तर ते काय करणार होते? इंग्रज जर इंग्रजांविरुद्ध लढण्याला मराठ्यांना मिळाले नाहींत तर मराठे तरी मराठ्यांविरुद्ध लढण्याला इंग्रजांना कां मिळावे?

इंग्रजांच्या फौजेंत शेंकडा विसांहून अधिक इंग्रज शिपाई केव्हांही नव्हते; शेंकडा ऐंशी हिंदीच होते. इंग्रजांना एकमेकांविषयीं आपलेपणा वाटत होता तसा हिंदी लोकांविषयीं हिंदी लोकांना, निदान हिंदूंविषयीं हिंदूंना, त्यांतूनही निदान मराठ्यांविषयीं तरी मराठ्यांना, कां वाटूं नये? पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, मराठ्यांच्या भांडणांत जर मराठ्यांनीं आपण होऊन इंग्रजांना घेतलें नसतें तर नसतें भांडण उकरून काढून, किंवा विनाकारण म्हणजे केवळ

विजिगीषेनें मराठ्यांच्या राज्यावर स्वारी करून, त्यांचें राज्य जिंकण्यास इंग्रजांना आणखी तीनचारशें वर्षेंही कदाचित् पुरलीं नसतीं! उत्तरहिंदुस्थान मोंगलांनीं वेडेपणामुळें इंग्रजाना दिलें असें जरी घेऊन चाललें तरी अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत यमुना नदीच्या दक्षिणेस इंग्रजांचा एक वीतभर देखील मुलुख नव्हता. येऊन जाऊन पश्चिमकिनाऱ्यावर एक मुंबई, सुरत वगैरे ठाणीं आणि पूर्वकिनाऱ्यावर थोडासा मुलुख इतकाच काय तो त्यांच्या हातीं होता. असें असता टिपूविरुद्ध मदत करून इंग्रजाना शेंकडों मैलांचा मुलुख कोणीं मिळवून दिला? मराठ्यांनींच ना? निजाम व मद्रास इलाख्यांतील मुसलमान यांनीं इंग्रजांस घरांत घेतल्याचें आपण एक वेळ सोडून देऊं; पण उत्तरेस यमुना नदी, ईशान्येस कटक संबळपूर, पूर्वेस पूर्वसमुद्र, आग्नेयीस कावेरी नदी, दक्षिणेस म्हैसूर, नैऋत्येस मलबार, पश्चिमेस पश्चिमसमुद्र, व वायव्येस राजपुताना एवढ्या प्रचंड क्षेत्रांत अगदीं अठराव्या शतकाच्या मध्यभागापर्यंत इंग्रजांना पाय ठेवण्यास तरी जागा काय होती? अशी स्थिति असतां त्यांना आपल्या भांडणांत न्यायाधीश किंवा मदतनीस म्हणून मराठ्यांनीं कां घेतलें?

या प्रचंड मुलुखांत सर्व मराठ्यांचें राज्य होतें. सर्व मुलुख एकाच छत्रपतीखालीं होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. पेशवे, शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले आणि पटवर्धन वगैरे मराठे ब्राह्मण सरदार औपचारिकरीत्या कां होईना पण एकाच राजाचा अम्मल मानीत होते. ते सर्व एकाच दौलतीचे आधारस्तंभ असून दौलत एकदां का ढांसळली तर ती सर्वांच्याच अंगावर कोसळून पडणार अशी भीति

असतां व ती सांवरून धरली तर त्यांत सर्वांचेंच कल्याण व सर्वांचीच कीर्ति हें माहीत असतां, मराठ्यांनीं आपल्या राज्यांत इंग्रजांचा प्रवेश कां होऊं दिला? एखादा इंग्रजांकडे गेला असतां बाकीचे सर्व जरी मिळून वागते तरी सर्व बंदोबस्त झाला असता. इंग्रजांना, मुंबई, मद्रास, कलकत्ता अशा दूरदूरच्या तीन ठिकाणांहून कारस्थान करावें लागे. मराठे सरदार यापेक्षां एकमेकांच्या पुष्कळच जवळ होते. मराठे जर एकमतानें वागते तर इंग्रजांचें नुसतें टपालही या मुलखांतून फिरूं शकलें नसतें. ते एकमतानें वागते तर इंग्रजांना मुळीं सैन्यच मिळालें नसतें; त्यांनीं परक्या लोकांचें सैन्य जमविलें असतें तरी त्याचा प्रवेश मराठी मुलखांत झाला नसता; प्रवेश झाला असता तरी त्याला रसद मिळाली नसती व छापे पडून सैन्य कापून निघालें असतें! कलकत्त्याहून मुंबईकडे किंवा मद्रासेहून मुंबईकडे इंग्रजांचें सैन्य यावयाचें तें समुद्रमार्गानें फारसें कधीं आलें नाहीं. जहाजांचा एवढा मोठा काफिला त्यांच्याजवळ कधींच नव्हता. त्यांच्या सैन्याच्या सर्व हालचाली मराठ्यांच्या मुलखांतून खुशाल होत व मराठे त्या होऊं देत! पण तेच सर्व मराठे एकविचारानें वागते तर इंग्रजांचें सैन्य काय पण चिटोरेंसुद्धां मराठ्यांच्या मुलखांतून जाऊं शकलें नसतें. असें झालें असतें तर इंग्रज मराठ्यांचें राज्य घेण्याच्या भानगडींत न पडतां, राज्य मिळविण्याच्या भानगडींत आपण पडूं नये असें म्हणणारा ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांत जो एक पक्ष होता त्याचाच विजय झालेला दिसला असता. पण इंग्रजांनीं मराठ्यांच्याच साहाय्यानें मराठ्यांस जिंकलें! त्यांनीं थोडासा वेलायती माल व पुष्कळशी अक्कल यांच्या भांडवलावर हिंदुस्थानचा

व्यापार व हिंदुस्थानचें सर्व राज्य मिळविलें ! त्यांनीं मोंगलांसारख्या जीर्ण झालेल्या राज्यावरच घाला घातला असें नाहीं, तर तरतरीत नव्या दमाच्या महत्त्वाकांक्षी व उदयोन्मुख अशा मराठ्यांचेंही राज्य जिंकून घेतलें तें फक्त दोन गोष्टींच्या जोरावर; एक, स्वतःची अक्कल व हिंमत, आणि दुसरी, मराठ्यांची अदूरदृष्टि व आपापसांतली फूट !

## मध्यवर्ती सत्तेचा अभाव

शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या वेळीं राजा व अष्टप्रधान एवढींच राज्याचीं अंगें होतीं. राज्य एकसत्तात्मक असून अष्टप्रधान हे सल्ला देणारे पण जबाबदार कामगार होते. शाहूच्या कारकीर्दींत सरंजामी सरदार प्रथम उत्पन्न झाले. या सरदारांकडे आपआपल्या प्रांतांतील दिवाणी, मुलकी व लष्करी व्यवस्था असे. ही व्यवस्था करून उरलेली, पण आगाऊ जमाबंदीनें ठरलेली, रक्कम त्यांनीं छत्रपतीला द्यावयाची असे. सरंजामी सरदार उत्पन्न व्हावयाला व मराठ्यांची सत्ता स्वराज्याबाहेर पसरण्याला एकच गांठ पडली, असें कोणी इतिहासज्ञ म्हणतात. पण आधीं सरंजामी सरदार उत्पन्न होऊन मग राज्याचा विस्तार बाहेर वाढण्यास सुरुवात झाली असें नसून, बाहेर राज्यविस्तार होण्यास सुरुवात झाल्यामुळेंच सरंजामी सरदारकीची सुरुवात झाली हें म्हणणें अधिक संयुक्तिक वाटतें. शाहूच्या सनदेची वाट न पाहतां दाभाडे, बांडे, भोसले, आंग्रे वगैरे सरदारांनीं मोंगली राज्याचे लचके तोडण्यास आधींच सुरुवात केली होती; व जिंकलेल्या मुलखांत ते स्वतंत्रपणें कारभारही करूं लागले होते. अशा सरदारांना आपल्या पदरीं ठेवण्यांत छत्रपतीचा फायदाच होता, व हे सरदारही छोटे असल्यामुळें त्यांना छत्रपतीच्या

सत्तेचें रक्षण हवें होतें. यामुळें सरंजामी सरदारांचें मांडलिक-मंडळ तयार झालें अशा वेळीं स्वतः शिवाजी असता तरी त्याला सरंजामी पद्धति अंगीकारण्याचें टाळतां आलें असतें कीं नाहीं, याची शंकाच वाटते. युरोपांतील 'फ्यूडल सिस्टीम' चा उगमही असाच झालेला होता. मराठ्यांमध्यें आनुवंशिक असे मुख्य दोन गुण—किंवा वाटेल तर दोष म्हणा—होते. एक स्वातंत्र्यप्रियता, व दुसरा वतनाची आवड. युरोपांतही प्रथम फ्यूडल पद्धति सुरू होण्यास हेच दोन मनोधर्म कारणीभूत झाले. फ्यूडल पद्धतीचा नायनाट होण्यास युरोपांत कित्येक शतकें लागलीं व महाराष्ट्रातही इतर कोणाचा संबंध न येतां मराठ्यांची राज्यघटना स्वतंत्रपणें उत्क्रान्त होण्यास शतकांचा अवसर मिळता तर, इकडेही कालान्तरानें ही पद्धति नष्ट होऊन एकतंत्री राज्यसत्ता प्रस्थापित झाली असती. पण हा उत्क्रान्तीचा प्रयोग निर्वेध रीतीनें शेवटास गेला नाहीं. अष्टप्रधानांवर पेशवा नेमणें हीं या उत्क्रान्तीचीच एक पायरी होती. आणि प्रबळ छत्रपति व प्रबळ पेशवा अशांची जोडी बरेच दिवस लाभती तर, सरंजामी पद्धतीस कदाचित् लवकरच आळा पडला असता. पेशव्यांनीं घराबाहेर अंगीकारलेल्या उद्योगाच्या वेळीं घरीं छत्रपतींच्या एकतंत्री व जोरकस सत्तेचा त्यांना आधार मिळता तर नवे जुने सरदार आपला नोकरपेशा इतक्या लवकर विसरले नसते. पेशव्यांना मुख्य आधार आपल्या कर्तृत्वाचा असल्यामुळें त्यांनीं हातची पेशवाई जाऊं दिली नाहीं, हीच मोठी गोष्ट केली म्हणावयाची स्वतः राजा तरतरीत, कर्तृत्ववान, स्वाभिमानी असता तर त्याला सरंजामी सरदारांच्या सत्तेला व अधिकारातिक्रमणाला आळा घालणें अधिक

सोपें झालें असतें. किंबहुना, पेशवेही झाले इतके स्वतंत्र झाले नसते. खुद्द मुख्य प्रधानालाच जर स्वातंत्र्य नाहीं तर नुसत्या सरदारांना तें कसें मिळणार ?

वरील इतिहासज्ञ म्हणतात, " शाहू व बाळाजी विश्वनाथ यांच्या कारकीर्दींत महाराष्ट्रांतील राज्यपद्धतीला इंग्लंडांतील हल्लींच्या संयुक्त साम्राज्याचें स्वरूप आलें होतें; फरक इतकाच कीं, इंग्लंडांतील वंशपरंपरेनें चालणाऱ्या राजसत्तेला राष्ट्रांतील लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधींच्या आणि प्रतिनिधींतून नेमलेल्या अनेक प्रधानमंडळांच्या सत्तेचें बंधन आहे; आणि दुसरे पक्षीं पेशवाईच्या वेळीं सर्व सत्ता एका मुख्य प्रधानांत सांठविली गेली होती. " पण आमच्या मतें हा फरकच इतका मोठा आहे कीं, त्यामुळें पेशवाईच्या वेळच्या मराठेशाहीस संयुक्त साम्राज्य असें नांवच देतां येत नाहीं; व तें देतां आलें तरी या दोन साम्राज्यांचें साम्य सिद्ध होऊं शकत नाहीं. एक निव्वळ एकतंत्री राज्यसत्ता तरी चालते किंवा निव्वळ लोकप्रतिनिधिसत्ता तरी चालते; पण निव्वळ एकतंत्री प्रधानसत्ता कधींही चालूं शकत नाहीं ! तख्तनशीन राजवंशीय व्यक्तीबद्दल जो आदर नोकर लोकांच्या मनांत असतो तो प्रधान कितीही गुणी किंवा प्रबळ असला, तरी त्याबद्दल असूं शकत नाहीं. दुसरे पक्षीं, प्रातिनिधिक पद्धतीची राज्यघटना असल्यास अशा राज्यांत प्रधानाला जें जनतेचें पाठबळ असतें तेंही पेशव्यांना नव्हतें. अशा रीतीनें इकडे छत्रपतीचा जोर नाहीं व तिकडे जनतेचाही जोर नाहीं अशा स्थितींत अगदीं निरुंद पायावर पेशव्यांच्या सत्तेची इमारत उभारली गेली होती. यामुळें स्वतःला आधार म्हणून त्यांना सरंजामी सरदारांचें

ंडळ उत्पन्न करावें लागलें; पण तें सरदारमंडळच पेशव्यांना अखेर ोईजड झालें ! या सरदारांना पेशव्यांची 'हुकूम करितों' अशा ाकारची भाषाच कधीं नव्हती. कोणतीही गोष्ट पेशव्यांनीं सुचवावी । ती सरदारांनीं अंमलांत आणली तर तें त्यांचें भाग्य ! त्यांना ;कूम करण्याचा पेशव्यांना अधिकारच नव्हता. अर्थात्, हुकूम ≀रण्याचाच अधिकार नाहीं तर हुकूम अमान्य केल्यावर शिक्षा ्याचा तरी अधिकार कोठून येणार ? पेशव्यांचा हुकूम अमान्य ाल्याचीं उदाहरणें सांपडतील; पण एकाद्या सरंजामी सरदाराच्या ;यातींत त्याला पदच्युत केल्याचें उदाहरण क्वचितच सांपडेल. वत: पेशवे हे जोंपर्यंत सेनापति होते, व फौज घेऊन स्वारीवर ाऊन पराक्रम करीत, तोंपर्यंत त्यांचा अधिकार थोडा तरी चाले; ण थोरल्या माधवरावांच्या पश्चात् हा प्रकार संपून सत्तेचीं सूत्रें ःडणविसांच्या हातीं आलीं तेव्हां मध्यवर्ती सत्तेची आणखी एका ायरीनें अवनति झाली. जी स्वामिनिष्ठेची भावना शाहूसंबंधानें ोती ती माधवरावासंबंधानें उरली नाहीं; व जी माधवराव पेशव्या- ंबंधानें होती ती नानाफडणविसासंबंधानें उरली नाहीं. मग कोंक- गस्थ भानू नांवाच्या फडणविसाऐवजीं देशस्थ बोकील नांवाचा ःडणवीस किंवा कारभारी असता तरी तीच स्थिति व्हावयाची. अशा ीतीनें घड्याळांतील मुख्य स्प्रिंग किंवा कमान शिथिल व निर्जीव ाल्यामुळें छत्रपतींची सत्ता सरंजामी सरदारांपर्यंत वाटवाटून विभा- ाली गेली; व मराठेशाहीला संयुक्त साम्राज्याचें स्वरूप न राहतां केवळ एका तात्पुरत्या संघाचें स्वरूप आलें. खरें संयुक्त स्वराज्य म्हणजे फेडरेशन, व संघ म्हणजे कान्फिडरसी. फेडरेशन व कान्-

फिडरसी यांतील भेद फार महत्त्वाचा आहे. दोन्ही घटना अनेक अवयवांच्या मिळून बनलेल्या असतात; पण फेडरेशनमध्यें हे अनेक अवयव अनेक अंगांनीं एकत्र जखडले गेलेले असतात व एकजीव झालेले असतात. याच्या उलट कान्‌फिडरसीमध्यें हे अनेक अवयव फक्त एका अंगानें कोठें तरी एका बिंदूशीं एकमेकांना चिकटलेले असतात; म्हणून फेडरेशनपेक्षां कान्‌फिडरसी ही थोड्याशा धक्क्यानें मोडूं शकते. एकतंत्री राज्यपद्धतींत जें काम राजनिष्ठेच्या भावनेनें होतें तेंच फेडरेशनमध्यें ( संयुक्त स्वराज्यांत ) सामुदायिक प्रेमाच्या भावनेनें घडून येतें. अनेक हे एकजीव झाले म्हणजे एकच होत. संघ किंवा कान्‌फिडरसी यांत नैष्ठिक प्रेम असत नाहीं. तात्पुरता स्वार्थ हेंच काय तें संयोगकारण असतें; पण हा स्वार्थ सात्त्विक किंवा मोठ्या दृष्टीचा नसल्यामुळें तो वाटेल तेव्हां थोड्या कारणानें आपलें रूप बदलूं शकतो. मराठेशाहींत सरंजामी सरदार-मंडळाच्या पुढच्या पुढच्या दिवसांत प्रत्येक सरदार अधिकाधिक जड बुडाचा होऊं लागला. अर्थात् पेशव्यांच्या फडणविसाची बुद्धि किंवा त्याचा मानीव अधिकार अशा नाजुक मध्यवर्ती आधारावर लोंबत राहणारें हें सरंजामी सरदार—मंडळाचें ओझें फार दिवस कसें लोंबत राहणार ? मराठ्यांचें राज्य शिवाजीच्या वेळच्या मर्यादेबाहेर मुळीं गेलेंच नसतें तर हा सगळा घोंटाळा झाला नसता असें या बाबतींत कित्येकांस वाटतें; पण त्यावर आमचें म्हणणें इतकेंच कीं, अशा प्रकारचीं आंगठीवरील खड्यासारखीं लहानशीं राज्यें हिंदु-स्थानांत दुसरीं पुष्कळ होतीं, पण तीं तरी अखेर कोठें टिकलीं ? खरी गोष्ट हीच कीं, मराठेशाही विस्तार पावली यांत तिची खरी

चूक नव्हती, तर त्या विस्ताराबरोबरच तिजमध्यें अंतःस्थ सुदृढता यावयास पाहिजे होती ती आली नाहीं. ती सुदृढता केव्हांही एक मध्यवर्ती प्रबळ राजसत्ता किंवा सर्वव्यापी प्रबळ लोकसत्ता यांपैकीं कोणत्या तरी एका सत्तेनें येऊं शकते. मराठेशाहीच्या अखेरच्या दिवसांत यांपैकीं एकही सत्ता प्रबळ नव्हती; या गोष्टीचा दोष जितका ब्राह्मण पेशव्याकडे, तितकाच सरंजामी मराठे सरदारांकडेही येतो. पेशव्यांनीं केलेली चूक मराठे सरदारांनीं दुरुस्त करण्यास काय हरकत होती ? त्यांनीं वाटेल तर राज्यक्रान्ति करून पेशवाई गलथी घालून हवें तर मराठे—मंत्रिमंडळ स्थापावयाचें होतें; पण मराठेशाही मोडूं द्यावयाची नव्हती. तें त्यांनीं तरी कोठें केलें ?

---

## लक्ष्मण रामचंद्र पांगारकर

### ( " मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन " )

येथवर ज्ञानेश्वरादि संतांवर पंतांच्या ज्या आर्या आहेत त्यांचा विचार झाला. आतां राहिले दोन. ते वामन व मुक्तेश्वर हे होत. या दोघांकडे वळण्यापूर्वीं एका महत्त्वाच्या मुद्द्याचा विचार करायचा आहे. अलीकडच्या कांहीं लोकांना तुलनात्मक यंत्रांतून पाहण्याची संवय झाली आहे. ही पद्धत कांहीं वाईट नाहीं, पण दोन कवींची तुलना करण्यापूर्वीं त्यांच्या काव्यांत, हेतूंत व रचनेंत कांहीं साम्य असलें पाहिजे. साम्याशिवाय भेद नाहीं व भेदाशिवाय तुलना होऊं शकत नाहीं. दोघेही ग्रंथकार आहेत एवढ्यावरच त्यांची तुलना होऊं शकत नाहीं. प्रो. परांजपे यांनीं 'केकावली'च्या प्रस्तावनेंत मोरोपंतांची कांहीं कवींशीं तुलना केली आहे. ' कालीदास व मोरोपंत, ' ' तुकाराम व मोरोपंत,' ' रामदास व मोरोपंत ' हीं सदरें पाहतांच मला हसूं आलें ! मोरोपंतांचें कोणत्या तऱ्हेचें साम्य तुकाराम व रामदास यांच्याशीं आहे, कीं ज्यामुळें प्रो. परांजप्यांना त्यांची तुलना करावीशी वाटली? अधिकार, हेतु, भाषापद्धति व विषयांची निवड या चारहीं बाबतींत मोरोपंत तुकारामरामदासांपेक्षां इतके विलग आहेत कीं, कोणत्याही मुद्द्यावर त्यांची तुलना होऊं शकत नाहीं ! रामदास व तुकाराम हे वैराग्य, ईश्वरनिष्ठा, व ब्रह्मज्ञान या गोष्टींत अगदीं एका अधिकाराचे असून त्यांचीही तुलना होणें कठीण आहे. समर्थांचा मुख्य हेतु ब्राह्मणमंडळ्या व संतमंडळ्या मेळवाव्या; प्रपंचांत राजकारण व परमार्थांत पंचतत्त्वविवरण त्यांस शिकवून प्रपंचपरमार्थ

दोन्ही साधायची पात्रता त्यांत आणावी; ब्राह्मण्य रक्षून मराठा तेवढा एक करावा व कष्ट करून म्लेंच्छांवर घसरावें; उदंड कष्ट करून इह-पर साधावे, सकळ लोक राजी राखून, बहुतांचें मनोगत हातीं घेऊन तणाव्याचे समुदाय करावे व रामोपासना अखंड गाजवावी. समर्थांनीं बारा वर्षें तपोनुष्ठान व बारा वर्षें भरतखंडभर तीर्थयात्रा करून स्वतःचें आत्मतेज इतकें वाढविलें होतें कीं, ‘ असाध्य तेंचि साधण्याचें ’ सामर्थ्य त्यांनीं अंगीं आणलें होतें. राष्ट्राचा इहपर साधून देणारा खरा नायक समर्थांसारखा विरळाच सांपडेल. समर्थांचें कर्तव्य व सामर्थ्य असें व्यापक असल्यामुळें त्यांच्या भाषेला अर्थात् अलंका-रादिकांनीं नटायला मुळीं सवडच नव्हती. त्यांचा जबाब साधा, रोकडा व ठणठणीत. समर्थांनीं कविता म्हणून ग्रंथ रचले नाहींत, यामुळें साहित्यशास्त्राचा गंधही त्यांच्या ग्रंथांला येत नाहीं. ते राष्ट्रीय शिक्षक होते व त्याप्रमाणें त्यांनीं आपले ग्रंथ कर्म व उपासना यांची राष्ट्रांत वृद्धि होईल अशाच हेतूंनीं लिहिलेले आहेत. तर समर्थांचा अवतारहेतु इतका रेखल्यासारखा भिन्न असल्यामुळें त्यांची विषयाची निवड व भाषापद्धतीही त्याला अनुसरूनच आहे. अशा पुरुषाची मोरोपंतांशीं तुलना कशी होणार ? तशीच गोष्ट तुकारामाची आहे. तुकारामानें आपल्या लोकोत्तर वैराग्यशीलतेनें व तीव्रतम मुमुक्षेनें एका जन्मांत सिद्धि मिळविली. त्यांच्या अभंगांचें ओज कांहीं असामान्य आहे, याचें कारण हें कीं, चित्तवृत्तींच्या लाटांबरोबर ते बाहेर आलेले आहेत, व त्यांच्या सर्व अवस्थांचा प्रकाश त्यांच्या अभंगदर्पणांत पडला आहे. तुकोबांच्या सर्वाधिक लोकप्रि-यतेचें कारणही हेंच आहे कीं, प्रत्येक मुमुक्षूला आपल्या चित्तवृत्ति

पडताळून पहायला त्यांचे अभंग हें उत्तम साधन आहे. अवघ्या दृश्य सृष्टीचा पूर्ण विसर पडला आहे, ‘ विटंबो शरीर होत कां विपत्ती । परी राहो चित्तीं नारायण ’ अशा दृढ संकल्पामुळें विठ्ठल-भजनाशिवाय जाणारा प्रत्येक क्षण ज्याला टोंचीत आहे, अखंड हरिस्मरणानें पांडुरंगाची सायुज्यमुक्ति प्राप्त झाल्यावर ज्याला परमानंद आहे, ‘ हो कां पुत्र पत्नी बंधु, यांचा तोडावा संबंधू ’ असें अत्यंत कळवळ्यानें ईश्वरप्राप्तीसाठीं जो जनांस ओरडून सांगत आहे, आत्मसिद्धि झाल्यावर ‘ उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड, ’ ‘ धर्म रक्षावयासाठीं करणें आटी आम्हांसी, ’ असा आपला अवतारहेतु ज्यानें उघड सांगितला आहे व नामस्मरणाशिवाय एक क्षण घालविणें म्हणजे महत्पाप करणें असा ज्याचा निर्धार व उपदेश आहे त्या तुकारामासारखा विठ्ठलास पाहतांच देहभाव हरपणारा व सर्वकाळ सात्त्विक अष्टभावांनीं व्याप्तकाय असा भगवद्भक्त दुसरा कोठें आढळणार ? त्याचें लक्ष रसालंकारादि बाह्य लक्षणांकडे व भाषा नटविण्याकडे कसें जाणार ? अशा पुरुषाशीं मोरोपंतांचें साम्य कोणत्या बाबतींत होणार ? काव्यालंकारांनीं व साहित्यशास्त्रानें संस्कृत झालेल्या बुद्धीनें व निसर्गतः प्रेमळ व सात्त्विक चित्तानें ईश्वरकथा व भक्तकथा स्वचित्तशुद्धीसाठीं गाणारा मोरोपंडित या वरच्या दोन्ही संतांपेक्षां अगदीं निराळा नव्हे काय ? बरें, ज्ञानेश्वरादि ईश्वरनिष्ठ पुरुषांचीं स्तवनें तरी पंतांनीं किती भाविकपणें व विनयानें केलीं आहेत ! ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम, असल्या मुक्त झालेल्या महात्म्यांशीं पंत, बाळक मातेशीं तशी, लगट करितात. ते त्यांचे अधिकार

ओळखून होते, व आपली पायरी जाणून होते. त्यांच्याशीं ते आपली तुलना करण्याच्या भानगडींत पडले नाहींत. तुकोबांचे कित्येक भक्त अनेक वेळां मला विचारितात कीं, " काय हो ! तुकोबापेक्षां मोरोपंत कमी दर्जाचे नव्हते काय ? माझें त्यांना एकच उत्तर आहे, " स्वतः मोरोपंत जर तुकोबास अत्यंत पूज्य समजतात तर आपण त्यांची तुलना कां करावी ? एवढें खरें आहे कीं, भगवद्भक्त म्हणून तुकोबा जर पंतांच्या वरचे आहेत, तर भाषा कमावणारे व शुद्ध व सरस बृहद्ग्रंथ प्रसवणारे कवि म्हणून पंतांची योग्यताही मराठी कवींत असामान्यच राहणार ! मोरोपंतांचें भारत म्हणजे अठरा हजार आर्यांचा एक ग्रंथ आहे. तुकोबांनीं जर असा एक विस्तृत ग्रंथ केला असता तर त्यांची व पंतांची तुलना झाली असती. मोठा ग्रंथ करायला बुद्धि लवचीक असावी लागते, तिला तणावा फार बळकट असावा लागतो, तो मोरोपंतांत होता. भाषादृष्टीनें तर पंतांनीं मराठीवर फारच उपकार केले आहेत. अभियुक्त भाषेंत जे गुण असावे लागतात ते गुण मराठीला मिळवून देण्याच्या कामीं पंतांचेंच कार्य अधिक महत्त्वाचें झालें आहे. भक्त म्हणूनही पंतांची योग्यता कांहीं कमी नव्हे. त्यांच्या केकावल्या व अनेक स्फुट प्रकरणें भक्तिरसानें थबथबलेलीं आहेत. पंत तुकोबापेक्षां भक्त म्हणून जर जरा कमी असले तर त्यांच्यांतला भेद म्हणजे सिंह व हत्ती यांच्याच भेदासारखा आहे. त्यांचें बलाबल आम्हां अल्पजीवांना कसें कळावें ? शिवाय रसिकतेच्या दृष्टीनें पाहिलें तरी वस्तूवस्तूंत निरनिराळी गोडी असते. जिलबी, लाडू, व साखरभात यांपैकीं प्रत्येक पदार्थाची गोडी कांहीं निराळी आहे. आंबा

व द्राक्षें यांच्या रसांतला भेद कोण सांगेल! आम्रफलाची गोडी निराळी, द्राक्षाची गोडी निराळी. तसाच तुकोबांच्या अभंगाचा नाद निराळा, मयूराच्या केकेचा नाद निराळा. रसिकाला प्रत्येक ग्रंथकाराच्या ग्रंथाचें मर्म समजायला व त्याचा रसस्वाद घ्यायला त्याच्या त्याच्याशीं तद्रूप झालें पाहिजे. एकाच रसिकास निरनिराळ्या रसांची गोडी कळली पाहिजे. आपल्याकडे एकदेशीपणा पहिला आहेच व नवीन मंडळींतही तो उत्पन्न होत आहे! सामान्य वारकरी रामदासांचें नांव निघालें कीं कपाळाला आठ्या घालतो, व रामदासीही वारकरी पंथास नांवें ठेवतांना दृष्टीस पडतो. मला उभय प्रकारच्या लोकांशीं बोलायचे प्रसंग अनेक आले. एकदां रामदासांचा श्लोक वारकरी जेवावयाला बसले असतां एकानें म्हटला तों सारे वारकरी उठून चालते झाले! तुकोबांनीं रामदासास संतांत गोविलें नाहीं, रामदास राजाचे गुरु झाले व गुरुदक्षिणा वगैरे घेतली, असलीं कांहीं कारणें ते सांगतात. रामदासांचे विशेष अभिमानी वारकऱ्यांनीं कर्ममार्ग सोडला म्हणून त्यांस नांवें ठेवितात! अलीकडचे एक नवीन 'राष्ट्राभिमानी' समर्थांची महती वाखाणणारे पंडित वारकरी संतांवर फारच घसरतात. काव्येतिहासशोधनपटु असे रा. राजवाडे हे तुकाराम " मानसिक सुखदुःखांचें जाळें विणीत बसणारा कोणी निरुपयोगी मनुष्य होता व वारकरी पंथानें राष्ट्रकार्य न केल्यामुळें तो ' पंगु ' आहे " असें म्हणतात! केवढा विलक्षण एकदेशीपणा हा!! शरीरांतल्या पड्रिपूंशीं झगडायला ज्यानें शिकविलें व शिवरायानें पेरणी करण्यापूर्वीं ज्यांनीं जमीन भाजून नांगरून ठेविली होती ते संत पंगु होते असें म्हणणें मूर्खपणाचें व कृतघ्न-

पणाचें आहे. महिपतींचीं संतचरित्रें पाहिलीं म्हणजे एकदेशीपणाला त्यानीं कसें हद्दपार केलें होतें हें समजतें. पंतांचाही ओढा पंढरीकडे व विठ्ठलभक्तांकडे होता, तरी सर्व संतांचें योग्य गुणवर्णन त्यांनीं केलें आहे. महिपती व मोरोपंत यांच्यांतला सर्वदेशीपणा जाऊन राजवाड्यांच्या एकदेशीपणाला सांप्रत ऊत आला आहे, याचें कारण खऱ्या रसिकतेची व गुणैकपक्षपातित्वाची वाण होय! प्रत्येक थोर पुरुषाचा जन्म कांहीं विशिष्ट हेतूसाठीं असतो व तो हेतु सफल होईल अशीच परिस्थिति ईश्वर त्याला देतो. प्रत्येकानें कोणता मार्ग रेखला आहे, त्यांनीं आपली इतिकर्तव्यता कशी ठरविली आहे, हें पाहून आपला उद्दिष्ट हेतु त्यानें सिद्धीस नेला कीं नाहीं एवढेंच पाहण्याचें आपलें काम असतें. रामदास काय, तुकाराम काय, किंवा दुसरा कोणी बलिष्ठ संत काय, सर्व परम ईश्वरभक्त होते व सायुज्यमुक्ति त्यांना मिळाली होती. एवढ्यानेंच ते समाधिकारी झाले. सोन्यांतला हिणकसपणा जाऊन तें बावन्नकशी झालें कीं त्याचें काम झालें, मग त्याचा कोणताही अलंकार करा, मग गोफ व सरी यांची तुलना करणें वेडेपणाचें काम आहे.

**पंतांची भूमिका** व त्यांचे हेतु लक्षांत घेऊन मग त्यांच्या काव्याची परीक्षा करायला हवी. त्यांनीं वरच्या दोन साधूंप्रमाणें कोठेंही आपल्या अवताराचा अमुक हेतु आहे असें जरी सांगितलें नाहीं, तरी त्यांच्या ग्रंथांच्या स्वरूपावरून त्यांची भूमिका सहज कळते. स्वचित्तशुद्ध्यर्थ देवकथा व संतकथा गाव्या एवढाच मुख्य हेतु त्यांच्या काव्यरचनेच्या मूळाशीं आहे, व ‘ वाङ्मन पूत कराया ’ त्यांनीं रामकृष्णादि अवतारांच्या प्राचीन व अर्वाचीन संतांच्या व

तीर्थांच्या कथा वर्णिल्या आहेत; व हें कार्य करायला लागणारी सामुग्री मिळविण्याचा उद्योग त्यांनीं सारा जन्म केला. साहित्यशास्त्र व छंदःशास्त्र यांत पंत पुरे निष्णात होते, व ईश्वरप्रसादाला पात्र असें प्रेमळ हृदय त्यांना ईश्वरानें दिलें होतें. यामुळें त्यांच्या काव्यांत भक्तिरस जरी ओतप्रोत भरला आहे तरी इतर अनेक रसही त्यांनीं बहारीनें उठवून दिले आहेत. व्यासवाल्मीकिशुकप्रभृति प्राचीन मुनींच्या कृतींशीं त्यांचा अहोरात्र परिचय होता, यामुळें रामायण, भारत, भागवत, हेच ग्रंथ मराठींत आणण्याकडे त्यांनीं आपली बुद्धि वेंचिली. पंत आपणास संतदास समजत, तरी आपणावर ईश्वरी कृपा आहे, ईश्वराचा आपणावर प्रसाद झाला आहे असें त्यांस वाटे. तर पंतांची ही भूमिका व हेतु लक्षांत आणून त्यांची इतर कवींशीं तुलना करावयास पाहिजे. पंत इतके मार्मिक आहेत कीं, संतस्तवनांत त्यांनींच आपली साम्यता दोघांशीं मात्र सुचविली आहे. वामन व मुक्तेश्वर यांची व पंतांची कांहीं अंशीं तुलना होऊं शकेल. प्रथम वामन घेऊं.

**मोरोपंत व वामन पंडित** हे दोघेही जाडे पंडित होते. दोघेही संस्कृत भाषेंत निष्णात होते; दोघांसही मराठी भाषेचा मोठा अभिमान होता; व दोघांनींही भारतभागवतांतलीं स्फुट आख्यानें सोप्या व सरळ मराठी भाषेंत वर्णिलीं आहेत; वामनाचा श्लोक व मोरोपंतांची आर्या जरी सर्वत्र सारखी गाजली आहे तरी अनेक मात्रागणवृत्तांत यमकप्रासादि शब्दचमत्कार साधून आपलीं काव्यें दोघांनींही रचिलीं आहेत; सगुणोपासनेवर दोघांचाही भर आहे; पंडित कृष्णभक्त होते व ‘भागवतधर्मानुयायास जी गति मिळते ती मला

मिळाली आहे' असें ते सांगतात; पंत रामभक्त होते व 'रामचरणपद्मप्रसाद मजवर झाला' असें तेही सांगतात! असें आहे तरी दोघांनींही 'वाङ्मन पूत कराया' काव्यरचना केली आहे. दोघांचेंही बुद्धिवैभव सारखें असून दोघांचीही ग्रंथसंपत्ति पुष्कळ आहे. मराठी भाषेवर संस्कृतांतले अलंकार चढवून तिला अभियुक्तता आणण्याचें श्रेय दोघांसही आहे. वामनी श्लोक व मोरोपंती आर्या हरिदासांस सारख्याच प्रिय झाल्या आहेत व रसिकांनीं पंतपंडितांस एका सिंहासनावर शेजारींशेजारीं बसविलें आहे!

पंतपंडितांतलें हें सादृश्य जसें उघड आहे तसें त्यांच्यातलें वैसादृश्यही उघड आहे. पंडितांचा भर अध्यात्म विषयांवर जास्त आहे. त्यांची यथार्थदीपिका, निगमसार, ब्रह्मस्तुति, कर्मतत्त्व वगैरे ग्रंथ लोकमान्य झालेले आहेत. पंडितांना वेदांताची म्हणजे आत्मविद्येची गोडी परमावधीची असल्यामुळें ते वर्ण्य विषयाशीं केवळ तादात्म्य पावतात. वेदांतासारखा रूक्ष वाटणारा विषय सोपा करण्यासाठीं त्यांनीं भाषाही फार सरळ व सोपी घातली आहे. केवळ अध्यात्मपर असा पंतांचा एकही स्वतंत्र ग्रंथ नाहीं, पण इतिहासपुराणग्रंथांत पंतांची बुद्धि जशी दिव्य दिसते तशी पंडितांची दिसत नाहीं. भारतरामायणादि ग्रंथांत पंतांची प्रतिभा जशी चमकते तशी इतर ग्रंथांत फारशी चमकत नाहीं. यामुळेंच पंतांना सुसंगत कथानकें वर्णन करितांना स्वभाववैचित्र्य हृदयंगमपणें जसें दाखवितां येतें तसें तें पंडितांना येत नाहीं. पंडित नांवाप्रमाणेंच पंडित होते म्हणजे न्यायमीमांसादि शास्त्रांत त्यांचा हात धरणारा पुरुष त्यांचे काळीं साऱ्या भरतखंडांत कोणी नव्हता; वेदार्थ यथार्थ जाणणारा,

अनेक मतवाद्यांचे ग्रंथ उत्तम तऱ्हेनें समजणारा, वेदांत विषय सुलभतेनें प्रतिपादन करणारा, वामनासारखा महापंडित मराठी भाषेला दुसरा कोणी लाभलेला नाहीं. मोरोपंतांनीं वामनाप्रमाणें वेदांचें व षट्शास्त्रांचें अध्ययन केलेलें नव्हतें, तरी साहित्यशास्त्रांत पंत परम निपुण होते. यामुळें पंतांनीं जितक्या वृत्तांचा व रसांचा अवलंब केला आहे, तितक्या वृत्तांचा व रसांचा पंडितांनीं केला नाहीं. निरनिराळ्या रसांचीं पोषक अशीं वृत्तें योग्यप्रसंगीं योजण्याचें चातुर्य पंतांत आहे, अनेक प्रकारच्या अलंकारांची गर्दी पंतांनीं आपल्या काव्यांत उडवून दिली आहे, व विलक्षण कल्पनाचातुर्यानें संशय–रत्नमाला, सन्मनोरथराजि, केकावली वगैरे काव्यें परमावधीचीं मधुर व आल्हादप्रद करून सोडलीं आहेत. अशी चमत्कारिक कल्पना प्रसविण्याची शक्ति मोरोपंतांसारखी पंडितांत दिसत नाहीं. तरी कांहीं पंडित 'वामनांत रसिकताच नव्हती व तो रूक्षवेदांती होता' असें म्हणतात तें मात्र खरें नाहीं. अत्यंत कोमळ कल्पनांशीं पंत खेळत, तसे वेदांतविचारांशीं पंडित खेळत, पण प्रसंगीं पंडितांनींही लोकोत्तर रसिकता प्रकट केली आहे. त्यांनीं शृंगारपर विषयावर राधाविलास, भामाविलास व रुक्मिणीविलास अशीं तीन लहान काव्यें केलीं आहेत तीं व द्वारकाविजय, वेणुसुधा, भीष्मयुद्ध व भरतभाव हीं चार अशीं सात काव्यें त्यांनीं फारच सरस केलीं आहेत. हीं सात काव्यें वाचणाऱ्यांस पंडितांच्या भाषेंतली रसवत्ता चांगलीच कळून येईल. राधाविलासांत शृंगार जरा जास्त आला आहे, हा नसता तर बरें झालें असतें. पण एवढ्यावरून प्रो. श्रीधरपंत परांजपे वामनास 'रंगेल' म्हणतात ही मात्र अति मोठी

चूक आहे. वामनासारख्या श्रेष्ठ कृष्णभक्तास व आत्मविचारांत सर्वदा निमग्न असणाऱ्या भागवतास ‘ रंगेल ’ हें विशेषण लावणें मोठ्या अरसिकतेचें लक्षण आहे! पंडितांचा भामाविलास तर मराठींतल्या अत्यंत सरस काव्यांपैकीं एक आहे. पंडितांच्या भाषेंत विलक्षण माधुर्य व प्रसाद आहे. पंतांनीं भाषेच्या ठाकठिकीकडे लक्ष दिलें आहे तसें पंडितांनीं दिलें नाहीं यामुळें छंदोभंग, यतिभंग, च्युतसंस्कृति वगैरे दोष त्यांच्या कवितेंत फार आढळतात व संस्कृत कविता वाचणाऱ्या रसिकाच्या कानाला ती जरा कठोर लागते. पंडित महाविद्वान् असूनही त्यांनीं व्याकरणशुद्धीकडे लक्ष दिलें नाहीं, याचें कारण ते नेहमीं वर्ण्यवस्तूशीं तादात्म्य पावत. पंतांची व्याकरणशुद्धता सर्वमान्य आहेच, व प्रसाद आणि माधुर्य हेही गुण त्यांच्या कवितेंत आहेत, तरी पंडितांच्या कवितेंतला प्रसाद पंतांपेक्षांही कधीं कधीं अधिक आल्हादकारक असतो. पंडितांचा आणखी एक लोकोत्तर गुण सांगायचा आहे. भाषांतर करण्याची कला पंडितांसारखी आजवर कोणासही साधली नाहीं. भगवद्गीतेची समश्लोकी, गंगालहरी, भर्तृहरीच्या शतकत्रयाचीं भाषांतरें हीं इतकीं उत्तम साधिलीं आहेत, कीं मूळ व वामनी श्लोक जवळ ठेवून बारकाईनें पाहिल्यास मूळ कोणतें व भाषांतर कोणतें हेंही कळण्यास मारामार पडेल! समश्लोकांत मूळार्थाला धका न लावता भाषांतर करणें किती कठीण आहे याची कल्पनाही कित्येकांस येणार नाहीं. भाषांतर करावें वामनानेंच. मूळांतला सगळा अर्थ—भाषा अत्यंत सोपी, सरळ व मोहक योजून—अन्य भाषेंत आणणें म्हणजे अत्यंत कौशल्याचें काम आहे व या कामीं वामनाच्या

तोंडीला कोणीही बसणार नाहीं. वामनाला शांतरस फारच सुरेख साधला आहे. क्वचित् शृंगार व वत्सल या दोन रसांची छटा आहे. पंतांना बहुतेक सारे रस चांगले साधले आहेत, पण भक्तिरस, वीररस व वत्सलरस हे मुख्यत: त्यांना उत्तमच साधले आहेत. पंडित व पंत उभयतांही भगवद्गुणवर्णनांत तल्लीन होतात, दोघेही मोठेच सगुणोपासक आहेत, पण स्वानुभवाच्या दृष्टीनें पंडितांची पायरी पंतांच्या वरची दिसते. पंडितांचा पूर्व वयांतला मद पार उतरून गेल्यावरचीच त्यांची काव्यरचना आहे, तरी पंतांइतके ते कधींही वांकले नाहींत. रसिकतेचा उत्कर्ष जसा पंतांत दिसतो तसा पांडित्याचा उत्कर्ष पंडितांत दिसतो. पंतांनीं इतक्या कवींवर व संतांवर आर्या केल्या, पण कोणावरही कोठेंही चुकून सुद्धां दोषारोपाचा भासही होऊं दिला नाहीं; व सर्व लहानथोर संतकवींचा चरणरज आपणास म्हणवून घेतलें आहे. पंडितांनीं यथार्थदीपिकेंत पुष्कळ गीताटीकाकारांवर प्रहार केले आहेत. 'गीतार्थ अन्यथा वाणी । मज नावडे ती थोरांची वाणी' असें म्हणून प्रथम सामान्य आक्षेप केले आहेत व दोनतीन ठिकाणीं ज्ञानेश्वरांचा अर्थ चुकीचा आहे असें मोघम म्हणून 'जगीं मिरवोनियां केली सिद्धी । आपल्या टीकेची प्रसिद्धी' असा गुप्त आक्षेप त्यांजवर केला आहे! ज्ञानेश्वरांचा योगाकडे विशेष ओढा होता, पंडितांचा सगुणभक्तीकडे होता. यथार्थदीपिका हा ग्रंथ फारच योग्य आहे व गीतार्थाचें रहस्य समजून घेण्यास मुमुक्षूंनीं त्याचीच प्रथम कास धरावी. माधुर्य, प्रसाद, ओज, कोमलता, हे गुण सामान्यत: दोघांच्याही काव्यांत आहेत, एकंदरींत पंत व

पंडित यांपैकीं श्रेष्ठ कोण हें ठरविणें फार कठीण आहे, महाराष्ट्र-काव्योदधींतलीं हीं दोनही अत्यंत तेजस्वी अशीं मौक्तिकें आहेत एवढें मात्र खरें!

पंतांनीं वामनाविषयीं जागोजाग फार प्रेमोद्गार काढले आहेत. पंडितांचे ग्रंथ पंतांस वाचावयास मिळाले होते व एका अर्थानें पंडित पंतांना गुरुतुल्यच आहेत, किंबहुना पंडित पूर्वीं झाले नसते व त्यांनीं केली आहे ती व तशी काव्यरचना केली नसती, तर पंतांचींही जीं काव्यें आज आपणास मिळालीं आहेत तीं तशीं उतरलीं नसतीं असें मला वाटतें. यमकानुप्रासांचे चमत्कार करून भिन्नभिन्न गुणवृत्तांत अनेक स्वतंत्र आख्यानें रचण्याचें चातुर्य पंतांस कांहीं अंशीं पंडितांच्या काव्यांपासूनच प्राप्त झालेलें आहे. पंडितांनीं ज्या पद्धतीचा उपक्रम केला त्याच पद्धतीचा उत्कर्ष पंतांनीं केला. इंग्रजी कवी ड्रायडन व पोप यांचा जसा अन्योन्य संबंध आहे तसाच पंडित व पंत यांचाही आहे. पंतांनीं आपल्या गुरूचें ऋण त्याची योग्य स्तुति करून फेडलें आहे. पंतांनीं पंडितांच्या कृष्णभक्तीचें व साधुत्वाचें फार प्रेमानें वर्णन केलें आहे. 'श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी' 'श्रीपतिभक्तोत्तम' 'बहुतजन्मसिद्ध' वगैरे विशेषणें पंतांनीं पंडितांस लावलीं आहेत. शिवाय ते स्पष्ट म्हणतातः—

**काम न वामनचित्तीं मोक्षाचा कृष्णभक्तिवांचून ! ।**
**भगवद्भजनचि केलें अनुदिन, किमपि न तदन्य वाचून ॥१॥**

पंडितांना पंतांनीं 'ख्यात ज्ञात्या जनांत हा शुकसा' असें म्हटलें आहे. पंडितांना भक्तमंडळांत घालायला अलीकडे कांहीं

पंडित कां कचरतात, तें मला समजत नाहीं. त्यांच्या ग्रंथांवरून त्यांची अलोट कृष्णभक्ति व स्वानुभव अगदीं स्पष्ट दिसत आहे, व पंतांसारख्या पुरुषानेंही त्यांचें वाजवी असेंच वर्णन केलें आहे. पंत कारकून होते व कारकून जसा पैपैशाची चूक होऊं नये म्हणून जपतो, तसे पंतही योग्य विशेषणें अगदीं बेताबातानें योजूनच संतकवींची स्तुति करणारे आहेत. त्यांनीं भरमसाट कांहीं तरी लिहिलें नाहीं. संतप्रकरणांतच काय, पण एकंदर कवितेंत वायफळ, निरर्थक किंवा अप्रयोजक एकही शब्द त्यांनीं वापरला नाहीं. पंडितांच्या कृष्णभक्तीचें गौरव पंत उगीच करायचे नाहींत. वामन हा महापंडित होता, म्हणून त्याला श्रीपतिभक्तोत्तम म्हणायला कोणची हरकत आहे? भक्ति आणि पांडित्य यांचा विरोध पुष्कळ वेळां दिसतो, हें खरें. तुकोबांनींही आपल्या अभंगांत बऱ्याच वेळां असें सांगितलें आहे कीं, देव भोळ्याभाविकांचा आहे, त्याला पांडित्याचा कंटाळा आहे, व तो पंडितांपासून फार दूर असतो. पण वामनपंडित हे या सामान्य सिद्धांताला मोठाच अपवाद आहेत ! ते जसे अद्वितीय पंडित होते तसे ते श्रीकृष्णाचे परम भक्त होते. पंतांचा वर दिलेला अभिप्राय अक्षरशः खरा आहे, याविषयीं पंडितांच्या ग्रंथांशीं ज्याचा चांगला परिचय आहे त्याला क्षणभरही शंका येणार नाहीं. पंडितांची यथार्थदीपिका व गीतेची समश्लोकी या दोन ग्रंथांची पंतांनीं फार वाखाणणी केली आहे. समश्लोकीच्या उपोद्घातांत 'श्रीज्ञानदेव, वामन पटु ! ऐसा अन्य मानवचि नाहीं' असें त्यांनीं म्हटलें आहे, व वामनस्तुतींत खालील आर्या आहे:—

**केली श्रीगीतेची व्याख्या, बहु भक्ति जींत गाजविली, ।**
**साजविली साधुसभा; भाषाकविकवनशक्ति लाजविली ? २**

या आर्येंतल्या 'बहु भक्ति जींत गाजविली' या चरणांत पंडितांनीं आपल्या टीकेचा मुख्य कटाक्ष सगुणभक्ति गाजविण्याकडे ठेवला आहे, असें पंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे. समश्लोकीबद्दल 'रीति समश्लोकीची अतुला, साधेल काय नव्यास?' हा पंतांचा शेराही खरा आहे. समश्लोकीची तऱ्हा खरोखरीच अतुल आहे. वामनाच्या समश्लोकीची तऱ्हा पंतांस इतकी आवडली कीं त्यांनींही गीतेची समश्लोकी स्वतंत्रपणें केली आहे. दोन्हीही टीका निर्यमक आहेत, मात्र पंतांनीं आपली टीका वामनाच्या मूळाला धरून आर्यावृत्तांत केली आहे. वामनानें आपल्या यमकांनीं अन्यकवींची गर्वहानि केली, या पंतांच्या मताचा विचार अन्यत्र केला आहे. यामुळें येथें त्याची द्विरुक्ति नको. वामनाचीं कवनें अत्यंत रसभरित आहेत असें पंतांनीं निरभिमानतया सांगितलें आहे. 'भक्तिज्ञानरसभरित यत्कवन, जयांत एक न वच रितें' या आर्यार्धांत पंडितांची योग्य स्तुति पंतांनीं केली आहे. आणखी एकच आर्या पहाः—

**वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ।**
**प्रभुनें, भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ॥ ३ ॥**

याप्रमाणें पंडितांच्या 'सद्रसभवन कवनांची' पंतांनीं फार तारीफ केली आहे. स्वतः पंत पंडितांच्या प्रसादयुक्त रसभरित काव्यांना फार भुलले होते असें दिसतें. आणि कोण नाहीं भुलणार? जुन्या काळच्या घराण्यांत संग्रह केलेल्या कवितेंत वामनी श्लोकांचा भरणा फार सांपडतो, यावरून त्यांच्या लोकप्रियतेची साक्ष पटते. वाम-

नाची कविता हरिदासांला फार प्रिय होती असें पंत म्हणतात. तुकोबाचे अभंग व वामनाचे श्लोक पंतांच्या वेळीं कीर्तनांत हरिदास म्हणत असत, याविषयीं पंतांचाच दाखला आहे. आपल्या आर्याही अशाच कीर्तनप्रसंगीं हरिदास म्हणतील अशी पंतांना खात्री होती. असो. सन्मणिमालेंत खालील आर्या आहे:—

**नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी ।**
**रसभवना तत्कवना मानी या तेंवि वाम न स्वा मी॥३॥**

या आर्येंत पंत स्पष्ट म्हणतात: 'पंडितांच्या रसभरित कवनांना मी जसा मानतों तसा मी आपल्या स्वतःच्या कवनांसही मानीत नाहीं. मला माझ्या कवितेपेक्षां कृष्णभक्तिरसज्ञ वामनाची कविता अधिक आवडते!' हा पंतांचा अभिप्राय जसा पंडितांना भूषणावह आहे, तसाच तो पंतांनाही भूषणावह आहे. आपल्याकडे हीनता घेऊन पूर्वकवींविषयीं पंतांनीं इतक्या निरहंकारबुद्धीनें लिहावें, यावरून त्यांच्या मनाची निरतिशय शुद्धता व्यक्त होत नाहीं काय? येथें स्तव्य आणि स्तोता दोघेही आपल्या स्तुतीस पात्र आहेत.

**मुक्तेश्वराच्या** भारतानंतर मोरोपंती भारत शंभर वर्षांनीं झालें. मुक्तेश्वराचें सगळें भारत उपलब्ध नाहीं. मुक्तेश्वरही वामनासारखा महापंडित होता. त्यानें अनेक शास्त्रांचें चांगलें अध्ययन केलें होतें; साऱ्या भरतखंडभर कान व डोळे उघडे ठेवून त्यानें प्रवास केला होता; नाथांच्या सहवासामुळें उत्कट ईश्वरभक्ति व जाज्वल्य नीतिमत्ता त्याचे ठायीं उत्पन्न झाली होती; व सृष्ट्यवलोकनाच्या संवयीमुळें उत्तम प्रतीची रसिकता त्याला प्राप्त झाली होती. मुक्तेश्वराचें भारत महाराष्ट्र उदयोन्मुख झालें त्या वेळचें असल्यामुळें

एकनाथ—शहाजींच्या काळीं महाराष्ट्रांतल्या कर्त्या पुरुषांच्या हृदयांत ज्या उच्च मनोवृत्ति उचंबळत होत्या त्यांचें प्रतिबिंब त्याच्या भारतांत पडलें आहे! राष्ट्रीयत्वाची कल्पना मुक्तेश्वरी भारतांत सुव्यक्त आहे. मुक्तेश्वराच्यां वाणींत जें अद्भुत ओज आहे त्याचें कारण सभोंवारच्या परिस्थितीकडे व समाजघटनेकडे राष्ट्रीय अभिमानानें पाहण्याचें अद्‌भुत सामर्थ्य त्याच्या अंगीं होतें हें होय. हा विशेष लक्षांत ठेवला म्हणजे मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या भारतांची तुलना करितां येते. मुक्तेश्वरी भारतांत पोर्तुगीज, इंग्रज, रूमशाम, हबशान, अर्बस्तान, पठाण, जावी लोक वगैरेंचा उल्लेख येतो. गोवधदेवब्राह्मणावज्ञा करणाऱ्या म्लेंच्छांना आर्य राजानें जिंकावें, अमात्य कोश जमवून किल्ले बांधावे, झुंजार बळी यांचे संघ करून त्यानें शत्रूवर कोसळावें, शेतकीसाठीं कालवे बांधावे, परद्वीपींच्या अमोल्य वस्ता घेऊन स्वदेशपरदेशांचा व्यापार वाढवावा, वगैरे प्रकारें खऱ्या आर्य राजांचें वर्णन मुक्तेश्वरी भारतांत आहे! तालमींतल्या कुस्त्यांतले डावपेंच; भोजनशास्त्रांतल्या विविध चटण्या व भाज्यांचीं कृतींसह वर्णनें; रात्र, प्रभातकाल, वर्षाकाल, राजा, प्रबळ मल्ल, तेजस्वी तपस्वी, रूपवती पतिव्रता, कुलटा, निर्झरोदकाचे पाट, व गिरिकंदरें, या सर्वांचीं अत्यंत चित्तवेधक, ठसठशीत व अप्रतिम वर्णनें मुक्तेश्वरी भारतांत येतात. मुक्तेश्वरी भारताच्या स्वरूपाहून मोरोपंती भारताचें स्वरूप थोडेसें भिन्न आहे. वीररस दोन्ही भारतांत उत्तम प्रकारें वर्णिला आहे, तरी मोरोपंत हे भारतीकाळांत जितके डुबून जातात तितका मुक्तेश्वर जात नाहीं. त्यांचें लक्ष भूत व वर्तमान काळाकडे फार आहे. मुक्तेश्वरांत कालविपर्यासाचा दोष

होऊं शकतो तसा तो मोरोपंतांत व्हायला कारणच नाहीं. कवि विलक्षण प्रतिभावान् असला, पूर्वकाळच्या थोर पुरुषांच्या कृति वर्णन करितांना स्वकालीन लोकसुधारणेची त्याची उत्कंठा जागरूक असली, उज्वळ प्रतिभेमुळें व विशाल कल्पनाशक्तीमुळें पूर्वकालीन लोकांशीं, त्यांच्या परिस्थितीशीं, त्यांच्या आचारविचारांशीं त्याला पूर्ण तादात्म्य पावतां येत असलें, कीं कालविपर्यासाचा दोष होणें अपरिहार्य आहे. हा दोष पुराणकथा, इतिहास व स्वकालीन लोकस्थिति या त्रिवेणींत पोहणाऱ्या मुक्तेश्वर किंवा शेक्सपीयर सारख्या कवींत मात्र आढळायचा. सामान्यतः मुक्तेश्वरी भारतांत राष्ट्रीय नीतितत्वें विखुरलीं आहेत, मोरोपंती भारतांत कौटुंबिक नीतितत्वें पसरलीं आहेत. मराठींतल्या सर्व भारतग्रंथांत मुक्तेश्वरी भारतच सर्वप्रकारें श्रेष्ठ आहे. मुक्तेश्वराची प्रतिभा, कल्पना, वर्णनचातुर्य, सृष्ट्यावलोकन, बुद्धीची व्यापकता, व राष्ट्रीयत्व हे गुण अनन्यसाधारण असल्यामुळें मुक्तेश्वराच्या जातीचा कवि साऱ्या मराठी कविमंडळांत मुक्तेश्वरच होय.

पंत आणि मुक्तेश्वर या दोघांनींही रामायण, महाभारत व भागवत यांवर ग्रंथ लिहिल्यामुळें व हरिदासांच्या आख्यानांला मुक्तेश्वरी ओवी व मोरोपंती आर्या या दोघांनींही रंग चढत असल्यामुळें यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे. मुक्तेश्वराचें भागवत अनुपलब्ध आहे, रामायण अगदीं किरकोळांतलें आहे, पण त्याच्या भारताचीं जीं पांचच पर्वें उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून पाहतां कवित्वाच्या दृष्टीनें मुक्तेश्वराची बरोबरी कोणताही मराठी कवि करूं शकणार नाहीं असें मला वाटतें. मुक्तेश्वराच्या

वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजास्विता व सृष्टिसौंदर्यवर्णनाची अनुपम शोभा, दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची महानदी 'खळखळाट वाहविली' आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घांट बांधून व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे! मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण

---

१ नळाचें वर्णन करितांना 'होता नल तेजस्वी भास्करसा, इंदुसा, अनलसा च,' याप्रमाणें पंतांनीं त्याचे तेजस्विता, लोकरंजकता व पावनता हे गुण व्यक्त केले आहेत. याचसंबंधीं मुक्तेश्वराची टसठसीत ओवी पहा:—

**सुरमंडळीं सहस्रनयन। ग्रहमंडळीं सहस्रकिरण।**
**पाताळभुवनीं सहस्रवदन। तेंवी तो मान्य भूतळीं॥ १॥**

या ओवींत मुक्तेश्वरानें इंद्रासारखें राज्यकारभारांतलें कौशल, सूर्यासारखें अप्रतिम राजतेज, व शेषासारखी वाग्मिता या नलगुणांचें वर्णन केलें आहे, पण पंतांच्या आर्येपेक्षां मुक्तेश्वरी ओवी अधिक ओजस्वती दिसते. 'भास्करसा' आणि लगेच 'इंदुसा' ह्या उपमा कशाशाच वाटतात! 'सहस्र'शब्दाच्या त्रिवार आणि साभिप्राय उच्चारामुळें मुक्तेश्वरी ओवी तेजस्वी दिसते. उलटपक्षीं पंतांचें कल्पनाचातुर्य लोकोत्तर असल्यामुळें त्यांच्या कवितेची गोडीही असाधारणच आहे. दमयंतीला टाकून जातांना नळाच्या मनाचें जें आंदोलन झालें, त्याच्या वर्णनप्रसंगीं मुक्तेश्वरापेक्षां पंतांनींच हृदयंगम कल्पनाचातुर्य व्यक्त केलें आहे. दोघांच्याही उक्ति पहा:—

**त्यागूनि जाय परता। परत ये मागुता।**
**सात पांच वेळ चित्ता। संशयचक्रीं सूदलें॥ १॥**

—मुक्तेश्वर.

**कलि दमयंतीप्रेमा दोघेही ओढिती नळाला हो,।**
**प्रेम्याला त्याचें मन सांपडलें! देह त्या खळाला हो!!॥१॥**

—मोरोपंत.

कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी साधीभोळी, काळीसावळी, पण ठसठसीत, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे; व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची, व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे! दोन्ही संपन्न, शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली वाटेल त्याला भुलविते, दुसरीला भुलणारा सुविद्य, रसज्ञ, नागरिकच पाहिजे! पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रें उंचीं आहेत, पण तीं कशीं तरी घेतलीं आहेत, दुसरीच्या वस्त्राभरणांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्या पाणीदार डोळ्यांनीं व सहज विलासांनीं मोहील, दुसरी आपल्या नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची धिटाई व दुसरीची मर्यादशीलता, पहिलीचें अकृत्रिम हास्य व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहजप्रेक्षण व दुसरीचे कटाक्षक्षेप, पहिलीचा दांडगेपणा व दुसरीचा संभावितपणा—दोन्हीही आपापल्या परीनें मनमोहकच आहेत!! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां 'दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यन्ताच्या उक्तीचें स्मरण होतें! असो. मोरोपंत स्वतः फार मार्मिक होते. त्यांना मुक्तेश्वराची कविता पाहून फारच समाधान झालें. 'मुक्तेश्वराच्या कवितेच्या तोलाची कविता आपणास उत्पन्न करितां येणार नाहीं असें वाटून मराठी कवि हतगर्व झाले,' असें त्यांनीं म्हटलें आहे:—

**मुक्तेश्वरकृत भारत आवडतें विठ्ठलासि, कीं पर्व।**
**सर्व श्रवणें हरितें आशा कविच्या, अशेषही गर्व!॥ १॥**

मुक्तेश्वराची कविता वाचणारे व त्याची स्तुति करणारे 'बंदी ( भाट ) लक्षावधि' आहेत असें सांगतांना पंत म्हणतातः--

**श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।**
**बंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ २ ॥**

मुक्तेश्वर व पंत हे दोघेही महाकवीच आहेत. त्यांना व सर्व अर्वाचीन संतांना एकात्मतेच्या भावानें वंदन करून व त्यांचा प्रसाद मागून हें प्रकरण मी पुरें करितों.

---

# प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन

## (“विरोळ्यानें काय शिकविलें?”)

—मनोरंजन.

पांचसात दिवस पाऊस पडत राहिल्यामुळें मुठा नदीला बराच पूर आला होता. आमच्या पुणें शहरचे रस्ते काय, नाले काय, सगळेच चह्हाडखोर! म्युनिसिपालिटीच्या व्यवस्थेचीं सारीं बिंगें जाणारां-येणारांस ऐकायाला नको असतांही, ते सांगत होते, आणि शिमग्याच्या सणाला अजून चारपांच महिने अवकाश असूनही शिडकावाचे अंगरखे ज्याच्या त्याच्या अंगांत दिसत होते. विशेष गम्मत ही कीं, मी मी म्हणणारे सुधारकही या पावसाळ्याच्या शिमग्यांत रंगत होते. पावसाची झिमझिम राहून राहून सुरू होती. अशा वेळीं आम्ही चारपांच जण, तंगड्या तोंडीत, बंडावर पाण्याची मजा पहावयास गेलों. दोनही नद्या पर्जन्याच्या प्रसादामुळें आणि अवसरप्राप्त देहधर्मामुळें पाषाणहृदयी पित्याच्या कठोरपणास कंटाळून, माहेरास राम राम ठोकून, वेगानें आपल्या प्रियकराकडे धांव घेत होत्या. त्यांनीं आपलीं वाळवंटें केव्हांच आक्रमून टाकिलीं होतीं. दोनही कांठांस थडाथड थपडा देऊन त्या झपाट्यानें पुढें धांवत होत्या. संगमावर दोघींची गांठ पडल्यावर दोघी एकमेकींस कडकडून भेटल्या आणि एकजूट करून पुढें चालल्या. काय त्यांचा वेग! केवढा जोर! “आम्हांला कोंडून घालून बाहेर खडा पहारा करणारे आमचे पहाडी वडील! त्यांनादेखील आम्हीं भीक घातली नाहीं; दोनही अंगांनीं अडवीत आम्हांला चिमट्यांत धरूं पाहाणाऱ्या

दुरडींस आम्हीं जुमानिलें नाहीं; आपल्या लांबच लांब फेकलेल्या बाहूंनीं आम्हांला धरून ठेवूं पाहणाऱ्या झाडांखोडांस आम्हीं दाद दिली नाहीं! त्या आम्ही, आमच्या वाटेंत आडव्या पडणाऱ्या या भिताडाला काय विचारतों!" असें धिक्कारानें गर्जत गर्जतच त्या आल्या आणि त्या बांधाला पायांखालीं तुडवीत त्याच्या मानगुटावरून उड्या टाकून पुढें चालत्या झाल्या. त्यांना वाटेंत अडथळा केल्यामुळें त्यांचा किती संताप उडाला होता! एकदां बांधाला खालीं तुडवूनदेखील त्यांचें समाधान झालें नाहीं असें दिसलें. कारण, चार पुरुष खोलींत उडी घेतल्यावरही त्या उसळून पुनः परत बांधाला लाथाडायाला धांवत होत्या. त्यांच्या या आक्रस्ताळी सपाट्यांत कितीक दगडा-गोट्यांचा आणि विटाविटकरांचा चुराडा झाला असेल! कितीक झुडपांना त्यांनीं आपल्याबरोबर ओढींत नेलें असेल! कितीक मातीच्या ढिगाऱ्यांचा स्वाहा केला असेल! कितीक किड्या-किरड्यांना जलसमाध दिली असेल! असेल कशाला? आम्ही पहात उभे होतों तितक्यांतच एक मोठ्या विरोळ्याची व त्यांच्या पसर-लेल्या केसांच्या कांहीं बटांची झटापट चाललेली आम्हांस दिसली—

**गोविंदराव**—नको बोवा हें पहाणें! चला! आपल्याच्यानें आतां पाहवत नाहीं! बिचारा जरा डोकें वर काढितो न काढितो तों पुनः गुरफटला!

**शंकरराव**—अहो, असे घाबरतां काय? त्याची धडपड पाहण्यांतच एक प्रकारची मौज आहे! ती जर पहावयाची नाहीं तर मग इतक्या लांब आलांत कशाला?

**वामनराव**—ओहो! शाबास! चांगला वीतभर चढला कीं भिंतीवर! ती पहा–तेथेंच चार बोटांवर भिंतींत एक फट आहे. ती जर बिचाऱ्याला दिसेल!........अरे, अरे–अरे!

**कृष्णाजीपंत**—गेला–दोन हात लांब गेला. आतां कसची ती फट त्याला दिसते! या भयंकर झोतापुढें त्याचें काय चालतें!

**शंकरराव**—काय चालतें? तो पहा आला, पुनः गिरका घेऊन परत भिंतीशीं आला! त्याला जणों आपल्यामागें लागलेल्या प्रचंड शक्तीचें भानच नाहीं! कोठें तरी बिळ मिळेल आणि आपण त्यांत शिरूं, ही त्याची एकच आशा केवढी दांडगी आहे! त्या आशेच्या जोरावर त्याची सारी झटापट चालली आहे. वरून, मागून, खालून, बाजूनें इतके झोंके व तडाखे बसताहेत, पण त्याची तडफड बंद झाली आहे का!

**वामनराव**—मला वाटतें, याची तडफड बंद होईल आणि तो जर नुसता स्वस्थ पडून राहील, तरच त्याचें कल्याण होईल. निदान तो या कैदासणींच्या केसांच्या फटकाऱ्यांत मरायाचा तरी नाहीं. नाहीं तर—

**शंकरराव**—मरतो काय हो! त्याची चिकाटी केवढी जबर! पहाना! येवढ्या दहा मिनिटांत तो किती वेळां तरी उलथापालथा झाला, किती वेळां तरी टोले खात पुढें लोटला, कितीदां पाण्यांत बुडल्यासारखा–दिसेनासा झाला, तरी त्याची आपली मुंडी पुनः वर आहे ती आहेच! येवढासा जीव! पण त्याचा दम केवढा! शाबास! फिरला परत. चढला वर! चांगला वीतदीडवीत चढला!

**कृष्णराव**—कसचा चढला? झालें, संपलें बिचाऱ्याचें—ती पहा आली लाट—सांपडला भोंवऱ्यांत—झाला गडप!

**गोविंदराव**—पाहिलेंत! बिचारा शेवटीं बळी पडला! दोन तुफान नद्याचा एकवटलेला संताप कोणीकडे आणि हें वीतभर जिवाणूं कोणीकडे! त्याचा कसचा निभाव लागतो! त्याला पाहिल्यापासूनच मला हें त्याचें पुढचें दिसत होतें! खरेंच, मी येथून दूर जाऊन बसतों तर बरें होतें! अशा लहानसान प्राण्यांचें जीवान्तिक तडफडणें पहाण्यांत तुम्हांला काय मौज वाटते कोण जाणे! आपल्याला जशी भोवंड येते.

**वामनराव**—अहो, ती बरोबर. ती तशी येतेच! येवढ्या जोरानें कांहींही एकसारखें दृष्टीसमोरून जात राहिलें म्हणजे आपले डोळे फिरूं लागतात आणि भोवंड येते. येवढ्याला भिऊन जर येथून पळावयाचें, तर मग—काय हो, तुम्ही प्रत्यक्ष त्या भोंवऱ्यांत सांपडल्यावर तुमचें कसें होईल?

**गोविंदराव**—करा बोवा थट्टा? तुम्हांला सुचते बरी. माझ्या मनाला तर तो विरोळा, त्याचे मागें लागलेला तो पाण्याचा राक्षस आणि त्याचा शेवट, हीं सारीं लागून राहिलीं आहेत! त्या बिचाऱ्याचा काय अपराध! सृष्टीचा तरी काय हा न्याय! येवढासा जीव एवढ्या प्रचंड कल्होळांत सृष्टीनें आणून सोडावा कां म्हणून! तरी सृष्टींत सर्वत्र न्याय आणि प्रेम भरलें आहे म्हणे। भगवंताचे दयामय वास्तव्य सर्वत्र नांदत आहे म्हणतात........आहा! तसें असतें तर या विरोळ्याला भगवंताच्या दयेनें या संकटांतही हात दिला नसता काय?

**कृष्णराव**—गोविंदराव, येवढ्याशा गोष्टीवरून तुम्ही भगवंताच्या न्यायीपणावर कां घसरतां? तुम्हांला काय ठाऊक, त्या विरोळ्याचा अपराध होता कीं नव्हता? त्यानें पुष्कळशा बेटकुळ्या विनाकारण गट्ट केल्या असतील. शेवटीं आपणही गट्ट झाला! यांत भगवंताच्या घरचा न्याय कोठें बिनसला? करावें तसें भरावें!

**गोविंदराव**—असेल बोवा! तसेंही असेल! **'अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी'**! आम्हां पामरांना काय समजतें! तरी पण बेटकुळ्या व हे जीव यांची नेहमींची दे–घे सुरू आहे, त्यांच्यांत कांहीं साम्य तरी! येथें शेंकडों हत्तींच्या जोराचा लोंढा कोणीकडे आणि तो विरोळा कोणीकडे!

**शंकरराव**—यांत तुम्हांला इतकें नवीन काय वाटतें? हें नेहमीं, जिकडे तिकडे चाललेंच आहे, नाहीं का? जिकडे तिकडे शांत आहे, पशुपक्षी आनंदानें आपली कालक्रमणा करीत आहेत, बाग होताहेत, मळे उठताहेत, शहरें वसलीं आहेत, घरें, वाडे, गिरण्या, कारखाने चालू आहेत आणि सर्व आबादानी आहे; तोंच तळची जमीन हालूं लागावी, पृथ्वीच्या पोटांत गडगडूं लागावें, शेजारचे डोंगर जळती आग ओकूं लागावे, सगळें वातावरण तांबड्या लाल अग्निरसानें भरून जावें, आणि क्षणांत सर्व वस्ती तप्त रसांत कढूं लागावी, असे सृष्टिप्रकोप काय कमी होतात? बोटीवर हजारों माणसें चढतात उतरतात, हजारों बोटी समुद्राच्या छातीवर नाचतात बागडतात, पण क्षणांत त्याची मर्जी जाऊन समुद्र खवळतो आणि बोटींच्या बोटी आपल्या अनंत उदरांत गडप करून टाकतो कीं नाहीं? भूमाय तरी इतकी स्थिर, इतकी शांत आणि

कनवाळू ना? तिच्या पाठी–पोटावर आम्ही हवे तसे खेळतों बागडतों, आमच्या मनांत कधीं ती संतापेल अशी शंकाही येत नाहीं; पण एकदम भूकंपाचा धक्का बसून गांवांचीं गांवें आणि तालुक्यांचे तालुके ती गिळून टाकिते कीं नाहीं? येथें कोणाचा अपराध असतो? हे निसर्गाचे संचार अनंत आणि अगाध आहेत! येथें आपली अक्कल फारशी चालत नाहीं! पण, प्रबळांनीं दुर्बळांस खुशाल पायांखालीं तुडवावें, हा प्रकार जड सृष्टींतच का आहे? जड सृष्टींतच कशाला? खुद्द माणसांमाणसांमध्यें काय आहे? येथें तर बऱ्याच अंशीं आपले आपण मालक असतों ना! तरी आपल्या हातून काय होतें! मी–मी तर म्हणतों, गोविंदराव, हा विरोळा पाण्यांत सांपडावा व त्याचा असा शेवट व्हावा, यांत फार खोल अर्थ आहे. **कृष्णरावांच्या** म्हणण्याप्रमाणें येथें भगवंताचा न्याय असो नसो! बाकी विरोळ्यानें बेटकुळ्या खाल्लच्या असतील म्हणून जलौघानें त्याला झपाटणें जर न्यायाचें, तर गोमाजीनें सोमाजीचें डबोलें बुडविलें म्हणून गोरडनगँगनें गोमाजीचे घरावर दरवडा घालणें कां न्यायाचें नव्हे? मग तेथें पोलीस अन् म्याजिस्ट्रेट कशाला? तें कांहीं असो, या विरोळ्यापासून घेणारास फार बोध घेतां येणार आहे, येवढें खरें!

**गोविंदराव**—तो कोणता?

**शंकरराव**—कोणता? या प्रचंड जलौघाच्या झपाट्यांत सांपडून इतका वेळ झगडत राहणाऱ्या व शेवटीं त्या झटापटींतच प्राणाची आहुती देणाऱ्या विरोळ्याचा शेवट पाहून तुमच्या मनांत कांहींच विचार उत्पन्न होत नाहींत?

**वामनराव**—त्यांत विचार कसले उत्पन्न व्हावयाचे? पाण्याचा ओघ जोरानें खालीं आपटे कसा, पुनः वर उसळे कसा, मागें वळे कसा, आणि आपल्याबरोबर त्या विरोळ्यालाही नाचवी कसा, हें पाहण्यांतच आतांपर्यंत काय ती मौज होती. तो विरोळा गेला. आतां तिकडची दृष्टि काढावी आणि पाण्याच्या थयथयाटाकडे लावावी. अहाहा! आपल्या धूसर जटा अस्ताव्यस्त फेंदारून हैदोस घालणाऱ्या या सैतानांचें थैमान तर पहा! त्यांचीं तीं वेडींवाकडीं टाळकीं, क्षणोक्षणीं बदलणारीं आणि लहानमोठीं होणारीं हातापायांचीं भेंडोळीं, एकसारखीं सुरू असलेलीं रंगणें—सारेंच विचित्र! ह्या नद्या कसल्या! पावसाच्या धारांवर आरूढ होऊन पृथ्वीवर उतरलेल्या आणि जलप्रवाहाच्या मार्गानें धांवत सुटलेल्या पिशाचांच्या सेना या! सुमारें अर्धा मैलपर्यंत ह्या दोन नद्यांनीं वाहात आलेल्या सेना अप्रतिहतपणें आल्या, तेथें त्यांना अटकाव करण्याची कोणाची छाती झाली नाहीं. सर्व प्रदेश मोकळा. त्यांचा भयंकर ओघ जाईल तिकडे मुभा. असें होतें तोंवर त्यांचा वेग नुस्ता उत्कंठेचा होता. पण येथें या बांधानें त्यांची वाट आडवली! आतां काय? पिशाचेंच तीं! झिंज्या पिंजारून आणि अंगांचे चेंडू करून त्याच्यावर सारीं तुटून पडलीं आणि त्याला खालीं घालून स्वच्छंद नाचूं लागलीं. त्यांचा हा धिंगाणा पाहिल्यानें मला तर तसाच धिंगाणा घालावा असें वाटावयाला लागलें आहे! नायगाऱ्याचा धबधबा पाहून खरोखर त्यांत उडी घ्यावी आणि पाण्याच्या लोंढ्याबरोबर आपणही उसळून वरतीं यावें, असें मनांत येत असेल नाहीं? सृष्टीचें केवढें सामर्थ्य हें!

**शंकरराव**—अहो, हें तर आहेच. नद्यांचे धबधबे, विजांचे चमचमाट, मेघांचा गडगडाट, पावसांचे दमदमाट इत्यादि सृष्टीचे आविर्भाव पाहिले म्हणजे तिच्या सामर्थ्याचा प्रत्यय यावा आणि क्षणभर आपल्या क्षुद्रपणाचें भान व्हावें, हें तर सरळच आहे. किंवा, तिच्या अनावर संचाराच्या संसर्गानें आपल्या ह्या वीतभर देहांत कोंडून राहिलेला तिचा छावाही स्वप्रत्ययानें क्षणभर आपल्या सांखळ्या तोडून, कोंडमारा फोडून बाहेर पडावयास व तिच्या-बरोबर स्वैर नाचायास उत्सुक व्हावा हेंही नवल नाहीं. येथें उभें राहिलें म्हणजे आपणही या जलौघाबरोबर उडी घ्यावी आणि स्वतंत्र पोहावें ही मनाची भावना होते, तिचा हाच अर्थः—निसर्गाला आपण द्यावा तितका अवसर देत नाहीं, त्याचा कोंडमारा करितों. याची ही भावना म्हणजे साक्ष आहे ! पण त्या विरोळ्याच्या क्षणाच्या इतिहासानें याहीपेक्षां खोल विचार—निदान मनुष्य-समाजाला अत्यंत निकट असे विचार—माझ्या मनांत उभे राहतात ! तुमच्या कोणाच्या नाहींत का राहात ?

**गोविंदराव**—मला वाटतें, आपल्या समाजांत अशाच तऱ्हेची धडपड सुरू असून तींत असेच करुणास्पद प्रकार प्रत्यहीं घडत आहेत असेंच तुमचें म्हणणें, होय ना ? तसा विचार माझ्या मनांत येतो खरा ! पण काय करायाचें ? आपण काय करणार ! त्या विरोळ्यानें काय केलें ?

**शंकरराव**—विरोळ्यानें काय केलें ? विरोळ्यानें आपल्या जन्माचें सार्थक केलें ! तुम्हांआम्हांसारख्या हताश सुधारकांस प्राणान्तिक प्रयत्नांचें आणि आजन्म उद्योगाचें उदाहरण घालून

दिलें! या विरोळ्याप्रमाणेंच हजारों निरपराध मानवी जीव हजारों वर्षांच्या सांचत, फुगत आलेल्या लोंढ्यापुढें, आणि धर्माच्या, देवाच्या आणि पवित्रतेच्या भेसुर संमर्दापुढें तडफडत आहेत! समाजाचा प्रवाह सनातन आहे, तसाच मानवधर्माचा आहे. पण या समाजाच्या प्रवाहाला आलेल्या पुरांत कितीक निर्बळ प्राणी प्रत्यहीं सांपडत आहेत! समाजाच्या सनातन जुलमाखालीं त्यांचा बिचाऱ्यांचा इतका चेंदामेंदा होत आहे, कीं, त्यांना स्वतांला जरा हातपाय हालविण्याचीही ताकद नाहीं. केवळ दैवदुर्विलासामुळें आपल्या स्त्रीवर्गापैकीं किती–कितीजणी समाजाच्या पुरांत स्वाहा झाल्या आहेत! हजारों वर्षांच्या परंपरेच्या दडपणामुळें कितीक जीव चेंचून गेले आहेत! व्यक्ति आणि समाज यांतील हा झगडा–झगडा कशाचा? आमच्या येथें तरी व्यक्तीचा जीव कोठें आणि समाजाचा अपरंपार पूर कोणीकडे?–हा प्रकार किती शतकें चालू आहे? गोविंदराव, विरोळ्याचा शेवट पाहून जर तुम्ही 'कोठें आहे भगवंताचा न्याय?' म्हणून ओरडतां, तर गाईप्रमाणें हंबरडा फोडून लोळण घेतां घेतां ज्यांना फरफरा ओढून ज्यांवर संन्यास लादण्यांत येतो, गुरांप्रमाणें मुसक्या बांधून किंवा चारचौघांनीं धरून पकडून ज्यांना विठ्ठलाची दीक्षा देण्यांत येते, घाण्याच्या बैलाप्रमाणें ज्यांना डोळे असून आंधळें ठेवण्यांत येतें, जगायाची–संसार करायाची इच्छा असूनही ज्यांना संसाराची बंदी करण्यांत येते, अशा थोड्याथोडक्या नाहीं पंचवीस लाख तरी प्राण्यांचा असा प्रकार तुमच्या पुढें–मागें–आजूस–बाजूस–चोहोंकडे बिनघोरपणें चाललेला पाहून सृष्टीला आणि भगवंताला, किंवा खरें म्हटलें तर

माणसांना आणि समाजाला तुम्ही काय म्हणणार? विरोळा तुमच्या जातीचा नव्हे, गोताचा नव्हे, अगदीं यःकश्चित् जीव. परंतु त्याचा असा स्वाहा झालेला पाहून तुमचें मन कळवळतें! मग तुमच्याच-सारख्या चालत्याबोलत्या, तुमच्याच हाडामांसाच्या, तुमच्याप्रमाणेंच अलभ्य नरजन्माला आलेल्या तुमच्या आयाबहिणींचा, लेकीसुनांचा, शेजारणीपाजारणींचा, तसाच शोचनीय प्रकार होत असल्यावर तुमच्या अंतःकरणाला किती पीळ पडला पाहिजे!

**कृष्णराव**—काय हो शंकरराव, जेव्हां तेव्हां समाजाच्या जुलमाचें पुराण वाचितां! जो तो आपापल्या कर्माचीं फळें भोगीत असतो. त्यांत जुलूम कोणाचान् कोणावर आला आहे!

**शंकरराव**—कृष्णराव, आज तुम्हांला हें म्हणायाला सोपें आहे. कां कीं, आमच्या बायका, त्यांवर होत आलेल्या युगानु-युगांच्या संस्कारांनीं, पुराणिकांच्या, कथेकऱ्यांच्या, शास्त्रीपंडि-तांच्या, धर्मदीक्षितांच्या आणि शिंगें मोडून वासरांत शिरणाऱ्या सुशिक्षितांच्या उपदेशामुळें केवळ गाई बनल्या आहेत. पूर्वकर्मामुळें आपल्याला स्त्रीजन्म आला आहे, तेव्हां भोक्तृत्व भोगिलें पाहिजे, या एका वृत्तीशिवाय त्यांच्या मनांत दुसरें कांहीं येत नाहीं! आपण माणसें आहों, जनावरांपेक्षां—कुत्र्यामांजरांपेक्षां आपली निसर्गसिद्ध प्रतिष्ठा वरची आहे 'मुकीं बिचारीं कुणीहि हांका' अशा मेंढरांपेक्षां आपलें बळ निराळें आहे, आपले हक्क निराळे आहेत, हें त्यांना अजून कळूं लागलें नाहीं. पण........काय करूं हो? आमचे सुधारक या गोविंदरावांसारखे तेव्हांच हताश होणारे आहेत! नाहीं तर—?—अहो तो विरोळासुद्धां आमच्यापेक्षां अधिक नेटाचा.

त्याच्यापेक्षां खरोखरच अनंतपट प्रचंड अशा लोंढ्याच्या तडाक्यात तो सांपडला असूनही त्यानें आपली धडपड सोडिली नाहीं. शेवटचा स्वाहा होईपर्यंत—कोणाला ठाऊक ! त्यानंतरही असेल—त्याचे प्रयत्न चालू होते. येवढ्या अजस्त्र शत्रूच्याही हातांतून सुटावयाची खटपट त्यानें बंद पडूं दिली नाहीं, त्याचा उद्योग सुरूच राहिला. जणों काय आपला शत्रु कोण, केवढा, याचें त्यास भानच नाहीं ! तसा आमचा उद्योग पाहिजे. आमची आम्हांलाच ऐकूं न येणारीं आजची कुई, सगळ्या जगाला खडबडून जागें करणारी विश्वगर्जना झाली पाहिजे ! आपला कोंडमारा फोडूं पाहणारा आमच्यांतील निसर्गांश आमच्यासारख्या हजारों स्त्रीपुरुषांतील निसर्गांशांशीं एकजीव झाला पाहिजे. या विरोळ्याप्रमाणें आमचे प्रयत्न आमरण—एकांतिक दृष्टीनें—चालले पाहिजेत. बांधावरून उडी टाकिल्यामुळें खंडशः झालेल्या त्या जलौघाकडे पहा. आपल्या आड येणाऱ्या बांधावरून उडी मारून पुढें गेल्यामुळें त्याच्या शरीराचे राईयेवढाले तुकडे होताहेत ! पण ते सर्व पुनः जमतात, पुनः उसळतात, पुनः सर्व वाळवंटभर कल्लोळ माजवितात, आणि आपला पूर्वींचा जोर, पूर्वींचा जन्मभाग मिळविल्याशिवाय राहात नाहींत. त्यांचें उदाहरण आपण डोळ्यांपुढें ठेविलें पाहिजे. अडथळ्याशीं टक्कर घेऊन स्वतां घायाळ होऊनच हा जलौघ त्या बांधाला लाथाडायाला समर्थ होतो. आपल्यांतील या हतभाग्य प्राण्यांच्या हालअपेष्टा पूर्वकर्मामुळें आलेल्या नाहींत. निदान त्यांच्या पूर्वकर्मामुळें आलेल्या नव्हेत. निर्घृण निसर्गानें आणिलेल्याही नव्हेत—खरोखर निसर्गाच्या—अदृष्टाच्या अवकृपेनें ओढवणाऱ्या आपत्तींपेक्षां आपण

आपल्यावर ओढविलेल्या आपत्तीच फार आहेत! आपण आपल्या बंधुभगिनींवर जे जुलूम, जे अन्याय करीत आलों-करीत आहों, त्यापुढें निसर्गाचा स्वैराचार कांहींच नाहीं! हे सनातन अन्याय आहेत, हे पूर्वकर्माचे जुलूम आहेत, असें म्हणून स्वस्थ बसणें म्हणजे स्वतांची फसवणूक आहे! हे आपणच जन्मास घातलेले जुलूम व अन्याय आहेत ते आपणच दूर केले पाहिजेत. त्यांचा लोंढा केवढाही प्रचंड असो, आपण त्यांतूनही सुटण्याची व त्यांतूनही डोकें वर उचलण्याची धडपड केली पाहिजे. मृत्यूवांचून जन्म नाहीं. रूढीच्या अनावर लोंढ्यांत आज आपण सांपडून विरोळ्याप्रमाणें नामशेष होऊं कदाचित्! परंतु आपल्या मागून येणारांस आपण वाट तरी करून ठेवूं. आपण खटपटींत—धडपडींतच मरून जाऊं; परंतु आपला मृत्यु म्हणजे आपणांपेक्षां खंबीर वीरांचा जन्म होय! आज कोपऱ्यांत पडलेल्या आणि समाजानें निस्त्राण केलेल्या जीवांच्या जागीं उद्यां नवे जीव येतील, आणि ते पावसाच्या धारांवरून उतरणाऱ्या या सैतानांस सूर्याच्या किरणांवर बसून शुष्क करणाऱ्या देवदूतांप्रमाणें, आज या अनाथ प्राण्यांवर अधिकार गाजविणाऱ्या समाजास वठणीस आणितील! जुलूम आणि अन्याय यांशीं झगडणें येवढें आपलें काम. तें आपण आमरणान्त करावें म्हणजे झालें! पुढच्याचा विचार आपणास कशाला ?...

हें बोलत असतां शंकररावांचा चेहरा आवेशानें आणि आवेगानें फुलला होता. त्यांची दृष्टि आमच्यापैकीं कोणाकडे नव्हती. ती काळाच्या अफाट अरण्यांतील नवीनच गोचर झालेल्या एका

रमणीय भागावर खिळल्यासारखी व त्यामुळें उल्लसित झाल्यासारखी दिसत होती ! त्यांचा सगळा जीव एकवटून त्यांच्या चेहऱ्यांत उतरला होता असें पाहणारास वाटे. आम्हां सर्वांवर त्यांच्या शेवटच्या वाक्यांचा चांगलाच परिणाम झाला.

---

# नरसिंह चिंतामण केळकर

## ( "सुभाषित व विनोद" )

## सुभाषित.

सुभाषित या शब्दाचा यौगिकार्थ पाहिला तर तो 'चांगलें भाषण' असा होतो. परंतु 'चांगलें भाषण' यानें निश्चितार्थबोध मुळींच होत नाहीं. रूढार्थाकडे पाहिलें तरी तीच स्थिति आहे. सुभाषित या शब्दाची व्याख्या संस्कृत साहित्यशास्त्रांत केलेली नाहीं; व व्यवहारामध्यें तर तो वाटेल त्या रीतीनें उपयोगांत आणिलेला आहे. परंतु व्यवहारांत शब्दाची ज्या प्रमाणानें व्यापकता अधिक, त्या प्रमाणानें त्याचा अर्थबोध कमी, असा सामान्य सिद्धांत आहे. हल्लीं सुभाषित या शब्दाची व्यापकता किती मोठी झाली आहे, हें पहावयाचें असल्यास 'सुभाषितरत्नाकर' किंवा 'सुभाषितरत्नभांडागार' यासारख्या पुस्तकांत पाहावें म्हणजे कळेल. सुभाषितरत्नभांडागारांतील संग्रह विपुल आहे. परंतु तो नुसता पद्यांचा संग्रह आहे. त्यांत गद्याचे वेंचे मुळींच नाहींत. व यावरून सुभाषित हें पद्य असलेंच पाहिजे अशी 'सुभाषितरत्नभांडागार'कार वगैरेंची समजूत होती हें उघड दिसतें; परंतु कोट्या व विनोदवचनें संस्कृत वाङ्मयांतर्गत गद्यांतही बरींच आढळतात, हें संस्कृत वाचकांस माहीत आहेच. लहानसेंच उदाहरण द्यावयाचें झालें तर शाकुंतलांतील विदूषकानें केलेली कोटी ध्या. 'कृतं त्वया उपवनं तपोवनं,' म्हणजे–हे राजा! हें तपोवन तूं उपवनच करून टाकलेंस–हें सुभाषित असून गद्यांतच आहे. या ठिकाणीं तपोवन व उपवन या परस्परभिन्न, किंबहुना परस्पर-

विरोधी पदार्थांचा संबंध दुष्यंताचे विलासी कृतीनें जुळवून दाखवून कवीनें चमत्कृति उत्पन्न केलेली आहे.

अशा वचनांचा संग्रह वास्तविक सुभाषितरत्नभांडागारामध्यें व्हावयास पाहिजे. व तो केलेला नाहीं यावरून सुभाषिताच्या अर्थाची कल्पना एका बाजूनें पाहतां अव्याप्तिदोषदूषित आहे असें दिसून येईल. दुसरे पक्षीं, सदर भांडागारांत जीं पद्यें दिलेलीं आहेत, त्यावरून ती कल्पना अतिव्याप्तिदूषित आहे असेंही दिसून येतें. कारण हीं पद्यें इतक्या निरनिराळ्या जातींचीं आहेत कीं, त्यांवरून सुभाषिताचे व्याख्येस उपयोगी असा कांहींएक नियम किंवा निर्बंध ठरवितां येणें शक्यच नाहीं; किंबहुना हें भांडागार म्हणजे गारोड्याची एक पोतडीच आहे असें म्हटलें तरी चालेल. यामध्यें, परब्रह्मनमनवर्णन, व विशिष्ट देवतांचीं वर्णनें व स्तोत्रें, दशावतारस्तुतिपाठ, निरनिराळ्या शास्त्रांची स्तुति व निंदा, वर्णाश्रमवर्णन, व्यवहारस्तुति, व्यवहारनिंदा, सामान्य व विशिष्ट राजप्रशंसा, राजसभा व त्यांतील घटक यांचीं वर्णनें, नवरसवर्णन, अन्योक्तिकलाप, चित्रकाव्याचीं उदाहरणें वगैरे शेंकडों विषय आलेले आहेत. व यांतील प्रत्येक पद्य जर सुभाषिताच्या लक्षणास पात्र आहे असें म्हटलें, तर मग सामान्यतः असें कोणतेंही पद्य संस्कृत वाङ्मयांत सांपडणार नाहीं कीं, ज्यास सुभाषित हें पद तितक्याच उचितपणानें लावतां येणार नाहीं. आतां केवळ विषयवैचित्र्य अतिशय, एवढ्यावरूनच आमचा हा वरील आक्षेप केलेला नाहीं; कारण अमुक एकादें पद्य सुभाषित होणें किंवा न होणें हें त्यांतील विषयावर अवलंबून नसून त्या पद्याच्या रचनेवर—म्हणजे त्यांतील

अर्थचमत्कृतीवर—अवलंबून आहे. उदाहरणार्थ, परब्रह्मासारख्या नीरस किंवा गंभीर विषयाचें वर्णन करावयाचें असतांही तद्वर्णनपर पद्य सुभाषिताचे लक्षणास सर्वथैव योग्य असें एकाद्यास रचितां येईल. दुसरे पक्षीं पाहतां, विषय 'राजयशोवर्णन' किंवा 'मदन-चरित्र' असा, म्हणजे प्रायः सरस व सुभाषितानुकूल असला तरी, तद्वर्णनपर पद्यही अ-सुभाषित या वर्गांत येऊन पडण्यासारखें कोणीं रचण्याचा संभव आहे. परंतु आमच्या वरील आक्षेपाचा भावार्थच असा आहे कीं, सुभाषितरत्नभांडागारांत कसल्याही विषयावर कां पहाना, अशीं अनेक पद्यें आहेत कीं, ज्यामध्यें कसल्याही प्रकारची मुळींच चमत्कृति नाहीं. व यामुळें जर असलीं पद्येंही सुभाषिताखालीं गोंवावयाचीं, तर मग संस्कृतांतील वाटेल तो शब्दप्रबंध सुभाषितामध्यें गणितां येईल.

खुद्द सुभाषितरत्नभांडागाराची अशी स्थिति असल्यामुळें—म्हणजे जेथें मुख्य विषयच सुभाषिताचा तेथेंच—जर 'सुभाषित' या पदार्थाची कल्पना इतकी अनियामित व अव्यवहारोपयोगी आहे, तर मग— संस्कृत भाषेंत इतर ठिकाणीं—म्हणजे काव्य, नाटकें, कादंबरी वगैरे प्रबंधांमध्यें—जेथें अगदीं तुरळकपणें या शब्दाचा उपयोग करण्यांत आलेला असेल, तेथें सुभाषिताची योग्य व्याप्ति ठरविण्यास कांहीं साधन मिळेल, अशी आशा बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. बाणभट्टाचे 'कादंबरीं'त वैशंपायन शुकाचें वर्णन करितांना, "वेदिता गीतश्रुतीनां, काव्यनाटकाख्यायिकाप्रभृतीनां अपरिमितानां सुभाषितानां अध्येता स्वयं च कर्ता" असें लिहिलेलें आहे. यावरून काव्य, नाटक व आख्यायिका वगैरे सर्व प्रकारच्या रसिक शब्द-

प्रबंधांस सुभाषित हा शब्द लाविलेला आहे असें दिसतें. तसेंच उज्जयिनींतील पौरजनांचें वर्णन करतांनाही " सुभाषितव्यसनी " म्हणजे 'सुभाषिताची आवड असणारे' असें वर्णन आहे. तेथेंही त्या शब्दाचा अर्थ वरीलप्रमाणें अतिव्यापकच आहे हें उघड दिसतें. अमरकोशाकडे पाहावें तर त्यांत 'सुभाषित' हा शब्दच मुळीं सांपडत नाहीं. परंतु वाग्वर्गांत 'सुप्रलापं सुवचनं' या वचनावर टीका देतांना 'द्वे सुभाषितस्य' म्हणजे हे दोन शब्द सुभाषिताचे वाचक आहेत, असें टीकाकारानें लिहिलेलें आहे. परंतु हा नुसता त्याच भाषेंत तर्जुमा झाला व त्यावरून 'सुभाषित' या शब्दाचा अर्थ निश्चित करितां येणार नाहीं हें उघड आहे. अशी स्थिति होण्यास, शब्दाची व्यापकता जितकी अधिक, तितका त्याचा खरा अर्थबोध कमी, हाच सिद्धांत कारणीभूत आहे.

आतां प्रस्तुत पदार्थाची व्याख्या इतर कोणत्या तरी रीतीनें ठरवितां येते किंवा कसें, हें पाहूं. ही रीति म्हणजे पृथक्करणाची. 'सुभाषित' म्हणावें कशाला, हा प्रश्न खरोखरच फार बिकट आहे. तथापि निरनिराळीं उदाहरणें घेऊन, त्यांतून बहुजनमतानें सुभाषिताच्या लक्षणास अयोग्य अशीं जीं दिसतील तीं टाकून, बाकी जीं उरतील त्यावरून काय दिसतें हें पाहूं. सु—चांगलें व चांगलें म्हणजे सुखोत्पादक किंवा आनंददायक. परंतु मनुष्यास आनंद किंवा सुख हें इतक्या निरनिराळ्या रीतींनीं होऊं शकतें कीं, "केवळ सुख किंवा आनंद देणारा शब्दप्रबंध म्हणजे सुभाषित" असेंच जर आपण म्हणूं लागलों तर पुष्कळ वेळां निखालस अप्रयोजकपणा पदरीं बांधून घ्यावा लागेल. मनुष्यास सुख किंवा आनंद मुख्यत:

दोन तीन प्रकारांनीं होऊं शकतो. पैकीं एक प्रकार म्हटला म्हण मनोविकारांचें समाधान होणें हा. खालीं दिलेल्या प्रकारच्या शब्द प्रबंधांनीं मनोविकारांचें समाधान निःसंशय होतें; परंतु त्यांस सुभ षित असें कोणीही समंजस मनुष्य म्हणणार नाहीं. ते शब्दप्रबं अशा प्रकारचे:—आपल्या लहानग्या मुलानें उच्चारलेले बोबडे बोर यांचे योगानें वत्सलतेच्या भावाची जागृती होऊन समाधान हो प्रेमकलहाचे वेळीं स्त्रीपुरुषांनीं परस्परांस दिलेलीं विशेषणें किं संबोधनें; यांनीं रतिभाव दीप्त होतो. आपल्या शत्रूस दुसऱ्य दिलेली चटकदार शिवी ऐकूनही मनास बरें वाटतें. परीक्षेचा निक सांगत असतांना युनिव्हर्सिटीच्या रजिस्ट्रारनें आपलें नांव उच्चारले ऐकून आनंद होतो, हा अनुभव पुष्कळ विद्यार्थ्यांस आहेच. नव नच पदवी मिळाली असतां ती लावून उच्चारलेलें आपलें न ऐकून फारच आनंद वाटतो, हें युनिव्हर्सिटीच्या पदवीधरांस सरकारच्या पदवीधरांस माहीत असेलच. शर्यतीवर घोडा पाठवि असतां त्यानें शर्यत जिंकली अशाबद्दलची आलेली तार वाचू किंवा आपण सोडतींत घेतलेल्या तिकिटास बक्षिस मिळाल्य ऐकून, सहजच आनंद होतो. या सर्व उदाहरणांमध्यें अंतःकरणांत भाव प्रदीप्त होऊन सुख होतें व आनंद वाटतो. परंतु तेवढ्यावर वरील उदाहरणांसंबंधांच्या शब्दप्रबंधांस सुभाषित असें कोणी समंजस मनुष्य म्हणणार नाहीं.

वरील उदाहरणांसंबंधानें कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, त्या प्रसंगीं स्वतःच्या हिताचा संबंध असल्यामुळें आनंद अगर सु

होतें. ठीक आहे. तर मग आतां असे शब्दप्रबंध घेऊं कीं, ज्यांचा आपल्या हिताशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं, परंतु ज्यांच्या योगानें फक्त आपल्या कल्पनाशक्तीवर परिणाम होऊन आनंद किंवा सुख होतें. पण अशा शब्दप्रबंधांस तरी सुभाषित हें नांव देतां येईल कीं काय? वर्तमानपत्रांतून प्रत्यहीं नव्या नव्या बातम्या इतक्या चमत्कारिक प्रसिद्ध होत असतात कीं, त्या वाचून आपल्या कल्पनाशक्तीस फार सुख होतें:—"अमुक अमुक गांवीं एका म्हशीस चार रेडकें झालीं. तीं सर्व दोन दोन पायांचीं असून प्रत्येकास दोन दोन डोकीं होतीं;" "सुरतेस बारा तासांत १४ इंच पाऊस पडला व रस्त्यांतून हिंडण्यास होड्या घालाव्या लागल्या;" "आपण पिपांत बसून व पिपाचें तोंड बंद करून-क्ष साहेब हा नायगारा नदीच्या धबधब्यांतून पार गेला;" "डेन्मार्कच्या राजाराणीचें खडाजंगीचें भांडण होऊन राजा द्वंद्वयुद्धांत जखमी झाला;" "बोअर लोकांच्या सक्त पाहऱ्यांतून विन्स्टन चर्चिल हा अंधाऱ्या रात्रीं पळून गेला." इत्यादि बातम्या ऐकून आपणांस किती तरी गंमत वाटते. परंतु ज्यामध्यें या बातम्या ग्रथित असतात त्या शब्दप्रबंधांस सुभाषित असें कधीं कोणी म्हणेल काय?

जे शब्दप्रबंध कल्पनेला उद्देशून लिहिलेले नसतात, पण ज्यांचा रोंख मनुष्यमात्राच्या बुद्धीकडे असतो, अशांपासूनही फार सुख होतें, किंवा आनंद वाटतो. आणि बुद्धिशक्तीच्या समाधानापासून होणारा हा आनंद वर सांगितलेल्या दोन प्रकारच्या आनंदाहून, म्हणजे आपल्या अंतःकरणांतील भाव किंवा कल्पनाशक्ति यांचे समाधानापासून होणाऱ्या आनंदापेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे.

परंतु केवळ ज्ञानप्रद शब्दप्रबंधांस सुभाषित म्हणतां येईल कीं नाहीं, हें खालील उदाहरणांवरून तेव्हांच कळून येईल. ‘दोहोंत दोन मिळविले असतां चार होतात’ हा अंकगणितशास्त्रांतील एक सिद्धांत आहे. व अंकांच्या धर्मांचा विचार करणाऱ्या शास्त्राचे दृष्टीनें या सिद्धांतास महत्त्व आहे. किंवा ‘शून्यास शून्यानें भागिलें असतां अनियमित संख्या येते’ हा सिद्धांत तरी चमत्कार वाटण्या-सारखा आहे. किंवा दुसरें उदाहरण घ्याः—सूर्याचे पाठीवर डाग आहेत; चंद्रावर लोकवस्ती आहे; ग्रहणें, आकाशस्थ गोल व पृथ्वी यांचे परिभ्रमणामुळें होतातः—इत्यादिकांमध्यें ज्ञानानंद नाहीं असें कोण म्हणेल? तथापि या शब्दप्रबंधांस सुभाषित म्हणूं लागलों तर मग केरोपंती अंकगणित, युक्लिडची भूमिति, हॉल व नाइटचें बीज-गणित, वगैरे पुस्तकांस सुभाषितसंग्रहच म्हणावें लागेल. केवळ शास्त्रविषयक असे याहूनही उच्च दर्जाचे ग्रंथ घेतले तरी त्यांचीही गति तीच होणार. कारण हर्षेलचें ज्योतिःशास्त्र, न्यूटनची प्रिन्सि-पिया, किंवा विद्युत्शास्त्रांतील अद्भुत चमत्कार वर्णन करणारें एकादें पुस्तक, यांपासून बुद्धिशक्तीचें समाधान होऊन आपणांस मौज वाटते व आनंदही होतो. परंतु त्यांतील सिद्धांत प्रतिपाद-णारीं वाक्यें काढून ‘हीं घ्या सुभाषिताचीं उदाहरणें’ असें कोणी म्हणेल काय? इतिहासांतही अशींच सत्यप्रमेयें ग्रथित असतात; व तीं सर्व मनुष्यजातीशीं संबद्ध असल्यामुळें इतिहासवाचना-पासून जितका आनंद होतो तितका कदाचित् शास्त्रवर्णनें वाचू-नही होणार नाहीं. परंतु इतिहासांतील ज्ञानप्रद शब्दप्रबंधांस कोणीही सुभाषित म्हणणार नाहीं. तीच गोष्ट नीतिबोधप्रद तात्त्विक

ग्रंथांचीही समजावी. वेदान्तग्रंथ, साक्रेटिसाचीं प्लेटोनें लिहिलेलीं संभाषणें, ख्रिस्तानें पर्वतावरून केलेला बायबलांतील उपदेश, किंवा आपल्या इकडील भारतांतील गीताशास्त्र, किंवा योगवासिष्ठांतील बोधप्रद वेंचे वगैरेसही सरसकट सुभाषितग्रंथ म्हणतां यावयाचें नाहीं.

आतां वरील सर्व उदाहरणांसंबंधानें असा कोणी आक्षेप काढतील कीं, त्यांतील विषय बोधप्रद, ज्ञानप्रद किंवा कल्पनाशक्तीस आनंददायक असा होता; परंतु केवळ विषयचमत्कृतीनें कोणताही शब्दप्रबंध सुभाषित होऊं शकणार नाहीं; तो विषय ज्यांचेद्वारें प्रतिपादित केलेला आहे अशा शब्दांमध्येंच चमत्कृति पाहिजे. असो; तर मग आतां शब्द—चमत्कृतींचीं उदाहरणें घेऊन पाहूं. प्रथमतः ‘ चमत्कृति ’ याचा अर्थ काय, हें पाहिलें पाहिजे. चमत्कृति म्हणजे एक प्रकारचें विपरीतत्व होय. कारण वस्तु आहे तशीच दिसण्यांत चमत्कृति कांहीं नाहीं. घालावयाचें त्या रीतीनें, म्हणजे पुढच्या अंगास कोची करून, पागोटें डोक्यास घालून तुम्ही आम्ही रोज रस्त्यांतून येतों जातों; परंतु त्याकडे कधीं कोणाचें लक्ष वेधलें आहे काय? परंतु तेंच पागोटें एकादे दिवस उलटें घाला—म्हणजे कोची पुढें करावयाची ती मागें करा—किंवा पागोट्याचा पदर सुटून मागें जरा लोंबत राहूं द्या, कीं पहा रस्त्यांतील सर्व जाणारायेणारांस चमत्कृति वाटून सर्वांच्या नेत्रप्रहाराचे तुम्ही विषय होऊन बसाल! तात्पर्य, नित्यक्रमाशीं विरोध किंवा त्याचा विपर्यास हें चमत्कृतीचें मूळ बीज आहे.

वरील सर्व उदाहरणांवरून हें लक्षांत येईल कीं, शब्दचमत्कृति हा सुभाषिताचा आत्मा नसून तो आत्मा म्हणजे अर्थचमत्कृति

हा होय. खरी अर्थचमत्कृति ओळखणें हें इतर कित्येक गोष्टीं-प्रमाणें मनुष्याच्या सहृदयत्वावरच अवलंबून आहे.

## कोटी व विनोद.

कोटी व विनोद यांतील भेद सांगतांना विनोदाचा संबंध मनो-भावांशीं विशेष असतो असें सांगण्यांत आलेलेंच आहे. व या विधानाचा खुलासा केला असतां विनोदाच्या स्वरूपाचाही खुलासा आपोआप होईल. विनोद या शब्दाचा धात्वर्थ जर पाहिला तर तो "घालवून देणारा" "हांकून देणारा" असा होतो. अर्थात्, शब्द बनविणाराचे मनांत 'काळजी घालवून देऊन आनंदमय भावाची जागृति करणें' हा जो विनोद पदार्थाचा गुण तो आला होता असें दिसतें. काळजीस मनांतून घालवून देण्याचें काम मनो-भावांकडून जितकें होतें, तितकें तें बुद्धीकडून होऊं शकत नाहीं. इंग्रजींत विनोद यास जो शब्द आहे, त्याच्याही धात्वर्थाचा संबंध मनोभावांशींच आहे. Humour म्हणजे, ज्याच्या योगानें मनु-ष्याचा स्वभाव बनतो, असा शरीरांतर्गत एक द्रवस्वरूपी पदार्थः—

( The ancient Physicians believed that there were four humours–the blood, the phlegm, yellow bile or choler, and black bile or melancholy–on the relative proportion of which the temperament and health depended.—Webster. )

यावरून संस्कृत विनोद किंवा इंग्रजी Humour यांचा बुद्धी-पेक्षां स्वभावाशीं म्हणजे मनोभावाशीं निकट संबंध येतो. विनोदाचा जर मनोभावाशीं संबंध आहे, तर मग त्याची घटना एक किंवा

अनेक भावांनीं होते ? व तो एक किंवा ते अनेक मनोभाव कोणते ? याचें उत्तर केवळ तर्कानें बनवितां येण्यासारखें नाहीं, तर विनोदाचा परिणाम जें हास्य त्याच्या स्वरूपावरून व विनोद–वचन–व्यवहाराचे प्रत्यक्ष अनुभवावरून ठरविलें पाहिजे. प्रथम एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, विनोदानें येणारें हास्य आणि लहान मुलें अगर रानटी लोक, किंवा सुधारलेल्या समाजापैकींच पण अज्ञ लोक यांचें हास्य, हीं भिन्न असतात. पहिल्यामध्यें मनःसंस्कृतीचा परिणाम दिसून येतो. दुसऱ्यांत तो दिसून येत नाहीं. हास्यध्वनि हा एक प्रकारचा गायनध्वनि आहे असें मानलें तर, विनोदी हास्यध्वनीची जाति कोमळ ठरेल, तीव्र ठरणार नाहीं; म्हणजे ज्या मनोभावांचा परिणाम विनोदी हास्य हा होय, त्या मनोभावांत कोमलता असते, तीव्रता नसते ही गोष्ट लक्षांत घेतली असतां विनोदी मनोभावांत नवरसांपैकीं कोणत्या रसांच्या स्थायीभावांचा समावेश होऊं शकेल व कोणते त्यांमध्यें येऊं शकणार नाहींत, हें तेव्हांच कळून येईल. उदाहरणार्थ, ज्याच्या मनांत खरोखर क्रोधरूपी मनोविकाराचा प्रादुर्भाव झाला असेल, त्याला विनोद सुचणार नाहीं; व रागावलेलीं मनुष्यें जरी कित्येक वेळां हांसतात, तरी त्यांतील भयंकरपणावरून, तें हास्य विनोदी नसून क्रोधजन्य आहे, असें तेव्हांच कळून येतें. तसेंच मत्सरग्रस्त, असूयाग्रस्त, लोभग्रस्त, दंभग्रस्त इत्यादि प्रकारच्या मनुष्यांचे हातून खरा विनोद होणें शक्य नाहीं; व त्यांच्या हांसण्याच्या मुळाशीं असणाऱ्या 'तीव्र' मनोभावांची ओळख ऐकणारास तेव्हांच पटल्याशिवाय राहणार नाहीं. विनोदी हास्य ऐकतांच त्या हांसणाऱ्याच्या मनांत शांतता, खेळकरपणा,

आनंद, सहिष्णुता, विचारीपणा, सात्त्विकपणा, उदारभावजागृति व ममता इत्यादि सर्व किंवा यांतील कांहीं तरी भाव मुख्यत्वेंकरून वसत आहेत, अशी ऐकणाराच्या मनाची खात्री होते; व विनोदाच्या अनेक विभावांच्या जाति लक्षांत घेतल्या असतां खऱ्या व अस्सल विनोदी माणसांत हे वर सांगितलेले गुणच असले पाहिजेत हें कळून येणारें आहे. 'हास्या'चें उत्क्रमण कसें होत गेलेलें आहे याचा विचार करितांना विनोदी हास्य ही हास्याच्या उत्क्रमणस्थितींतील शेवटची पायरी होय, असें तत्त्ववेत्त्यांनीं ठरविलें आहे. व त्याचें इतकें सूक्ष्म स्वरूप झाल्याशिवाय वर सांगितलेल्या इतक्या गुणांचा संयुक्त परिणाम दाखविण्याची शक्ति अगर पात्रता विनोदी हास्याचे ठिकाणीं कशी येणार? या इतक्या निरनिराळ्या मनोभावांचा विनोदामध्यें परिणाम होण्यास बुद्धिशक्तीची किंवा कल्पनाशक्तीची जी मदत लागते, ती एवढ्यापुरती लागते कीं, मोठ्या प्रमाणाच्या किंवा अनेक जातींच्या अनेक पदार्थांचा क्षणमात्रांत सन्निकर्ष होऊन त्यापासून होणाऱ्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ साररूपानें घेतां यावा. एका आधुनिक अनुभवाचें उदाहरण द्यावयाचें असल्यास तें असें देतां येईल कीं, 'फोटोग्राफ' काढण्याच्या पेटीच्या तोंडीं बसविलेल्या लहानशा भिंगांतून मोठमोठ्या व विस्तृत देखाव्यांचें प्रतिबिंब आंतील कांचेवर एका क्षणांत पडतें, परंतु त्या छायारूप प्रतिबिंबाचा उद्भेद किंवा विकास होण्यास—म्हणजे छाया व प्रकाश यांच्या मिश्रणानें यथार्थदर्शन होण्यास——रासायनिक द्रव्यांचा उपयोग करावा लागतो. त्याचप्रमाणें कोणत्याही वस्तुस्थितीचें ज्ञान एकदां मनांत झालें, म्हणजे मग वरील निरनिराळ्या

मनोभावरूपी रसायनद्रव्याच्या साहाय्यानें विनोदशक्ति असलेल्या मनुष्यास तें ज्ञान हास्योत्पादक करून दाखवितां येतें.

विनोदी मनुष्याची वस्तुस्थितीकडे पाहण्याची रीति एकच नसते; व यामुळें एकाच वस्तुस्थितीचे निरनिराळे भाग त्याच्या दृष्टीस पडून त्याच वस्तूच्या निरनिराळ्या परंतु सर्वस्वीं खऱ्या अशा स्वरूपाची त्यास प्रतीति होते. या निरनिराळ्या दृष्टींनीं पाहतांना त्यानें आपली तर्कशक्ति अगदीं बाजूस ठेवलेली असते असें मात्र नाहीं किंवा त्याच्या हेतूंत आवेश, गंभीरता अथवा सत्यप्रियता उरत नाहीं असेंही नाहीं. जें काय होतें तें एवढेंच कीं, अशा प्रकारचे हेतु असूनही त्याच्या विचारावर एक प्रकारची खेळकरपणाची झांक येते. ज्या गोष्टी पाहून दुसऱ्या तिसऱ्या प्रकारच्या मनुष्यांमध्यें क्रोध, दुःख किंवा असूया इत्यादि मनोविकार जागृत होतील, त्याच गोष्टी विनोदी मनुष्याचे नजरेस पडल्या असतां तो असें म्हणून भागवितो कीं, " जाऊं दे, त्यांत काय आहे? हें असें असावयाचेंच; तसें नसेल तरच आश्चर्य. आपलें नफानुकसान त्यापासून काय होणार आहे? व त्याकरितां आपण मनःसमतेचें सुख घालवून विनाकारण तीव्र मनोवेगाचे आधीन कां व्हावें? व त्यांतील असंबद्धता पाहून जी एक प्रकारची मौज वाटण्यासारखी आहे, तिच्या सुखास आपण काय म्हणून आंचवावें? किंवा अनुभवविषयाची कींव येऊन त्याशीं सहानुभूति ठेविल्यानें जे एक प्रकारचे कोमल मनोभाव जागृत होऊं शकतील, त्यांच्या प्रतीतीचा आनंद कां व्यर्थ गमवावा?" तीव्र मनोवृत्तींच्या व विनोदी मनोवृत्तींच्या मनुष्यांत फरक पडतो तो हाच. दोघांसही परिस्थिति एकच असते व तिजपासून होणारें

हिताहित वस्तुतः दोघांसही सारखेंच असतें. तथापि व्यावहारिक फायदा कोणताच नसतां एकजण आपल्या मनोविकारांच्या तीव्रतेनें करपून जातो व दुसरा आपल्या मनोविकारांच्या स्निग्धतेमुळें सुरक्षित राहतो; व इतकें असूनही विनोदी मनुष्याच्या हेतूंच्या आवेशास किंवा गंभीरतेस कमीपणा मुळींच येत नाहीं. ज्याच्यामुळें आपणास विनोदसुखाचा एक क्षण तरी अनुभवावयास सांपडला, अशा परिस्थितीविषयीं तो मनांत उलट एक प्रकारची कृतज्ञताच बाळगतो.

हास्यास्पद व हास्योत्पादक या दोन स्थिति मात्र भिन्न आहेत. हास्यास्पद गोष्टींमध्यें एक प्रकारचा वाईटपणा किंवा कमीपणा असतो. परंतु हास्योत्पादक गोष्टींत तसा वाईटपणा असत नाहीं. एकाच गोष्टीस हास्यास्पद आणि हास्योत्पादक अशीं दोन अंगें असूं शकतात. तीव्र मनोवृत्तींचीं माणसें जरी प्रसंगविशेषीं हांसतात, तरी तीं बहुधा वस्तुस्थितीच्या या दोन अंगांपैकीं 'हास्यास्पद' अशा अंगाकडे पाहतात, व म्हणून त्यांची मनोवृत्ति शुद्ध व सात्त्विक राहात नाहीं. परंतु जीं विनोदी माणसें असतात, तीं वस्तुस्थितीच्या 'हास्योत्पादक' अंगाकडेच होतां होईपावेतों नजर देतात, व म्हणून त्यांस दुःख न होतां, एक प्रकारचें सुखच होतें; आणि प्रसंगाप्रमाणें, वर सांगितलेल्यापैकीं एक किंवा अनेक कोमल मनोविकारांचा परिणाम त्यांच्या वृत्तींत दिसून येतो. एकाद्या लहान मुलानें खोडी केली तर तीव्र मनोविकारांची आई त्याला मार देईल. परंतु तीच तिच्या जागीं एकादी विनोदी आई असेल, तर ती स्वतः हांसेल व मुलासही हांसवून त्याच्या कृतीची असंबद्धता

त्याच्या नजरेस आणून देईल. वर जे निरनिराळे मनोभाव विनोदी मनोवृत्तीस सहायभूत म्हणून सांगितले, त्यांपैकीं एकाहून अधिक जरी हजर असले, तरी त्यांचा परिणाम एकसमयावच्छेदेंकरून होतो. म्हणजे ज्याप्रमाणें स्वरसप्तकांतील वादी व संवादी सूर एकाच वेळीं निघाले असतां त्यांपासून संयुक्त अशा फक्त एकाच सुरेल स्वराची प्रतीति आपणांस होते, त्याचप्रमाणें विनोदांत वर सांगितलेले निरनिराळे मनोभाव जागृत असतांही त्यांचा एकच परिणाम दिसून येतो व तो विनोदी हास्य हा होय. नुसतें वाईट वाटणें किंवा नुसती गम्मत वाटणें किंवा नुसता खेद होणें अशी एकेरी मनोवृत्ति लहान मुलांत व रानटी मनुष्यांत, म्हणजे ज्यांचें अंतःकरण विकसित झालेलें नाहीं अशांत, दिसून येते. परंतु विनोदासारखी मनोवृत्ति ज्यांचें हृदय विकास पावलें आहे, अशांमध्येंच दिसून येते; मग तो विकास शिक्षणामुळें असो किंवा उपजत गुणामुळें असो. या मिश्रणाची मौज हीच आहे कीं, कोणताही एक मनोविकार दुसऱ्याशीं विसंवादी असा नसतो, व प्रत्येकाच्या थोडथोड्या अंशाचा त्यांत समावेश असतो. हें लक्षांत घेतलें म्हणजे मग, आपला बळी होमकुंडांत जळत असतां खदखदां हांसणारे रानटी लोक किंवा अचावचा बोलून मोठमोठ्यानें हांसणारीं व खिदळणारीं शिमग्यांतील मुलें यांच्या मनोवृत्तींस किंवा हांसण्यास विनोदी हें विशेषण का लावूं नये; व तेंच, औषध न घेणाऱ्या एकाद्या हटवादी रोग्याची फजीती होण्यासारखें कांहीं अर्थचमत्कृतिपूर्ण व हास्यकारक असें भाषण करणाऱ्या वैद्याच्या मनोवृत्तीस

किंवा हास्यास तेंच विशेषण यथार्थ रीतीनें कसें लावतां येईल, हें सहज समजण्यासारखें आहे.

या सर्वांहूनही विशेषतः सांगण्यासारखी एक गोष्ट आहे. ती ही कीं, विनोदी मनुष्य हा खरा परोपकारकर्ता होय; व त्याच्या परोपकारकृतीची मौज अशी आहे कीं, तो स्वतः जरी एकादे वेळीं दुःखी. कष्टी अगर उदासवाणा असला, तरी तो आपलेंच दुःख उगाळीत न बसतां आपल्या विनोदशक्तीनें दुसऱ्यांवर उपकार करतो. त्याच्या स्वतःच्या हेतूंचा आवेश व गंभीरता हीं दुसऱ्यावर होणाऱ्या उपकाराच्या मार्गांत आडवीं येत नाहींत. आजपर्यंत जगांत होऊन गेलेले पुष्कळ प्रसिद्ध विनोदी लेखक व भाषणकार हे स्वतः पोक्त, विचारी, गंभीर वृत्तीचे व आवेशयुक्त असे असतांही त्यांनीं जगांतील असंबद्ध गोष्टींच्या हास्योत्पादक अंगाकडेच लक्ष देऊन त्याजविषयीं आपल्या लेखांनीं व भाषणांनीं सहानुभूतीच उत्पन्न केली. प्रख्यात विनोदी फ्रेंच गृहस्थ रॅबेले, डॉन क्विझोट या अद्भुत व हास्यकारक कादंबरीचा कर्ता सर्व्हेंटीस, प्रख्यात प्रहसनकार मोलियर, तसेंच शेरिडन, गोल्डस्मिथ वगैरे इंग्लिश विनोदी ग्रंथकार वरील सत्यसिद्धांताचींच उदाहरणें होत. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या विनोदमहदाख्यायिकेंत खालील गोष्ट दिलेली आहे तीही वरील सिद्धांताचेंच समर्थन करितेः—जे मनुष्य सदोदित रंगेल दिसतात व चारचौघांत आले म्हणजे ज्यांच्या योगानें मंडळीस करमणूक होते व जे स्वतः उल्हासवृत्ति दिसतात, त्यांची पुष्कळ वेळां वस्तुतः कशी स्थिति असते, याविषयीं पुढील गोष्ट हें एक मोठें समर्पक उदाहरण आहे. कार्लेनी नांवाचा एक मोठा

विख्यात नकल्या होता. तो कांहीं दिवस पारीस शहरांत येऊन राहिला व तेथें त्याची पुष्कळ कीर्ति झाली. एके दिवशीं असें झालें कीं, वरील शहरांतील एका प्रसिद्ध वैद्याकडे एक मनुष्य आला आणि सांगूं लागला कीं, 'वैद्यबोवा! माझें चित्त वारंवार उदास होतें व मला कांहीं नकोसें वाटतें; व अशी वृत्ति झाली म्हणजे मला पराकाष्ठेचा त्रास येतो. तर जेणेंकरून माझ्या जिवाला हुषारी वाटेल व माझी वृत्ति उल्हासित होत जाईल, असा कांहीं उपाय कृपा करून मला सांगा.' वैद्य म्हणाला, "बाबारे! या तुझ्या विलक्षण रोगाला एकच औषध दिसतें. तें हें कीं, तूं एकलकोंडेपणानें न राहतां चारचौघां रंगेल मंडळींत जात जा; आणि त्यांतूनही कार्लेनी नांवाचा एक विख्यात नट येथें आला आहे, त्याच्या नकला पाहत जा. त्या पाहिल्या असतां तुझा कसलाही उदासपणा असला तरी तो पार निघून जाईल.' रोगी उत्तर करितो, 'महाराज, काय सांगावें? ज्या कार्लेनीची तुम्ही एवढी तारीफ करतां, तोच खुद्द मी आहें. मी साऱ्या पारीस शहरास खो खो हांसवितों खरा, पण माझी स्वतःची स्थिति पुसाल तर माझ्यासारखा उदास व दुःखी प्राणी नसेल.' वरील उदाहरणांतील कार्लेनी हा फक्त नकल्या होता, म्हणजे स्वतः विनोद करण्याचें सामर्थ्य त्याजमध्यें होतें किंवा नाहीं, याविषयीं कोणी शंका काढतील. परंतु, शेरिडन हा तरी स्वतः विनोदी लेखक होता, हें प्रसिद्ध आहे. पण तो फारच थोड्या वेळां हांसत असे, असें त्याजविषयीं सांगतात.

वरील सर्व विवेचनावरून विनोदाचा मनोभावाशीं कसा निकट संबंध असतो, हें दिसून येईल. विनोदवचन हें कोटी किंवा चतुरालाप याप्रमाणें बहुधा थोडक्या शब्दांत संग्रहीत करतां येत नाहीं; मात्र शब्दरचना विस्तृत असली तरी तिजमध्यें एक प्रकारचें औचित्य हें असतेंच. म्हणजे जरी कोटीप्रमाणें विनोदाचें सार एकेरी कल्पनेंत सहसा ग्रथित असत नाहीं, व विनोददर्शन हें परिस्थितीचे वर्णनावर अवलंबून असल्यामुळें शब्दविस्तार हा विनोदाचा पोषकच होतो, तथापि औचित्यविचार बरोबर पाळला गेला नाहीं तर हास्यरसाचा भंग किंवा अपकर्ष होण्याचा संभव असतो. सारांश किंवा मतलब एकच असून तोच अशा दोन रीतींनीं सांगतां येणें शक्य आहे कीं, त्यांपैकीं एका रीतीनें तें विनोदवचन होईल व दुसऱ्या रीतीनें तीच भाकडकथा होऊन त्यापासून हास्यनिष्पत्ति होणार नाहीं. हा शब्दाच्या औचित्याचा विचार कोटीस व चतुरालापास सारखाच लागू आहे; परंतु शब्दविस्तारामध्यें फरक पडण्याचें कारण हेंच कीं, कोटीमध्यें फक्त दोन पदार्थांचा अकल्पित किंवा अनपेक्षित संबंध जोडलेला असतो, व विनोदवचनामध्यें हास्योत्पत्ति होणें ती असंबद्धतेचा प्रकार किंवा परिस्थिति ही जितकी अधिक खुलवून सांगावी तितका विनोद अधिक खुलतो. कोटीचें पर्यवसान एकेरी कल्पनेंत होत असल्यामुळें तिचा शब्दविस्तार फार होत नाहीं. नाटकांतून किंवा विनोदी कादंबऱ्यांतून कित्येक वेळां सर्व प्रवेशाच्या प्रवेश किंवा पॅरेग्राफच्या पॅरेग्राफ वास्तविक एकाच विनोदी कल्पनेच्या उद्भेदास आवश्यक असतात, हें प्रसिद्धच

आहे. समजुतीचा घोटाळा, किंवा लोकविपरीत मनुष्यस्वभाव-दर्शन वगैरे विभावस्थलांच्या योगानें हास्यरसास उद्दीपन आणावयाचें असल्यास विनोदवचन थोड्याशा शब्दांनीं मांडणें शक्य नसतें. एवढेंच नव्हे, तर अशा वेळीं जितका शब्दविस्तार जास्त तितका विनोद अधिक खुलेल, हें उघड आहे.

## विष्णु मोरेश्वर महाजनि.

### सृष्टिसुंदरीची दिवाळी.

शरदृतूचा एक महिना बहुतेक संपत आला आहे. श्रावणाची झड कधींच मागें पडली. भाद्रपदांतल्या हस्ताच्या जोरदार पण घटकेच्या सरीही गेल्या. त्याबरोबर काळेभोर ढग व त्यांत संचरणारी व डोळ्यांस दिपविणारी सोनसळी वीज व तिचा अनुचर मेघनाद, हेही लुप्तप्राय झाले. चार महिन्यांच्या पावसानें धूळ बसवून टाकल्यानें आकाश आपली सहजनीलकान्ति धारण करीत आहे. ती एकाद दुसऱ्या पिंजरलेल्या पांढऱ्या ढगानें जास्तच खुलत आहे. पावसाळ्यांत फुगलेल्या विध्वंस करणाऱ्या नद्या आतां आपल्या कक्षांत परत येऊन प्रसन्न होत्सात्या मंद मंद चालल्या आहेत. मैदानांतील शेतें पिकांनीं पूर्ण आच्छादिलेलीं आहेत. त्यावर दृष्टि ठरत नाहीं. इकडे पिवळीं ज्वारीचीं कणसें वाऱ्यानें डुलत आहेत, तर तिकडे कापशीच्या डहाळ्या त्रिपुटी करीत आहेत. मधून मधून तुरीचे वाफे चमकत आहेत. तिळानें आपला खुळखुळा वाजविण्यास आरंभ केला आहे. कोठें कोठें बाजरी आपलें हिरवेंगार लहान लहान कांड्यांचें कणीस दाखवून डोळ्यांना रिझवीत आहे. तळ्याच्या कांठच्या सखल व पाणथळ शेतांत पिवळें भात शाल्योदनाची आशा उपजवीत आहे. रबीच्या शेतांतील भूभाग कोमल गव्हांच्या रोपांनीं हिरवागार झाला आहे. क्वचित् हरभरा आपल्या पर्णांवर आम्लरस धरीत आहे. वनांतील पुष्पांनीं व फलांनीं लादलेले वृक्ष व लता डोळ्यांस व नाकास

आनंद देत आहेत. त्यांच्या नानाविध आकृति, जाति, नांवें, रंग, रानांत संचरणारा भिल्ल, वनरक्षक किंवा उद्भिज्जशास्त्रवेत्ताच ओळखूं व सांगूं शकेल. वनांतून वाहणारे स्वच्छोदकाचे ओहोळ व त्यांच्या कांठीं असलेल्या वृक्षांवर बसलेले पक्षी आपल्या मधुर रवांनीं कानांस किती तरी रंजवीत आहेत. एका झाडावरून दुसऱ्या झाडावर, एका फुलावरून दुसऱ्या फुलावर उड्या मारणारे पतंग हेही आपल्या चित्रविचित्र पक्षांनीं डोळ्यांना किती तरी तृप्ति देत आहेत. रानांतून हरणांचे कळप उड्या फेंकीत चालले आहेत, त्यांवर नजरही ठरत नाहीं. कुरणांत ताजें गवत खाऊन पुष्ट बनलेले वृषभ एकमेकांशीं टक्कर मारीत आहेत; कांहीं शिंगांनीं शेतांतील वारुळें व कांहीं वरोळ्या हुंदडीत आहेत. त्यांचे रक्षक गोपाळ झाडाखालीं कांबळीवर पडून स्वस्थपणें त्यांजकडे पहात आहेत, अथवा झोंप घेत आहेत. मैदानाच्या पर्यंतभागीं असलेल्या टेंकड्याही यावेळीं आपलें सौम्य स्वरूप दाखवीत आहेत. असें हें शांत भुवनाचें चित्र किती तरी मनोहारि आहे ! परंतु आतां या वनश्रीचा दाता भगवान् सूर्यनारायण आपल्या औदार्याचें कौतुक करीत व डुलत डुलत आपल्या साम्राज्याचा दुसरा भाग पहाण्याच्या उद्देशानें तिकडे निघून गेला! त्याशीं नित्य वैर करणारी रजनी पुढें ठाकली! सूर्यानें नटविलेल्या मनोहर कुसुमवर्गाचा एकसहा लोप करून टाकण्याचा तिनें आव घातला; पण तो सर्वांशीं सिद्धीस गेला नाहीं. कारण त्याचा अति लांबचा बंधुगण ज्या तारका त्यांनीं आपल्या करांनीं त्या वर्गास सांवरून धरिलें. नाहीं तर रजनीनें जाई, नेवाळी, कुंद, पारिजातक यांचीं पांढरीं, शुभ्र

फुलें काळीं करून टाकिलीं असतों. या काळीं चंद्रमा अगदीं उत्तर रात्रीं उगवत असल्यानें व तशांत तो विपन्न स्थितींत असल्यामुळें त्याला वनश्रीला फारसें उजळितां येत नाहीं. त्याचें मिणमिणीत तेज रजनीच्या भीतिप्रद अभावरूप अंधकारास दृश्य व उग्रतरच स्वरूप देतें. अशा रात्रीं पक्षी आपापल्या नीडाच्या आश्रयानें पक्षांत चोंची खुपसून स्वस्थ निजले आहेत. दिवसाचा जीवनकलह कांहीं घटका विराम पावला आहे. गरीब शेतकरी आपल्या खोंपटांत कृतश्रमांचें चीज दयाळू परमेश्वर कैक वर्षांनीं करीत आहे, असा धन्यवाद गाऊन मुलांबाळांसह खाटल्यावर पडला आहे. सावकार, पीकपाणी चांगलें येणार, सुबत्ता होणार; तेव्हां आपली थकलेली बाकी वसूल होईल अशा सुखकर स्वप्नाचा अनुभव घेत पलंगावर पडला आहे. आगगाडीहून लांब असलेल्या खेड्यांतील वाणीउदमी, आतां रस्ते खुले झाले, प्रांतोप्रांतांत जावयाला हरकत नाहीं, असें समजून पावसाळ्यांत उकलून ठेवलेली गाडी सज्ज करून भावी फलाच्या आशेनें स्वस्थ निजला आहे. अशा रमणीय व शांत ऋतूंत दिवाळीचा सण ज्या महात्म्यांनीं घातला त्यांच्या दूरदृष्टीचें कौतुक करावें तितकें थोडेंच! बाह्य सृष्टींत व मनुष्येतर जीवसृष्टींत प्रसन्नता व शांति नांदते, तेव्हां मनुष्यानेंही आपल्या चित्तांत प्रसन्नता व शांति धरावी, असा त्यांचा उदात्त विचार असावा असें दिसतें. शांति राहाण्याला स्वच्छता पाहिजे, लक्ष्मी पाहिजे, म्हणून पडलींझडलेलीं घरें दुरुस्त करावीं, भिंती लिंपाव्या, सारवाव्या व रंगवाव्या, आंगण पाणी शिंपून स्वच्छ करावें, व त्यांत चित्रविचित्र रांगोळ्या घालून, त्या रंगांनीं भराव्या, दारापुढें लांकडाचे खांब रोवून त्यांवर बांधलेल्या आडव्या

फळ्यांवर व उभारलेल्या कमानींवर, किंवा घराच्या ओट्यावर व सज्जावर, रात्रीं दिवेच दिवे हारीनें लावावे, घरांतील कोणताही भाग, कोणतीही अडोशाची जागा, कोणतीही खोली, अंधारांत राहूं देऊं नका, कोठेंही केरकचरा असूं देऊं नका, अशी आज्ञापरंपरा घातली. हिचा हेतु हाच कीं, अशाच घरांत लक्ष्मी चिरकाळ नांदते, हा समज दृढ करावा. केरसुणीला पाय लागूं देऊं नये, कारण ती लक्ष्मी आहे.' असें बायका म्हणतात, यांतील इंगित हेंच. 'हात फिरे तेथें लक्ष्मी ठरे.' अशी दुसरीही म्हण याच अर्थाची आहे. धनतेरस आणि लक्ष्मीपूजन हीं या निमित्तेंच प्रचारांत आलीं. घरांत जशी स्वच्छता असावी, तशीच देहांतही स्वच्छता असावी, म्हणून नरक-चतुर्दशी आली; अंगाचा सर्व मल जावा, दुर्गंधि जावी, एवढेंच नाहीं, तर अंगाचा सुवास आपणांस व इतरांस सुखकर व्हावा, म्हणून सुगंधि उटणीं व तेलें व अभ्यंगस्नान याचा प्रघात पडला. व्यवसायांत अश्रांत श्रम होतात, त्यांचा परिहार व्हावा म्हणून चार दिवस खेळीमेळींत घालवावे, असें योजिलें. सण म्हटला म्हणजे गोड पदार्थ आलेच; व नाना प्रकारचे गोड पदार्थ करण्यांत सुगरणपणा दाखविण्याची संधी स्त्रियांना दिली. पुरुषांनीं ज्या त्या पदार्थांची वाखाणणी केली असतां कोणती घरधनीण आपणास धन्य मानून घेत नसेल? गोड पदार्थांनीं मुलांची हौस पुरी होत नसेल, म्हणून त्यांना नाचायाला, बागडायाला व खिदळायाला लावावें, व तीं तशीं पाहून त्यांच्या आईबापांनीं आनंद मानून घ्यावा, म्हणून फटाक्यांची व निरनिराळ्या प्रकारच्या दारूकामाची योजना झाली. पन्नास वर्षांपूर्वी मुलांकरितां लंकेचा किल्ला करण्याचा

व त्यावर तोफा, बंदुकीचे स्वार, वगैरे चढविण्याचा प्रघात फार असे; पण अलीकडे तो नष्टप्रायच झाला आहे. त्या वेळीं उर्वरित वीरश्रीचा तो द्योतक असे. पुरुषांना व मुलांना दिवाळीचा सण आनंददायक तसाच स्त्रियांनाही आहे.

दसऱ्याच्या दिवशीं शमीच्या लगडी व आपट्याच्या पत्रांच्या पुतळ्या 'सोनें' म्हणून देऊन कशाबशा समजूत घातलेल्या मुलीबाळी, गृहपत्न्या, बहिणी, या दिवाळींत खऱ्याखुऱ्या सोन्याच्या पुतळ्यांची, निदान त्याच्या अभावीं रौप्य मुद्रिकांची ओंवाळणी घेतल्यावांचून रहावयाच्या नाहींत. ही ओंवाळणी नव्या वर्षाची त्यांची बोहनी ( भवानी ) होय! दर वर्षाच्या ओंवाळणीचा कुणगा प्रत्येक स्त्री जिवापलीकडे ठेविते, त्याला ती कोणाला हात लावूं देत नाहीं! ज्याला बहीण नाहीं, तो पुरुष अभागी असें समजतात; म्हणून असा अभागी पुरुष आपल्या ओळखीच्या मुलीस अथवा स्त्रीस भाऊबिजेपुरती कृत्रिम बहीण समजून ओंवाळून घेऊन तिला ओंवाळणी घालतो. भाऊबिजेचें माहात्म्य आपल्या महाराष्ट्रांत विशेष आहे.

---

# प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन.

## ("काव्य आणि काव्योदय")

### काव्यांतील प्रतिभा.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनांत आमच्या काव्यवाङ्मयाचा पर-पुष्टपणा सिद्ध केला आहे. व तो सिद्ध करितांना आमच्याइकडे जिवंत प्रतिभेचा विकास फार थोडा आढळतो असें वारंवार म्हटलेलें आहे. ही जिवंत प्रतिभा आहे तरी कशी? आहे तरी कोण? आपला प्रसाद कमी झाल्यामुळें बहुतेक मराठी काव्याला कनिष्ठ पायरीवर उभें राहायास लावणारी ही जिवंत प्रतिभा कोठली आणिली? या प्रश्नाचें उत्तर देणें मोठें कठीण काम आहे. साख-रेची गोडी, फुलाचें सौंदर्य, स्वराचें माधुर्य आम्हांस ओळखतां येतें, परंतु तें सांगतां येत नाहीं. बी रुजली आणि तिला योग्य ती परि-स्थिति मिळाली म्हणजे तिजमधून अंकुर निघावयाचा, तो वाढून त्याला डाहाळ्या, फांद्या फुटून शेवटीं झाड मोठें व्हावयाचें आणि फुलें, फळें यावयाचीं हा सृष्टिनियम आहे, हें आम्हांला ठाऊक आहे. पण जिचा हा नियम आहे ती सृष्टि कोण, कशी आहे, हें मात्र सांगणें कठीण पडतें. तसेंच स्वतंत्र प्रतिभेचीं, जिवंत प्रति-भेचीं, तेजस्वी प्रतिभेचीं, रुचिर प्रतिभेचीं, काव्यें वाचिलीं म्हणजे ओळखतां येतात, त्यांचा रसास्वाद घेतां येतो, परंतु त्यांतली प्रतिभा सांगा म्हटलें म्हणजे विचार पडतो. याचें कारणही उघड आहे. जें आमच्या इंद्रियांचे द्वारा आम्हांस प्रेतीत होतें[1], तें आम्हांस समजतें. इंद्रियज्ञानापासून जों जों दूर दूर जावें तों तों अभिज्ञा-

---

१ अनुभवास येतें.

-नांची[1] स्पष्टता कमी होते, आणि बुद्धीची व अंतर्दृष्टीची[2] गति मंद व स्खलित होते. असें आहे तरीही काव्यविकासाची बरोबर कल्पना येण्यास, प्रतिभा म्हणजे काय हें अगदीं रेघारेघांनीं, तंतोतंत, सूत्र-बद्ध जरी समजलें नाहीं तरी जवळ जवळ ढोबळ रीतीनें तरी माहीत झालें पाहिजे.

मागें काव्याची प्रतिष्ठा आमच्या समजुतीनें कनिष्ठ कां या प्रश्नाचा विचार करितांना बुद्धि आणि काव्यशक्ति यांत भेद असून आम्ही स्वभावतः बुद्धीचे चहाते आहों असें सांगितलें आहे. त्यावरून काव्यशक्ति आणि बुद्धि हीं मानवाच्या मनाचीं भिन्नांगें आहेत, ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आली असेल. प्रतिभा हें काव्यशक्तिचें एक महत्त्वाचें अंग आहे. इतरांच्या अंगीं नाहीं आणि कवींच्या अंगीं आहे असें काय असतें ? जें सामान्य माणसांस बोलून दाखवितां येत नाहीं, तें कवीस बोलून दाखवितां येतें. सांगणें किंवा बोलून दाखविणें हें केव्हां साधतें ? जेव्हां जें सांगावयाचें तें सांगणाराच्या मनांत अत्यंत स्पष्ट—ठळक-पणें उभें असतें तेव्हां. आपण सगळीं माणसें आहों; सगळ्यांना नाक, डोळे, कान वगैरे आहेत; इंद्रियें सर्वांचीं सामान्य आहेत; पण कित्येकांचे कान, तर कित्येकांचे डोळे, कित्येकांचें नाक तर कित्येकांची जीभ इतरांच्यापेक्षां अधिक तीव्र असते असें आपणांस आढळून येतें. ज्याची दृष्टि इतरांच्यापेक्षां तीव्र आहे त्याला, दुस-

---

१ Perception, होणारें ज्ञान किंवा बोध अस्पष्ट, अंधुक होतो.

२ Insight आंत खोल जाणारी दृष्टि किंवा Intuition विवेचनावां-चून एकदम अंतःकरणांत विजेच्या चमकेप्रमाणें होणारें ज्ञान.

त्याला न दिसणारेही विषय दिसतात. पांचशें यार्डांवरच्या झाडांचीं पानें ओळखून त्यांवरून झाडें बिनचूक सांगणारीं माणसें असतात कीं नाहीं? जमिनीच्या पोटांत--खोल खडकाच्या खालीं वाहणाऱ्या झऱ्याचा शब्द ऐकून येथें पाणी आहे असें सांगणारे कित्येक भेटतात कीं नाहीं? सर्व माणसांना जरी सामान्यतः तींच इंद्रियें असलीं तरी त्या इंद्रियांच्या ज्ञानशक्तींत फार तफावत असते असें आपल्या आढळांत येतें. ही तफावत अभ्यासानें पुष्कळच वाढते. दृष्टीचें दिसणें, कानाचें ऐकणें, नाकाचें वास घेणें, जिभेचें चाखणें आणि त्वचेचें लागणें किंवा लागलेलें समजणें जितकें तीव्र तितकें त्या त्या इंद्रियानें गोचर होणाऱ्या विषयाचे मनावर उठणारे ठसे ठळक असतात. हे ठसे ठळक असतील त्याप्रमाणें त्या त्या विषयांची ओळख व त्यांपासून होणारा आनंद हीं ठळक असावयाचीं. इतरांना जें सांगतां येत नाहीं तें जर कवीला सांगतां येत असलें तर त्याचें पहिलें कारण इंद्रियांच्या द्वारें त्याच्या अंतःकरणावर उठणारे ठसे ठळक असून त्याचें अंतःकरण ते ठसे उठतांच थरारणारें, सुखावणारें असतें हें होय असें म्हणावयास काय हरकत आहे? भरधांव धांवणारा घोडा पुष्कळांनीं पाहिलेला असतो. परंतु भरधांव पळतांना त्याच्या मानेची होणारी कमान, फुंदारणाऱ्या नाकपुड्या, तरारणारें शेंपूट, आणि अंगावर येणारा फेंस कवीच्या दृष्टींत जितका ठसतो तितका इतरांच्या ठसत नाहीं. व म्हणूनच इतरांना त्याचें बरोबर वर्णन करितां येत नाहीं. पण तें कवीनें केलें म्हणजे त्याचें कौतुक वाटतें आणि आपण पाहिलेल्या गोष्टींचें स्मरण होऊन व वर्णनाचा तंतोतंतपणा पाहून त्यांतील सारखेपणानें त्यांना आनंद

होतो. इंद्रियांवर सारखे घाव घालणारे विषय सर्वत्र थाटलेले आहेत, रूपरसगंधादि गुणांनीं भरलेलें सर्व वस्तुजात आपल्या अस्तित्वाचे निरोप आपापल्या मुखत्यारांमार्फत मनोराजाकडे पाठवीत असतें. हे निरोप पोंचविणारे मुखत्यार जितके समर्थ असतील, आणि ते घेणाऱ्या मनोराजाची जितकी तयारी असेल त्या मानानें निरोपाचें साफल्य व्हावयाचें! मधुर गंध सढळपणानें चोहोंकडे वांटणारीं, वाहत्या वाऱ्यांकडून लुटविणारीं सुवासिक कुसुमें हंसतमुख समोर उभीं असलीं तरी पडसें आलेल्या माणसाला त्यांचा सुगंध काय होय? ज्यांचीं घ्राणेंद्रियें जिवंत आहेत किंवा जिवंत होणारीं आहेत त्यांना मात्र त्यांची मजा समजते. अनेक भिन्न भिन्न रंगांच्या छायांनीं, व मनोहर संगमानें मनोरम होणारीं फुलें आजूबाजूला गजबजून उगवलीं किंवा उमललीं असलीं तरी ज्यांना पाहते डोळे नाहींत त्यांना त्यांचा काय उपयोग? रंगाचे संदेश आणणारे नेत्र हवे, त्यांना त्यांची ओळख हवी, आणि मनाच्या फलकाच्या अंगीं या संदेशाच्या संपर्कानें थरारण्याचें सामर्थ्य हवें. तरच रंगाची गंमत समजणार. या बाबतींत आमच्या कवींचा पंगूपणा चिंतनीय आहे. फुलांचा गंध तेवढा आमच्या विशेष लक्षांत येतो. त्यांचें रंगवैचित्र्य त्यांच्या फारसें खिजगणतींत नसतें. आमच्या वाङ्मयांत फुलांचा उल्लेख त्यांच्या सुवासापुरताच बहुधा झालेला आढळतो. त्यांच्या रंगांकडे कवींचें लक्ष जातें तर रंगसंपत्तीचें वर्णन इंग्रजी वाङ्मयांत जसें सांपडतें तसेंच आमच्या वाङ्मयांतही सांपडलें असतें. पण तसें तें कोठें फारसें सांपडत नाहीं. इंद्रियगोचर विषयांचें यथावत् चित्र वठविण्यास इंद्रियज्ञान तीव्र असून त्याच्यायोगें थरारणारें मन

पाहिजे. तरच वस्तूची मनांतील प्रतिमा किंवा छाया ठळक आणि सजीव, सगुणप्राय असते.

विषयाच्या—बाह्य अथवा आन्तर वस्तूच्या—मनोमय प्रतिमा किंवा छाया स्पष्ट व सगुणप्राय उभ्या करण्याची शक्ति असल्याशिवाय कोणीही कवि होणें शक्य नाहीं. ट ला ट आणि प ला प जोडणारे कारागीर कितीही झाले तरी ते कवि नव्हत. जें दुसऱ्यांस—सामान्य जनतेला दिसत नाहीं किंवा दिसलें तरी तिच्या दृष्टींत भरत नाहीं, जें इतरांस ऐकूं येत नाहीं किंवा तितकें त्यांच्या कानांत भरत नाहीं, जें इतरांस स्पर्शानें, घ्राणानें, किंवा रुचीनें तितकें समजत नाहीं किंवा त्यांचें मन वेधीत नाहीं, तेंही अत्यंत सूक्ष्म व स्पष्टपणानें ज्याच्या मनफलकावर उमटतें तोच झाला तर कवि होणार ! मानसिक प्रतिमांचा[3] ठळकपणा हें कवीच्या मनःसामर्थ्याचें एक आद्य लक्षण आहे. इंद्रियें समर्थ आणि अन्तःफलक कोमल इतकी तयारी प्रतिभेच्या अस्तित्वास अवश्य आहे. कारण प्रतिभेला एकदां फलकावर उमटलेल्या प्रतिमा लागतील तेव्हां हजर करायाच्या असतात. कवीची पदवी ठरविण्यास जी मुख्यतः कारण होते, जिच्या साहाय्यानें कवीची कृति प्रसन्न आणि हृदयांत भरणारी होते, ती प्रतिभा[3] म्हणजे आन्तर बाह्य विषयांच्या मनोमय छाया हव्या तेव्हां हव्या तितक्या ठळक आणि सगुणसदृश उठ-

१ मूर्ति किंवा पुतळीसारखी.

२ Image मूर्ति, पुतळी, वगैरे.

३ Imagination वस्तूंच्या प्रतिमा किंवा मूर्ति उभ्या करण्याची मनाची शक्ति.

विण्याची शक्ति होय. येथें प्रतिभेचा आरंभ आहे. लहान मुलांची कल्पनाशक्ति फार तीव्र अथवा दांडगी असते. तीं जें पाहतात—ऐकतात त्यांचें चित्र त्यांचे मनापुढें फार ठळक उठतें व मागून त्यांच्या अन्तर्दृष्टीला[1] तें फार ठळक दिसतें. तें इतकें कीं, तें मनांतलें चित्र आणि बाहेरचे विषय यांतील भेद तीं क्षणभर विसरतात. कुत्रें अंगावर धांवून आलें म्हणजे प्रत्यक्षसृष्टींत ज्याप्रमाणें तीं भितात—ओरडतात, त्याचप्रमाणें केवळ स्वप्नसृष्टींतही किंवा कल्पनासृष्टींतही त्यांचें होतें. अंगावर धांवून आलेल्या कुत्र्याचें त्यांच्या कल्पनेनें उठविलेलें चित्र इतकें वस्तुसदृश[2] असतें कीं, त्यांना तें खरोखरीचें कुत्रें वाटून तीं निजलेलींही रडत—ओरडत उठतात. ही कल्पनेची बाल्यावस्थेंतील स्थिति सामान्य आहे. पण जीं मुलें पुढें कवि होणार असतात त्यांची कल्पना—प्रतिभा यापेक्षां किती तरी पटीनें समर्थ असते ! वर्डस्वर्थ कवीनें सृष्टविषयांकडून कवीच्या मनाची वाढ कशी होते तें आपल्या ‘ प्रिल्यूड ’ नामक काव्यांत तपशीलवार वर्णिलें आहे. निव्वळ मराठी वाचकांचा त्या काव्याशीं परिचय नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. कारण मला या लहानशा निबंधांत त्या काव्याचा सारांशही देणें शक्य नाहीं. वर्डस्वर्थ लहान असतां तो ज्या डोंगरांच्या कडेनें जाई—येई ते डोंगर निर्जीव असूनही त्याच्या अन्तर्भेदी[3] प्रतिभेवर त्यांचा येवढा संस्कार होई कीं, तो तासांचेतास त्यांकडे पहात चित्रासारखा उभा राही.

१ आंतल्या—मनाच्या—डोळ्यांना.

२ मूळ पदार्थासारखें.

३ Penetrating वरचें कवच फोडून अंतरंगांत शिरणाऱ्या.

सामान्यदृष्टीला अचल म्हणूनच ज्यांचें 'अचल' नाम सार्थ झालें आहे ते डोंगर अदृश्यचैतन्यानें[1] वाढत वाढत चाललेले आणि हालचाल करूं लागलेले, मनुष्याच्या मुद्रेप्रमाणें त्यांची मुद्राही हर्षखेदादि विकार दाखवूं लागलेली त्याला दिसे आणि चमत्कार वाटे. संध्याकाळीं सूर्य मावळत असावा, किंवा सकाळीं सूर्योदय होत असावा, अशा वेळीं डोंगराच्या कडांवर, झाडांच्या बुंध्यांशीं, किंवा उगवणाऱ्या सूर्यनारायणाच्या सुवर्णकिरणांनीं सुवर्णमय केलेल्या जलराशीपाशीं त्यानें उभें राहावें; दोनही हातांचीं बोटें एकमेकांत गुंतवून हातांचा डमरू करून दऱ्या-खोऱ्यांत घुमून राहाणाऱ्या शिळा फुंकाव्या आणि मागून येणाऱ्या निःशब्दतेंत[2] दूरच्या गिरिकन्यकांचें[3] खळखळणें ऐकून पुलकित व्हावें; कडे, झाडें, दऱ्याखोरीं व शांत जलराशी यांवर स्वैरपणें खेळणाऱ्या रविकिरणांचे विलास आणि प्रशांत जलाशयांत प्रतिबिंबित झालेलें नीलाकाश या सगळ्यांचा अनेकरंगी संगम निरखीत राहावें; व सगळे देखावे प्रतिभासामर्थ्यानें आपल्या आन्तर मंदिरांत सांठवून ठेवावे; उत्तरोत्तर त्यांचें मनन-चिंतन करून आणि निरनिराळे निसर्गाविर्भाव अवलोकून त्यांशीं तन्मय व्हावें; निसर्ग आणि निसर्गांत सर्वत्र खेळणारें चैतन्य यांशीं समरस बनून अन्तःकरणांत उद्भूत होणारे भावतरंग आणि प्रतिभेच्या पुढ्यांत उभ्या ठाकणाऱ्या मनोमय मूर्ति, यांशीं विश्रंब्धालाप[4] करीत

---

१ न दिसणाऱ्या, पण गुप्तपणें वावरणाऱ्या जीवकलेनें.

२ शांततेंत, स्तब्धतेंत.

३ नद्यांचें, निर्झरांचें, ओढयांचें, झऱ्यांचें.

४ Converse किंवा Communion; न बोलतां, मौन धरूनच बोलत संवाद करीत.

राहावें. हृदयाच्या मंद ठोक्यापासून मेघांच्या गडगडाटांपर्यंत सर्व शब्दविश्वानें त्याचा एकान्तही दुमदुमावा. गिरिवर आणि वृक्षराज यांच्याशीं संवादांत आणि सहवासांत निर्जन वनाचें निर्जनत्व नाहींसें व्हावें आणि सर्व विश्वाला व्यापून राहणाऱ्या सामर्थ्यांच्या आणि तत्त्वांच्या सगुण[1] संगतींत निःशब्द स्तब्धताही बोलूं[2] लागावी. जी इतरांची स्तिमितता तेंच याचें क्रियाचापल्य. जेथें इतरांस एकटें एकटें वाटून भयाण दिसावें तेथेंच याला मधुर सौहृदांच्या उदात्त समागमाचा अनुभव यावा. जेथें निसर्गाच्या रुद्र सामर्थ्याचा क्षोभ झालेला आणि विध्वंसक अत्याचारांचा संचार माजलेला इतरांस दिसावा तेथें याला शांततेच्या आणि सुव्यवस्थेच्या अधिष्ठानदेवतांच्या कल्याणकर प्रसादाचें सुख लाभावें. अशा रीतीनें जन्मतः तीव्रसंवेदक इंद्रियांचा आणि कोमल-संवेदनक्षम हृदयाचा हा विलक्षण मुलगा जन्मांतरींचे[3] संदेश आणि अमरत्वाचे प्रत्यय दिव्य सुरांनीं गाण्याला पुढें समर्थ झाला, आणि इंग्रजी काव्यवाङ्मयाच्या एका नव्या पंथाचा संस्थापक किंवा प्रस्थापक म्हणून प्रसिद्धीस आला. खऱ्या कवीचीं ज्ञानेंद्रियें आणि हृत्पट याप्रमाणें तीव्र आणि मृदु असतात. बाह्यविषयांकडून येणाऱ्या ठोक्यांस तोंड देण्याला सदा तयार, त्यांचा संदेश स्पष्ट आणि त्वरेनें जशाचा तसा मनोराजाकडे पोंचविण्यांत सदा दक्ष अशीं ज्ञानेंद्रियें, आणि या संदेशांचे ठसे जिवंत उठतील असा हृत्पट, इतकी सामग्री कवीच्या प्रतिभेला

---

१ इंद्रियांना समजणाऱ्या जड वस्तूंच्या संगतीसारख्या.

२ जेथें हूं कीं चूं ऐकूं येतें तेथें स्पष्ट बोलण्याप्रमाणें अर्थबोध व्हावा.

Intimations of the immortality of the soul.

निदानींची हवी असते. यांचीच प्रतिमा होते. हें प्रतिभेचें पहिलें स्वरूप.

हे ठसे मनाच्या स्मृतीच्या कपाटांत सांठवून ठेवणें आणि जरूर लागेल तेव्हां त्यांस कामाला हजर करणें ही त्याच्या पुढची पायरी होय. कवीच्या अंगीं हेंही सामर्थ्य अलौकिक प्रतीचें असावें लागतें. तें असल्यावांचून साधी वर्णनात्मक कविताही त्याला रचितां याव-याची नाहीं. प्रसंगास लागणारा देखावा आणि आसमंतस्वरूप रंगवितांना ढोबळ गोष्टींप्रमाणें सूक्ष्म विशेषांचे रंगही त्याला उठवितां आले पाहिजेत. व ते वस्तुस्थितीशीं जुळले पाहिजेत. त्यांचें वस्तु-स्थितीशीं साम्य जितकें जमेल तितका कवितेचा जिवंतपणा व त्यापासून होणारें कौतुक व आनंद अधिक. कवीची धारणा आणि इतरांची धारणा यांत फरक दिसतो तो येथेंच. रूपरसगंधादि गुण कवीच्या धारणेला महत्त्वाचे आणि प्रिय. त्यांचा कार्यकारणभाव आणि शास्त्रदृष्ट्या किंवा कालदेशदृष्ट्या संबंध यांशीं त्याच्या धार-णेला मुख्यत: कारण नसतें, वसंताचा वसंतपणा त्याच्या धारणेला वासंतिक गंधांनीं, वासंतिक रंगांनीं, वासंतिक पक्ष्यांच्या मधुराला-पांनीं ओळखतां यावयाचा. कालगणितानें पृथ्वीच्या वार्षिक परि-भ्रमणाचें गणन करून तो ठरविणें हें कवीच्या धारणेचें काम नाहीं. तें ज्योतिर्विदांचें काम. कवीला तिच्या परिभ्रमणक्रमांत खुद्द तिच्या आणि नभोवितानाच्या त्रिगुणात्मक स्वरूपांत होणारे फेरफार मात्र

१ Retentive power अनुभव सांठवून, धरून ठेवण्याची शक्ति.

२ दृश्य, इंद्रियांच्या योगें समजणाऱ्या.

निरखावयाचे असतात. इंद्रियगोचर विषयांचीं जिवंत व सगुण चित्रें मनाच्या भांडागारांत खचून ठेवणें आणि तीं लागतील तेव्हां हजर करणें हें प्रतिभेचें काम आहे खरें. पण तें अगदीं आरंभीं–आरंभींचें आहे. प्रतिभा सार्थ व्हावयास तिचा विकास यापुढें पुष्कळ झाला पाहिजे.

बाह्यविश्वाचे जसे ठसे इंद्रियांचे द्वारें उठतात तसेच आन्तरविश्वाचेही ठसे हृदयावर उठत असतात. शरीराच्या संबंधानें होणाऱ्या ज्ञाना–आणि विकारांहून शरीराशीं ज्यांचा संबंध नाहीं–निदान मुख्यतः नाहीं–अशा विकारां–संवेदनांचें महत्त्व फार आहे. माध्यान्हींच्या उन्हाचा चटका अंगाला बसला म्हणजे जो निरोप मनाला पोंचतो आणि जो असुखकर अनुभव येतो त्यापेक्षां–आवडत्या माणसाच्या संतापाचा चटका मनाला बसल्यानें येणारा अनुभव विशेष तीव्र, अधिक महत्त्वाचा असतो. सगळा दिवस जिवापाड श्रम करून थकल्या भागल्यावर पेलाभर गार पाणी प्यावयास जावें तों पाणी सांपडलें नाहीं म्हणजे तहानेच्या तीव्रतेनें होणाऱ्या तापापेक्षां, कित्येक दिवस परक्या माणसांत आणि परक्या देशांत घालवून आप्त व सुहृज्जनांच्या प्रेमळ सहवासाकरितां स्वदेशीं व घरीं यावें तों आप्तांचा ठाव नाहीं आणि सुहृदांची पाठ फिरलेली, असें पाहिल्यानें होणारा ताप शतपटीनें तीव्र असतो. हीं आन्तरसंवेदनें–हे आंतले ठसे स्पष्ट ग्रहण करण्याचें आणि तितकेंच स्पष्ट परत उठविण्याचें सामर्थ्य कवीच्या अंगीं असतें. बाह्यसृष्टीचे संदेश जीव-

१ मनाच्या व्यापारांचे, आंतल्या जगाचे.

२ आंतले ठसे, Internal or inner sensations.

मान स्थितींत तयार ठेवण्यास लागणाऱ्या सामर्थ्यापेक्षां अन्तःसृष्टीचे हे अनुभव जशाचे तसे राखून ठेवण्याचें, आणि हवे तेव्हां पुनः पुनः अनुभविण्याचें सामर्थ्य बरेंच वरच्या दर्ज्याचें आहे. आणि हें सामर्थ्यही प्रतिभेच्या घटकांपैकीं एक असून याचें महत्त्व थोर आहे.

"झुळझुळ वाहे नदी निरंतर वृक्षवरांची आई ॥
पक्षिगणांनीं जीवमान ही तीरावरती राई ॥ १
हिरवळ कांठीं दिसे मनोहर सतरंजी अंथरली ॥
पहुडाया क्षण निवांत जागा गुरांवांसरां झाली ॥ २
गोड कोंवळें नवें उगवलें गवत पोटभर खाया ॥
नवतीचा भर पाहुन होई हर्ष सुखें नाचाया ॥ ३"

.... .... .... ....

.... .... ... ....

असले बाह्यसृष्टीचे देखावे सांठवून शब्दांनीं पुनः दाखविणें हें कवीचें काम असलें तरी तें गौण आहे. पण अन्तःसृष्टींतील प्रसंग आणि घडामोडी–जशाच्या तशा–सांठवून ठेवायाच्या, आणि त्यांचें सगुण सृष्टीच्या सगुण चित्राइतकें ठळक सुसंवेद्य[1] चित्र उठवायाचें, हें प्रतिभेचें फार थोर काम आहे. हें काम कवि ज्या मानानें पार पाडितो त्या मानानें त्याच्या प्रतिभेची प्रतिष्ठा ठरते.

मनुष्यजातीच्या अनुभवांची सामान्य जात एकच असली तरी मूर्ति तितक्या प्रकृति असल्यामुळें प्रकृतिभेद जितका अननुमेय तितकाच किंवा त्याहूनही अनुभवभेद[2] आहे. स्वतांच्या अनुभवांच्या

१ सहज समजेसें. २ निरनिराळ्या प्रकृतींतील फरक अजमावणें जसें कठीण तसें किंवा त्याहीपेक्षां अधिक कठीण निरनिराळे अनुभव अनुमानानें ओळखणें असतें.

आणि आन्तरसंवेदनाच्या साहाय्यानें कोणत्याही स्वेतर प्रकृतीच्या अनुभवाचे प्रत्यय घेणें हें काम त्याहूनही बिकट आहे. स्वतांच्या अनुभवांवरून दुसऱ्या कोणत्याही–कसल्याही स्वभावाच्या माण-साचे अनुभव स्वतां अनुभवायाचे हें काम अधिक अवघड आहे. हा नुसता परकायाप्रवेश नाहीं, परचित्तप्रवेश आहे आणि कवीच्या प्रति-भेला तो साधावा लागतो. बाह्यसृष्टींतील सगुण वस्तुजाताच्या अनंत वैचित्र्याप्रमाणेंच अन्तःसृष्टींतील या मनोमयसाक्ष वस्तुजातांचें वैचित्र्य अनंत आहे. या अनंत वैचित्र्याचे गुणधर्म आणि स्वरूप यांचें प्रतिबिंब कवींच्या कोमल हृदयावर तंतोतंत पडतें व त्या सर्वांशीं त्यांचें तादात्म्य होतें. अंतःसृष्टींतील वस्तूंचे अनुभव आणि संदेश यांशीं एकरूप आणि एकजीव होणारे कवी ज्या देशांत जन्मास येतात ते देश धन्य समजावयाचे. अंतःसृष्टीचे यथार्थ द्रष्टे किती सांपडतात? सामान्य-जनांना तर ही अंतःसृष्टि मोहरबंद पेटीसारखी असते. तींतील व्या-पार, घडामोडी, चमत्कार पाहून–समजून घेण्याचें सामर्थ्य फार थोड्यांचे अंगीं असतें. आम्हां मराठ्यांच्या अंगीं तर तें अलीकडे फारच थोडें होतें–आहे म्हटलें तरी चालेल. आमचे नित्याचे व्यव-हार तेलाच्या घाण्याप्रमाणें चाललेले असतात. सारा दिवसभर गरगर फिरत राहूनही भोंवतीं काय आहे याचें घाण्याच्या बैलास जसें मुळींच ज्ञान होत नाहीं, त्याचप्रमाणें नित्याचे व्यवहार ठरल्या क्रमानें करीत असतां ज्यांच्याशीं संबंध येतो त्यांच्या अंतःकरणांत काय चाललें आहे, सभोंवारच्या बाह्यजगांत व अंतःसृष्टींत कोणत्या घडामोडी होत आहेत याची आम्हांला कित्येक शतकें कल्पनाही नव्हती. कवीला बाह्य विषयाची जशी तशीच आंतर विषयाचीही

चांगली ओळख असावी लागते. शेक्सपीअर किंवा कालिदास याचा विशेष तो हाच होता. बाहेरच्या जगांतील चित्तवेधक वस्तूंकडे त्यांचें लक्ष होतेंच, परंतु त्यापेक्षां अंतःसृष्टींतील विषयांशीं त्यांचा परिचय अलौकिक होता.

पण काव्यंप्रसू[1] प्रतिभेच्या अंगीं एवढीं लक्षणें असून भागत नाहीं. परिचयानें नष्ट केलेलें कौतुक परत आणण्याचें सामर्थ्य तिला असलें पाहिजे. तान्ह्या मुलाला स्वेतर जगच काय, स्वताचें शरीरादिसुद्धां नवीन असतें. सगळाच चमत्कार त्याला! जिकडे वळावें तिकडे नवें दिसल्यानें या नव्याची ओळख करून घेण्याची उत्कंठा असते आणि त्यापासून अनिर्वचनीय सुख होतें. त्याला जिकडे तिकडे इंद्रजालाप्रमाणें अद्भुत भरलेलें दिसतें. हें सगळें ओळखावें, खावें—चाखावें म्हणून त्याचें मन सर्वेंद्रियांतून बाहेर धांवत असतें. ही त्याची धांव, आणि आंतरबाह्य विश्वाची नवलाई संसाराच्या चक्रांत मनुष्य जों जों जास्त जास्त गुरफटतो तों तों नाहींतशीं होतात, आणि सारें नेहमींचेंच—शिळें होतें. नवेपणीं त्यांत जी एक जादू होती—ज्या जादूमुळें सर्वच मनोहर—गोड—अंतः-करण ओढून घेणारें होतें, ती जादू उडून जाते आणि जिज्ञासु आणि बुभुक्षु हृदयाची निराशा होते. प्रथम जें सारें देदीप्य-मान सुवर्ण दिसत होतें तें अतिपरिचयानें फिकें आणि मातीच्या मोलाचें वाटतें; आणि कांहीं तरी हरवलें, कांहीं तरी नाहींसें झालें, हातचें गेलें अशी मनाची स्थिति होऊन चुकल्या गुराप्रमाणें मन खिन्न होतें, मूढ होतें, आणि मेल्यासारखें पडतें. कवीच्या प्रति-

---

१ Poetic, Creative काव्य निर्माण करणाऱ्या.

भेला ही जादू परत आणायाची असते. अतिपरिचयामुळें जें शिळें आणि टाकाऊ झालेलें असतें तेंच नवें आणि जपून ठेवण्यासारखें आहे असें नेहमीं कवीच्या प्रतिभेला वाटत असतें, आणि वाटेसें दाखवितां येतें. पाहिलेलें, ऐकिलेलें, हुंगिलेलें—सारें हृदयापुढें पुनः स्पष्ट उभें करणें, भोगलेलें—अनुभवलेलें पुनः भोगणें—अनुभवणें, प्रस्तुत झालेल्या अप्रस्तुताला परत अप्रस्तुतच करणें, परिचयानें नीरस झालेल्यास परत अपरिचित आणि सरस बनविणें, या तीनही गोष्टी कवीच्या प्रतिभेला करावयाच्या असतात. या तीन गोष्टी कमी अधिक प्रमाणानें करण्याची कवीची जी शक्ति ती प्रतिभा होय.

कवीच्या प्रतिभेचें अनन्यसाधारण लक्षण अजून सांगावयाचेंच आहे. जें आहे किंवा होतें, तें आहेसें करण्यापेक्षां, जें नाहीं किंवा नव्हतें तें आहेसें करण्याचें अघटित घटनासामर्थ्य कवीच्या प्रतिभेचें असतें. कवि हे एकपरी विश्वकर्म्याचे प्रतिस्पर्धी किंवा व्यवसायबंधु होत. सृष्टीचीं आदितत्त्वें कांहीं विशिष्ट व विवक्षित नियमांनीं हालूं चालूं लावून विश्वकर्मा स्वस्थ बसला आहे; आणि घड्याळाला किल्ली दिल्यावर किल्ली संपेपर्यंत घड्याळाचीं सर्व चक्रें ज्याप्रमाणें आपापलीं कामें बिनचूक करीत राहतात त्याप्रमाणें या आदि तत्त्वांना एकदां लाविलेल्या दिशेनें त्यांचे व्यापार चालू राहून आतांपर्यंतचें विश्व 'उत्क्रांत' किंवा विकसित झालें आहे आणि याच क्रमानें पुढें त्याचा विकास होत राहील असें कित्येक तत्त्वज्ञ म्हणतात. विश्वकर्म्याप्रमाणें हीं आदितत्त्वें अनंत, अज्ञात, कदाचित् अज्ञेय असतील. परंतु त्यांचा गाडा चालू आहे. तसें कवींचें नसतें. कवींला नित्य नवें काम करायाचें असतें.

विश्वकर्म्यालाही जें करितां आलें नाहीं तें करायाची कवींना महत्त्वाकांक्षा असते—धमकही असते. गुणावगुण, सदसत्, न्यायान्याय, मलामल, शुभाशुभ, सुखदुःख, रूपारूप व सत्यासत्य निरनिराळ्या प्रमाणांनीं मिसळलेलेंच विश्वकर्म्याच्या विश्वांत सांपडतें. गुलाब आणि त्याचे कांटे हे विश्वकर्म्याला वेगळे करितां येत नाहींत. आजवर आलेले नाहींत. जगांतलें द्वैत विश्वकर्म्याला मोडितां आलें नाहीं. जेथें पहावें तेथें विश्वांत द्वंद्व—द्वैत आहे. फार काय, चराचरांना आणि जडाजडांना सुद्धां विश्वकर्म्यानें एकमेकांशीं बांधून टाकिलें आहे. जडावेगळें अजड अजून कोठें सांपडलें नाहीं. समविषमांचा संगम हें विश्वाच्या विकासाचें, वैचित्र्याचें आणि सौंदर्याचेंही आद्य कारणच असेल कदाचित्! विश्वकर्म्याच्या विश्वांत त्यांची भेसळच सर्वत्र दिसते एवढें खरें! पण कवीची गोष्ट त्याहून किती निराळी आहे! त्याचें कर्तृत्व याहून किती तरी अजब आहे! जें विश्वकर्म्याच्या विश्वांत सांपडत नाहीं तें कवीला निर्मितां येतें. मृत्यूवांचून एकही विषय किंवा वस्तु विश्वकर्म्याच्या जगांत नाहीं ना? अमरांना आणि अमृताला निर्मून ही उणीव कवीनें नाहींशी केली आहे! नुसत्या गुणाचे, नुसत्या न्यायाचे, नुसत्या शुभाचे, नुसत्या सुखाचे, नुसत्या सौंदर्याचे, नुसत्या चांगुलपणाचे आदर्श कवींनीं किती तरी निर्माण केले आहेत! केवल न्याय, केवल सत्य, केवल धर्म उदाहृत करणारीं निर्लेप मानवी कृत्यें कवींनीं मात्र निर्माण केलीं आहेत. विश्वकर्म्यानें पदार्थधर्मांचें घातलेलें कुंपण कवींना मानत नाहीं. किंबहुना सृष्टिनिर्बंधाच्या शृंखलांचा कित्येक वेळां कवीला इतका जाच होतो कीं, त्या तोडून, क्षणभर उच्छृं-

खळ आणि स्वतंत्र वृत्तीनें, विश्वकर्म्याच्या जगानें व्यापिलेल्या विश्वाच्या कक्षेबाहेर, संचार करण्यांतच प्रतिभाशाली कवी पुष्कळदां दंग होतात. ज्ञात आणि परिचित विषयांची आणि वस्तूंची याप्रमाणें अज्ञात आणि अपरिचित प्रकारानें,—अभिनव आणि रमणीय पद्धतीनें उभारणी करणें, किंवा अज्ञात—अपरिचित वस्तूंची व विषयांची ज्ञात—परिचितांसारखी मांडणी करणें हा कवीच्या प्रतिभेचा अत्यंत थोर अधिकार आहे. नसल्यास असतें आणि असल्याचें नसतें करणें, ही कवींची अपूर्व शक्ति आहे. कवींच्या प्रतिभेचा विकास होतां होतां ती या पदवीस पोंचली म्हणजे ती स्वतंत्र, स्वयंभू, स्वयंप्रकाशी झाली. दिक्कालांच्या आणि जन्ममरणांच्या उपाधींना मागें टाकून अनंताच्या व अज्ञाताच्या हातांत हात घालून संचार करीत, आणि इतर मानवांच्या दृष्टीस क्षणोक्षणीं दृश्यादृश्य होणाऱ्या विद्युल्लतेच्या दीप्तीप्रमाणें भासमान होऊन त्यांना आश्चर्यांत, कौतुकांत, आनंदांत निमग्न करीत, ही दिव्यज्योति आपल्या भाग्यवान भक्तांस मधून मधून कधींमधीं भेट देते, आणि त्यांच्या हृदयास नवेंच भरतें आणिते. ते केवळ निरोपाचे—मापाचे धनी होतात. अशा वेळचे त्यांचे उद्गार म्हणजे अगाध अज्ञातांतून सहज प्राप्त झालेले प्रसन्न संदेश होत. दिव्य विभूतींच्या दिव्यदृष्टीसच दिसणाऱ्या चमत्कारांचे संकेत होत. चैतन्याच्या अनिर्बंध विलसनांचे दृग्भास होत. आगष्ट महिन्यांत किंवा नवंबरांत आकाशांत तुटणारे तारे भरदिशीं दिसतात आणि नाहींतसे होतात आणि त्यांच्या मागें त्यांचा प्रवासमार्ग दाखविणारा एक अंधक तेजोपट दिसतो, त्याप्रमाणें या प्रतिभच आविर्भाव क्षणमात्र होऊन त्यांच्या पुसट पुसट खुणा

कवीच्या हृदयांत स्फुरत राहतात. ही दिव्यस्फूर्ति आणि आंतर प्रेरणा ही दिव्यदृष्टि आणि हे आंतर दीप, हे अपूर्वोद्गार आणि अद्भूतावेश, प्रसन्न प्रतिभेचे प्रसाद होत. ते ज्यास प्राप्त झाले ते धन्य! ते आम्हां पामरांच्या कोटींतून दिव्यकोटींत गेलेले भाग्यशाली प्राणी! त्यांच्या प्रतिभेच्या त्यांना भेटी झाल्या म्हणजे त्यांना होणाऱ्या स्फूर्तीनें त्यांचे मुखांतून निघणारे अमृतध्वनी आम्हीं कान पसरून ऐकावे, आणि तिनें वाहूं लाविलेले रस आकंठ प्यावे हेंच आमचें काम. हा अधिकार तरी कितीकांच्या भाग्यांत असतो! धन्य ते ज्यांवर अनंताशीं सहधर्म झालेल्या प्रतिभेची प्रसन्नदृष्टि आहे! आणि त्या प्रतिभाशाली कवींचे शब्द ऐकून त्यांचें हृद्गत ताडण्याचें ज्यांस सामर्थ्य आलें आहे तेही धन्य!

कवीची प्रतिभा म्हणजे काय, ती असते कशी, याचें नुसतें दिग्दर्शन मात्र येथपर्यंत केलें आहे. तिचें यथावत् ज्ञान प्रत्यक्ष तिच्या दर्शनानें किंवा प्रसादानेंच व्हावयाचें. तें करून देण्याचें थोर भाग्य या नम्र लेखकाचें नाहीं! निरुपाय आहे. तसें पुरें ज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत वर दिलेल्या तोटक्या दिग्दर्शनावरच समाधान मानणें भाग आहे. पण प्रतिभा म्हणजे काव्य नव्हे. काव्याचा जन्म होण्यास अवश्य असणाऱ्या अनेक शक्तींपैकीं ती एक आहे. ती एक शक्ति आहे, पण तिचा विकास झाल्याशिवाय, अभ्यासानें ती वाढविल्या, आणि तशाच प्रसंगांनीं तिला हालवून जागें केल्याशिवाय काव्यनिष्पत्ति होणें नाहीं. सगळ्या पदार्थांत वीज असते असें शास्त्रज्ञ सांगतात. पण यंत्रांतून काढिलेल्या विजेप्रमाणें ती दिसत नाहीं किंवा तिचे चटके बसत नाहींत. किंवा घरांत इतके पदार्थ असतां आपोआप दिवे लागत नाहींत. ते मुद्दा-

मच लावावे लागतात. कां कीं प्रत्येक पदार्थांत असणारी वीज सुप्त किंवा संभवरूप असते. ती जागी होऊन किंवा जन्मून चपला बनण्यास तिला इतर साधनांनीं हालवावी लागते. जस्त आणि तांबें यांच्या तुकड्यांवर तेजाब ओतून त्यांचें लग्न लावावें लागतें, किंवा लग्नाकरितां सजविलेल्या नवरानवरींप्रमाणें, आणि त्यांच्याकरितां मांडलेल्या वेगळ्या पाटांप्रमाणें, तिचीं दोन स्वरूपें आणि त्यांचीं अधिष्ठानें तयार करावीं लागतात. तेव्हां ती चपला बनते आणि तिचें चापल्य आपल्याला कामास जुंपितां येतें. शमीच्या झाडांत किंवा चकमकींत, गारगोटी आणि लोखंड यांत अग्नि असतो म्हणतात. पण तो एरव्हीं कोठें दिसत नाहीं किंवा अंगाला लागत नाहीं. शमीच्या लांकडावर दुसरें लाकूड घासावें, लोखंड—गारगोटींची टक्कर लावावी, तेव्हां त्यांत लपून बसलेला किंवा सुप्त असलेला अग्नि बाहेर पडतो आणि प्रसन्न होऊन आपलें काम करूं लागतो. तसेंच प्रतिभेचें आहे. ती सर्वांचे अंगीं जन्मतः कमी अधिक असतेच असते. कांहीं मानसशास्त्री तर म्हणतात:—जन्मतः सर्व माणसांची प्रतिभाच काय सर्व मनःशक्ति सारख्याच असतात. तें कसेंही असो, सामान्यतः सर्वांच्या वांट्यास प्रतिभेचा थोडा फार भाग जन्मतःच आलेला असतो असें धरून चालण्यास हरकत नाहीं. पण सारेच कवी निपजत नाहींत. याचें कारण सगळ्यांच्या प्रतिभा जाग्या व्हाव्या अशी इतर सामग्री अनुकूल नसते त्यांना बाहेर आणणारे, त्यांचा विकास करणारे प्रसंग नसतात. शिक्षणाच्या अभावामुळें पुष्कळांची प्रतिभा जागचे जागीं दडपून जाते. कोणी गरीब म्हणून, कोणी अति श्रीमंत म्हणून, कोणी भलत्याच संग-

तींत पडले म्हणून. कोणी कशानें तर कोणी कशानें, याप्रमाणें बहुतेक प्रतिभेच्या विकासास मुकतात! "महासागराच्या तळीं किती तरी अगणित आणि अमोलिक रत्नें पडलेलीं असतील! पण तीं जोंवर बाहेर आलीं नाहींत, कारागिराच्या हातीं पडलीं नाहींत आणि अनुरूप कोंदणांत बसलीं नाहींत, तोंपर्यंत त्यांचें तेज आणि योग्यता कोणास कळणार!" प्रतिभाशक्ति मुळांत असली तरी ती जागृत व विकसित करणारे विषय भोंवतीं पाहिजेत, आणि अभ्यासानें ती परिपक्क झाली पाहिजे; भौतिक, मानवी आणि राजकीय परिस्थिति प्रतिभेच्या वाढीला अनुकूल पाहिजे. जे संदेश, जीं संवेदनें, जे क्षोभ, जे आवेग प्रतिभा सांठवून ठेवणार, आणि परत हजर करणार ते मूळचेच तिला वेधणारे पाहिजेत. त्यांत कांहीं तरी विशेष पाहिजे. नुसत्या हरिकथा, नुसते वीरप्रताप गाणारीं काव्यें सामान्य प्रतिभेच्या माणसांसही रचितां येतील. तशीं काव्येंही ज्या देशांतल्या लोकांत प्रचलित नाहींत तो देश आणि ते लोक अजून मानवी सुधारणेला पारखे आहेत असेंच म्हटलें पाहिजे. सुधारणेच्या प्रवासांत अगदीं मागें पडलेले रानटी लोकही घेतले तरी त्यांचेमध्यें गाणीं आणि तीं रचून म्हणणारे शाहीर असावयाचेच. त्यांच्या त्यांच्यांत जो मोठा बलवान्, जो पुष्कळ खाणारा, पुष्कळ शिकार मारणारा, फार पळणारा, आणि पटाईत तिरंदाज असेल त्याचे पराक्रम सांगणारे पोवाडे त्यांच्यामध्येंही असावयाचे. दरएक उत्सवाच्या—जलशाच्या वेळीं हे पोवाडे, हीं गाणीं, म्हणत स्त्रीपुरुषांचे मेळे नाचत असावयाचे. कोंकणांतल्या कित्येक

१ Civilization नागरतेचा संस्कार.

डोंगरी जातींचीं आवडतीं गाणीं ठरीव सुरांनीं म्हटलेलीं ज्यांनीं ऐकिलीं असतील त्यांना वरील म्हणणें ताबडतोब समजेल. या पोवाडे–वजा काव्याला, फक्त पाहिलेलें किंवा ऐकिलेलें किंवा पाहिलेलें आणि ऐकिलेलें स्पष्टपणें सांठवून पुनः हजर करणारी कल्पना असली, आणि तालांत बसणारी व गमतीची वाटेशी शब्दसामग्री असली म्हणजे झालें! पण या काव्याला ही दुसरी सामग्री लागतेच. म्हणजे, काव्यविषयाला लागणारीं सगळीं चित्रें, सगळे संदेश, सगळे मनोविकार जरी एकामागून एक जसे हवेत तसे प्रतिभेनें मनापुढें हजर केले तरी जनांना ऐकूं येणारें काव्य कोठें आहे? त्यानें फक्त अमूर्त—निर्गुण काव्य तयार होईल, कवितेचा जीव सांपडेल. पण नुसत्या जीवानें काम भागतें थोडेंच! प्राणाला कुडी मिळाली पाहिजे ना! कुडीवांचून प्राणाचा प्राणी होत नाहीं, तसेंच नुसतें प्रतिभाचित्र म्हणजे काव्य नव्हे. मनोमय छाया आणि मनोमय मूर्ति, मनोमय प्रसंग आणि मनोमय भावना यांनीं मनोमय काव्य होईल. तें जगाला दिसणार नाहीं किंवा ऐकूं येणार नाहीं. तसें व्हावयाला या मनोमय काव्याला आवरण मिळालें पाहिजे. काव्याचा प्राण आणि काव्याचा देह यांची गांठ पडली पाहिजे. तसें झालें म्हणजे काव्याचा जन्म व्हावयाचा.

---

## राम गणेश गडकरी.

### ( "प्रेमसंन्यास" )

प्रवेश सहावा.

( कचेरीचा देखावा. सर्व मंडळी. साक्षीच्या पिंजऱ्यांत गोकुळ. )

**शिरस्तेदारः**—ईश्वरसाक्ष खरें बोलेन, खोटें बोलणार नाहीं.

**गोकुळः**—ईश्वरसाक्ष खरें बोलेन, खोटें बोलणार नाहीं.

**शिरस्तेदारः**—तुमचें नांव काय?

**गोकुळः**—गोकुळ.

**शिरस्तेदारः**—बापाचें नांव काय?

**गोकुळः**—वृंदावन.

**शिरस्तेदारः**—आडनांव?

**गोकुळः**—विसरभोळे.

**वकीलः**—बरें आतां सांगा पाहूं, तुमचें वय काय?

**गोकुळः**—( स्वगत ) हं; तोच प्रश्न! आतां काय करावयाचें? नांवांतल्या अक्षरांना दोन्ही वकिलांनीं गुणून त्यांत न्यायाधीश मिळवावयाचा; हो, असेंच; नाहीं पण, मला वाटतें अक्षरांना न्यायाधिशानें गुणून दोन वकील मिळवावयाचे असें असावें! हं हेंच बरोबर आहे! बारा एके बारा न् दोन चवदा. ( प्रगट ) चवदा वर्षें!

**वकीलः**—चवदा वर्षें! तुम्ही शुद्धीवर आहां का?

**गोकुळः**—( स्वगत ) चुकलों; वकिलांनींच गुणावयाचें! बारा दुणें चोवीस न एक पंचवीस. ( प्रगट पंचवीस.

वकीलः—मग पहिल्यानें चवदा कशीं सांगितलीं ?

गोकुळः—पहिल्यानें फुकट गेलेलीं वर्षें जमेस धरलीं नव्हतीं.

वकीलः—वः या हिशेबानें पहिल्यानें शून्यच उत्तर द्यायाला हवें होतें ! तुम्ही घाबरलां आहां काय ?

गोकुळः—मी घाबरलों ! तो काय म्हणून ! मीं कांहीं माझ्या बायकोचा खून केला नाहीं !

वकीलः—तुम्ही आरोपीलां ओळखतां का ?

गोकुळः—तुम्ही आपल्या बंधूंना ओळखतां का ? न्यायाधीशसाहेब या शिरस्तेदारांना ओळखतात का ?

वकीलः—माझ्या प्रश्नाचें नीट उत्तर द्या. तुम्ही आरोपीला ओळखतां का ?

गोकुळः—हो; त्यांना ओळखतों आणि आपल्याला पण चांगला ओळखून आहें बरें मी.

वकीलः—जयंताला सोडविण्यासाठीं तुम्ही एखादी खोटी शपथ घ्याल का ?

गोकुळः—अलबत्, कां नाहीं ? एक सोडून हजार घेईन ! प्रत्यक्ष श्रीकृष्णांनीं सुद्धां सांगितलें—

वकीळः—तें राहूं द्या ! हें पत्र माहीत आहे का तुम्हांला ?

गोकुळः—हो ! माहीत आहे ! लीलाबाईनीं जयंतांना पाठविलेलें पत्र हें !

वकीलः—किती वेळां पाहिलें आहे तुम्हीं हें ?

**गोकुळः**—एक वेळां !

**वकीलः**—जयंताचें बायकोशीं पटत नाहीं हें खरें आहे कीं नाहीं ?

**गोकुळः**—हें खरें आहे ! जयंत बायकोचा अत्यंत तिरस्कार करीत असत.

**वकीलः**—तुमची बायको तुम्हांला वागवून घेतां येत नाहीं. हें खरें आहेना ?

**गोकुळः**—त्याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? तुम्ही आपली बायको सांभाळा—

**न्यायाधीशः**—गप्प बसा; ते विचारतात त्याचें उत्तर द्या.

**गोकुळः**—न्यायमूर्तींना माझी एक विनंती आहे. माझ्यामतें आमचीं घरगुती भांडणें न्यायासनासमोर आणण्याचें कांहीं कारण नाहीं; असल्या प्रश्नांचीं उत्तरें आम्ही देणार नाहीं ! नाहीं तर आम्ही मुळीं साक्षच द्यावयाला तयार नाहीं !

**न्यायाधीशः**—असें कसें चालेल ? साक्ष दिलीच पाहिजे ! न्यायाला मदत ही प्रत्येकानें केलीच पाहिजे.

**गोकुळः**—हा चांगला न्याय आहे ! यांनीं आमच्या बायकोच्या वाटेल तशा चौकशा कराव्या आणि आम्हीं यांच्या बायकोचें नुसतें नांव काढिलें कीं आपण आम्हांला गप्प बसा म्हणून म्हणतां ! मी जरा तोंडाचा फटकळ आहें—आपण आणि हे वकील लोक नेहमीं एक ठिकाणीं कामें करितां तेव्हां आपला त्यांच्याकडे थोडासा ओढा असणें स्वाभाविक आहे. त्याला कोण गैर म्हणेल ?

( लोक हंसतात ). हं साहेब, हंशावारी बाबत घालवूं नका. आपण न्यायाधीश आहां, असा पक्षपात आपल्याला शोभत नाहीं! आपल्याला वकील आणि साक्षीदार सारखेच. मीही थोडाबहुत कायदा जाणितों! चार पुस्तकें पाहिलीं!

**न्यायाधीशः**—( हंसून ) काय वेडगळ मनुष्य आहे. ( वकिलास ) चालूं द्या तुमचे सवाल!

**वकीलः**—तुमचा स्वभाव थोडासा विसराळू आहे कीं नाहीं?

**गोकुळः**—असेल, तुम्हांला काय त्याचें? तुम्ही आपले प्रश्न विचारा; उत्तर मिळालें नाहीं, मग बोला! आमच्या वकिलांनीं पढविलेले सारे जबाब सवालावांचून पाठ म्हणून घ्या हवे तर.

**वसंतः**—अरे गोकुळ मीं कधीं तुला पढवून ठेविला आहे रे?

**गोकुळः**—असें कां बरें वसंतराव? मी नाहीं प्रतिज्ञेवर खोटें बोलावयाचा!

**वसंतः**—( स्वगत ) चांगली सोय! आणि हा आमच्या तर्फेचा साक्षीदार!

**वकीलः**—काय हो, हें पत्र तुम्हीं किती वेळां पाहिलें आहे?

**गोकुळः**—काय हो, हा प्रश्न तुम्ही किती वेळां विचारणार?

**वकीलः**—तुम्ही उत्तर द्या आधीं.

**गोकुळः**—दोन वेळां.

**वकीलः**—मघांशीं एक वेळ पाहिलें म्हणालां, आतां दोन वेळां पाहिलें म्हणतां, हें काय?

**गोकुळः**—मघांशीं विचारलें त्यापूर्वीं एक वेळां पाहिलें होतें, आतांच्या विचारण्याला मघांशीं पाहिलें ती वेळ हिशेबीं धरिली पाहिजे! पूर्वींची एक व मघांची एक मिळून दोन.

**वकील:**—वसंतराव, झालेल्या प्रश्नोत्तरांवरून तुमच्या साक्षीदाराची नालायकी दिसून येत आहे. या मनुष्याला व्यवहारज्ञान नाहीं, हा विसरभोळा आहे; त्याची आणखी फेरतपासणी केली तर तुमचें नुकसान होणार! तेव्हां तुमची इच्छा असल्यास याची साक्ष काढून घेण्याची मी संधि देतों.

**वसंत:**—या संधीबद्दल मी आपला आभारी आहें! न्यायमूर्तींनीं असें करण्याचा हुकूम द्यावा.

**न्यायाधीश:**—गोकुळ, तुझ्या नालायकीमुळें तुझी साक्ष काढून टाकण्यांत येत आहे. तुला बाहेर येण्याची परवानगी आहे.

**गोकुळ:**—इतकेंही करून मी नालायक! शाहाण्यानें कोर्टाची पायरी चढूं नये म्हणून वाडवडील म्हणत आले तें कांहीं खोटें नाहीं! ( पिंजऱ्यांतून बाहेर येतो. )

**वकील:**—ही साक्ष होण्यापूर्वी जो पुरावा आला त्यावरून मला काय सांगावयाचें तें मीं मघांशींच सांगितलें आहे! अधिक बोलण्याची माझी इच्छा नाहीं.

**वसंत:**—त्याचप्रमाणें मलाही कांहीं बोलावयाचें नाहीं. फक्त न्यायमूर्तींनीं व पंचांनीं आरोपीच्या स्थितीकडे लक्ष द्यावें एवढीच माझी विनंती आहे.

**न्यायाधीश:**—पंचांतील सद्‌गृहस्थहो, आपल्याला आंत जावयाचें आहे काय?

**प्रमुख पंच:**—नाहीं.

**न्यायाधीशः**—मग आपलें मत काय आहे ?

**प्रमुख पंचः**—दोषी.

**न्यायाधीशः**—आपलें सर्वांचें एक मत आहे ?

**प्रमुख पंचः**—होय, सर्वांचें एक मत आहे.

**न्यायाधीशः**—आरोपी जयंत, आमच्यापुढें आलेल्या पुराव्या-वरून तुझ्यावर खुनाचा आरोप शाबीत होत आहे ! पंचांचा निकालही तुझ्या विरुद्ध आहे ! तुझ्या बायकोबद्दल तुला अत्यंत तिटकारा होता. तिचा नापत्ता झाल्यानंतर तीनचार दिवसांनीं तिच्या प्रेताचे तुकडे विहिरींत टाकतांना तुला पुराव्यानिशीं शिपा-यांनीं पकडलें आहे ! पेटींतील दागिन्यांवरून व पत्रांवरून आणि लीला व सुशीला यांच्या साक्षीवरून तें प्रेत मनोरमेचेंच होतें असें सिद्ध होतें. तुझी बायको नापत्ता होण्यापूर्वीं, लीला व तूं यांना अयोग्य रीतीनें बोलतांना सर्वांनीं पाहिल्यावर त्यावरून तुझा व मनोरमेचा मोठा तंटा झाला असें कमलाकराच्या साक्षीवरून सिद्ध झालें आहे. बाबासाहेबांनीं लीलेला पुनर्विवाहाची परवानगी दिलेली ऐकल्यापासून तुझ्या मनाची चलबिचल होऊं लागली असेंही ठर-लेंच आहे. त्याअर्थीं तूं हा खून बुद्धिपुरःसर केलास याबद्दल मुळींच संशय उरत नाहीं. अशा अमानुष रीतीनें खून करणारावर दया करणें म्हणजे दयेचा दुरुपयोग करण्यासारखें आहे ! तुझ्या शिक्षेबद्दल तूंच जबाबदार आहेस. ह्याची जबाबदारी परमेश्वराकडे नाहीं; राजाकडे नाहीं; मनुष्याकडे नाहीं ! सबब आपली बायको

मनोरमा हिचा बुद्धिपुरःसर खून केल्याचा आरोप तुझ्यावर पूर्णपणें शाबीत होत असल्यामुळें तुला मरेपर्यंत फांशीवर लटकविण्याची शिक्षा देण्यांत येत आहे.

जयंतः—हा दुर्दैवा!

( न्यायाधीश सही करितात, व टांक मोडून टाकितात. )

पडदा पडतो.

---

# प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन.

( " मृत्युलेख " )

## मि. आगरकर यांचें अल्पचरित्र.

" There was born here a mighty man. Whose light was to flame the beacon over long centuries and epochs of the world. A most gentle heart withal full of pity and love as indeed the truly valiant heart ever is. I will call this man great— great as an Alpine Mountain, so simple, honest, spontaneous, not setting up to be great at all."

CARLYLE.

" जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ।
देह 'झिजवीती' उपकारें ॥ " तुकाराम.

सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडापासून दोन मैलांवर टेंभू नांवाचें लहानसें खेडें आहे. तेथें सन अठराशें–छप्पन सालीं–म्हणजे उत्तर हिंदुस्थानांत पेटलेल्या भडक्याची तयारी होत होती त्या सालीं–गोपाळरावजींचें जन्म झालें. यांचे वडील रा. रा. गणेश विष्णु आगरकर हे प्रकृतीनें दमेकरी व स्थितीनें अगदीं गरीब असल्यामुळें त्यांचे हातून रा. रा. गोपाळरावजींचें शिक्षण व संवर्धन नीटपणें होणें अशक्य होतें, व त्यामुळें अगदीं लहानपणींच गोपाळरावजींस आईबापांचें आश्रयछत्र व आपलें आवडतें जन्म–घर सोडून कऱ्हाडास त्यांचे मामा रा. रा. रामचंद्र विष्णु

भागवत यांचे आश्रयास जाऊन रहावें लागलें. बाळपणाच्या हूड-पणांत व व्रात्य लीलांत दिवस मजेनें घालवीत घालवीत रा. गोपाळ-रावजी वयाचे बाराव्या तेराव्या वर्षापर्यंत कऱ्हाडासच होते. त्या वेळचा कृष्णेच्या वाळवंटांत घातलेला हुतुतु, कृष्णा—कोयनेच्या प्रीतिसंगमानें फुलून गेलेल्या अफाट पात्रांत डुंबणें व पोहणें, संव-गड्यांबरोबर खेळलेले दांडगे खेळ, वगैरे गतगोष्टींची आठवण झाली म्हणजे त्या वेळच्या स्थितीचा विद्यमान स्थितीशीं असणारा ठळक विरोध लक्षांत येऊन रा. गोपाळरावजींना सकौतुक खेद होई. व त्यांच्या समाचारास जाणाऱ्या मंडळीसही या गोष्टी ऐकून इतक्या दांडग्या प्रकृतीचे गोपाळराव चाळशी उलटण्यापूर्वींच इतके थकले कसे, याचें आश्चर्य वाटे. पोटाचे कितीही हाल असले किंवा एकंदर जीवितमार्गांत कितीही अडचणी असल्या तरी बाळपणीं त्यांचा तितका विधिनिषेध वाटत नाहीं. त्याचप्रमाणें गोपाळ-रावजींची कऱ्हाडास स्थिति होती. बारा वर्षांच्या वयापर्यंत कऱ्हा-डासच गोपाळरावजींचा सगळा मराठी व इंग्रजी तीन इयत्तांइतका अभ्यास झाला. या पुढच्या अभ्यासाचें साधन कऱ्हाडास नव्हतें. बरोबरीचे एक दोन संवगडी पुढील अभ्यासासाठीं पुण्यास आले. अर्थात गोपाळरावजींसही तसेंच करण्याची इच्छा झाली. पण ती सफल व्हावी कशी ? यांना पुण्यास आश्रय देणार कोण ? यांच्या शिकण्याकरितां पाण्यासारखा पैसा ओतावा कोणीं ? तें कांहीं शक्य नव्हतें. अभ्यास तर पुढें करावयाचा, मार्ग तर दिसत नाहीं, अशी स्थिति होऊन गेली. वय लहान तरी रा. गोपाळरावजींना ऐट जंगी; दम मोठा; त्यांचें ओज प्रखर; तें त्यांना चैन पडूं

देईना. स्वभाव धडकबाज; झाला, त्यांचा निश्चय झाला, व त्यांनीं कऱ्हाड सोडून रत्नागिरीस त्यांचे एक आप्त होते, त्यांचा आसरा मिळेल या आशेनें तिकडचा रस्ता धरला! या तेजस्वी रत्नास चांगलाच उजळा मिळाला; त्याची प्रभा विशेषच चमकण्यास आरंभ झाला. आजपर्यंत शमींतील अग्नीप्रमाणें गुप्त असलेली त्यांची अभिमानी अन्तर्ज्योति प्रज्वलित करणारे रत्नागिरीस पुष्कळ प्रसंग आले. रत्नागिरीस असतां गोपाळरावजी कांहीं दिवस वारांवर निर्वाह करीत होते. शाळेच्या खर्चाकरितां व अभ्यासार्थ जीवधारणा होण्याकरितां त्यांना येथें दुसऱ्याचीं धोतरें धुवावीं लागत. पडेल तें काम—सांगतील ती चाकरी, करावी लागे; व क्वचित् थोड्यांचे गोड तर बहुतेकांचे कठोर हृदयाला घरें पाडणारे वाग्बाण गट्ट गिळून काळ काढावा लागे. "गरिबीमुळें खरीं माणसें पुढें येतात" असें म्हणणारे हरीचे लाल पुष्कळ असतील. आम्ही तर म्हणतों, "क्षुच्चिंतेचा थंड गारठा थिजवी तेज हिऱ्याचें। आपत्तीच्या हिमें नांवही करपे हृज्ज्योतीचें" ही ग्रे कवीची उक्तीच जगांत अधिक प्रत्ययास येते. गरिबीच्या असह्य गारठ्यानें रा. गोपाळरावजींची स्फूर्तज्योति मालविली नाहीं, हें आम्ही आपलें व आमच्या समाजाचें भाग्य समजतों. असो. गोपाळरावजींनीं अशाप्रकारें कशींबशीं दोन वर्षें रत्नागिरीस काढिलीं, व तेवढ्यांत पुढच्या दोन इंग्रजी इयत्ता त्यांनीं पदरांत पाडून घेतल्या. पण कितीही दमदार गडी असला तरी परिस्थिति हट्टानें विरुद्ध झाल्यावर तिजपुढें त्याचा इलाज चालत नाहीं. रा. गोपाळरावजींस शेवटीं रत्नागिरी सोडावी लागली, व ते परत कऱ्हाडास गेले. ग्रहदशेनें अजून त्यांना सोडलें

नव्हतें. इतरांची ग्रहदशा साडेसातच वर्षें टिकते. यांची जन्मापासून जन्मान्तरापर्यंत सारखी सुरू होती! तरी तिच्याशीं नेटानें झुंजत हा खंबीर गडी वयाचीं एकोणचाळीस वर्षें तगला, हें पुढील वृत्तावरून वाचकांच्या लक्षांत येईल. कऱ्हाडास आल्यावर "आतां काय करावें" हा विचार दत्त म्हणून पुढें उभा. शिकण्यास शाळा नाहीं—साधन नाहीं. तेव्हां त्यांनीं तेथील दवाखान्यांत कांपौंडरची नोकरी धरली. समाजाच्या रोगांचें परीक्षण करून त्यांवर औषधोपचार सांगणाऱ्या या भावी सामाजिक डाक्तरास कांपौंडरीच्या चांचणींतून जावें लागलें हें एकपरी बरें झालें म्हणावयाचें! या नोकरींत असतां आंतल्याआंत धुमसत राहिलेली त्यांची उदात्त ज्योति त्यांना स्वस्थ बसूं देईना. नाइलाज झाला. सोडली, त्यांनीं ती नोकरी सोडली, व मुनसिफ कोर्टांत लिहिण्याची जागा पतकरली. पण नाहीं; समाजनौकेचें होकायंत्र ज्याच्या हातीं यावयाचें होतें त्याची अंतर्ज्योति तसल्या खर्डेघाश्या गुलामगिरींत कोठून संतुष्ट राहणार? तिची तडफड सुरू होती व त्यांतच नुकतेच कैलासवासी झालेले रा. सा. बाबासाहेब नागपूरकर, तेथील मुनसिफ, यांच्या उत्तेजनपर शब्दांची भर पडली. मग काय! गोपाळरावजींनीं त्याही जागेचा राजीनामा दिला, व कऱ्हाडास रामराम ठोकला. पुण्याचा आश्रय करावा म्हणून ते येथें आले. येथें त्यांचे दुसरे मामा रा. रा. सदाशिवराव भागवत हे खडकवासल्याच्या कामावर होते. पण लवकरच ते पुणें सोडून वऱ्हाडाकडे गेल्यामुळें त्यांच्यामागून गोपाळरावजींसही वैदर्भ देशाकडे आपलें तारूं हाकारावें लागलें. अकोल्यास त्यांनीं सहाव्या व सातव्या

इयत्तेंचा अभ्यास केला. सातव्या इयत्तेंत ते प्रसिद्ध रा. रा. विष्णु मोरेश्वर महाजनि यांच्या हाताखालीं शिकत होते. त्या वेळची एक आख्यायिका लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या आख्यायिकेवरून गोपाळरावजी जात्या किती पाणीदार, कुर्रेबाज व तेजस्वी होते याची थोडीशी कल्पना येईल. एके दिवशीं कांहीं कारणामुळें गोपाळराव-जींचा अभ्यास झाला नव्हता, तेव्हां त्यांना रागें भरण्याच्या उद्दे-शानें रा. विष्णुपंत म्हणाले "तुमच्या हातून काय अभ्यास होणार आहे? तुम्ही असेच रखडत पडणार." रा. गोपाळरावजींस तेवढें सहन न होऊन त्या तडफेसरशीं त्यांनीं उत्तर दिलें, "काय? रखडत पडणार! आपल्यासारखाच एम्. ए. होईन तरच नांवाचा आगरकर." हें उत्तर व या उत्तराबरहुकूम झालेली कृति शाळें-तील प्रत्येक विद्यार्थी आपल्या हृदयावर पक्की खोदून ठेवील तर किती बरें त्यांचें कल्याण होईल? असो. याप्रमाणें अकोल्याचे हायस्कुलांतून अठराशें पंच्याहत्तर सालीं प्रवेशपरीक्षा पास होऊन ते अकोला सोडून पुण्यास आले.

येथून त्यांच्या चरित्राच्या दुसऱ्या भागास आरंभ झाला म्हणा-वयाचा. सहाव्या इयत्तेपासून ज्या विचारांचें अस्फुट उद्वर्तन त्यांचे मनांत होत होतें त्या विचारांस व तदनुरूप नियंत्रित होणाऱ्या त्यांच्या इच्छांस येथून विशेष नियत, स्फुट व व्यवस्थित स्वरूप येण्यास आरंभ झाला. तथापि त्यांच्या पाठलागांतच आनंद मानणारी ग्रह-दशा अजून त्यांचा पिच्छा पुरवीतच होती. कॉलेजांतील उदार शिक्षण मिळण्यास त्यांना फारसा मार्ग नव्हता. परंतु सुदैवानें त्या वेळीं डेक्कन कॉलेजांत उत्तम मराठी लिहिणारास स्कॉलरशिप होती

ती यांना मिळाली, व पुढें दुसऱ्याही स्कॉलरशिपा मिळून त्यांच्या कॉलेज–क्रमास बरीच मदत झाली. या वेळींही पैशाची अडचण त्यांना इतकी होती कीं, पुरते कपडेसुद्धां यांना घालण्यास नव्हते. कित्येक दिवस तर एकच सदरा रोज रात्रीं गुप्तपणें धुवून वाळवून सकाळीं यांना अंगांत घालावा लागे. एफ्. ई. ए. च्या परीक्षेच्या वेळीं परीक्षेची फी देण्यास जवळ पैसे नव्हते, तेव्हां गोपाळरावांनीं एक नाटक लिहून पैसे मिळविण्याची कंबर बांधिली, व त्याप्रमाणें रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत जागून त्यांनीं नाटक लिहिण्याचें काम चालविलें होतें. पुढें त्यांच्या सुदैवानें ही हकीकत कै. केरूनानांस कळल्यामुळें व त्यांनीं यांना फी दिल्यामुळें नाटकाचें काम व रात्रीचें फाजील जाग्रण बंद पडलें. असो. अशा प्रकारें एफ्. इ. ए. ची परीक्षा होऊन ते बी. ए. चा अभ्यास करीत असतां त्यांचें लग्न झालें. आतांपर्यंत गोपाळरावजींना फक्त गरिबी व तिच्या उपाधींचाच जाच होता. पण आतां आणखी एक उपकारी व्याधि यांना छळूं लागली. व तिनेंच शेवटीं त्यांचा बळी घेतला. बी. ए. चा अभ्यास चालला असतां त्यांचा आनुवंशिक दमा उपटला, व दर वर्षीं तो अधिकाधिक जोरानें वाढीस लागला. आजपर्यंत गरिबी भोगलेली; दम्यासारख्या व्याधीनें प्रकृति गांजलेली–निदान घेरलेली; आप्तवर्गाची पुढील सुखाची आशा मुलाच्या हुशारीनें चांगली प्रदीप्त झालेली; अशा स्थितींत गोपाळरावजींनीं लक्ष्मीची संगति धरण्याचा, सरकारी नोकरीची–बेडी कां होईना पण रुपेरी–स्वीकारण्याचा व पैशाच्या व स्वसुखाच्या दृष्टीनें, केलेल्या श्रमाचें–भोगलेल्या संकटांचें, सार्थक्य करण्याचा विचार मनांत आणला असता तर त्यांस कोणीं दोष दिला असता काय? निदान ज्या याता-

यातींत त्यांना आपल्या सर्व आयुष्याची कहाली करून घ्यावी लागली ती यातायात—तो दावाग्नि तरी त्यांच्या पाठचा चुकला नसता काय? पण नाहीं. गोपाळरावजींसारख्या धीरवीर उदार आत्म्याकडून राजसेवेचें हीनवाणें काम होणें नाहीं. तशी कल्पनाही त्यांना असह्य होती. अठराशें—अठ्याहत्तर सालीं गोपाळरावजींची बी. ए. ची परीक्षा होऊन ते फेलो झाले त्यावेळींच त्यांनीं आपल्या प्रत्यक्ष जन्मदात्या आईस पुढील आशयाचें पत्र लिहिलें होतें.

" आपल्या मुलाच्या मोठाल्या परीक्षा होत आहेत. आतां त्याला मोठाल्या पगाराची चाकरी लागेल व आपले पांग फिटतील, असे मोठाले मनोरथ आई तूं करीत असशील, पण मी आतांच तुला सांगून टाकतों कीं—विशेष संपत्तीची, विशेष सुखाची हाव न धरितां मी फक्त पोटापुरत्या पैशावर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार." अशा तऱ्हेचे निर्धाराचे शब्द गोपाळरावजींच्या लेखणींतून कॉलेजांतील क्रम संपतो न संपतो तोंच उतरले होते, व पुढें उत्तरोत्तर तेंच कष्ट-धीरव्रत त्यांनीं आमरणांत उत्तम तऱ्हेनें पाळिलें हें सर्वांस महशूर आहेच. वरील व्रताच्या चिंतनिकेंत व निदिध्यासांत असतां रा. टिळक व ते वरील व्रताच्या सिद्ध्यर्थ बेत करूं लागले. यांचा एम्. ए. चा व त्यांचा एल्.एल्. बी. चा अभ्यास सुरू असतांच शास्त्रीबोवांची गांठ घेऊन तिघांच्या विचारांचा एकत्र खल झाला. सरकारी नोकरी न पत्करितां देशसेवेंत आयुष्य वेंचण्याचा तिघांचा निश्चय होतांच, तो शेवटास नेण्याचा मार्ग ठरला. न्यू इं. स्कुलाचे गर्भवासाचे महिने लोटले. शाळा निघाली. गोपाळरावजींची एम्. ए. ची परीक्षा उतरली

नाहीं. त्यांना एक वर्ष आणखी कॉलेजांत घालवावें लागलें. पण तें वर्ष जातांच अठराशें–ऐशीं सालच्या अखेरीस आगरकर आपल्याच अपत्याच्या संगोपनार्थ आपल्या सहकाऱ्यांस येऊन मिळाले. येथें गोपाळरावजींच्या जीवित–प्रवाहाची दिशा नक्की ठरली, व याच दिशेनें पुढें पंधरा वर्षें हा जंगी प्रवाह खडकांतून, कड्यांतून उड्या टाकीत, आपल्या शरीराचे हाल हाल करून घेत, पण मोठ्या जोमानें व ऐटीनें वहात राहिला. न्यू इंग्लिश स्कुलांत शिरल्यापासून त्यांचा सार्वजनिक खात्यांत जन्म झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. लवकरच केसरी पत्राचें चालकत्व त्यांजकडे आलें. शाळेंत नुसते तीस रुपये घेऊन अति मेहनतीनें शिक्षकाचें बिकट काम करावयाचें; रोज ओर–ओरडून शेर-दीडशेर रक्त आटवावयाचें; व घरीं आल्यावर केसरीसारख्या पत्राचे रकाने आपली जबाबदारी पूर्णपणें ओळखून भरून काढावयाचे; याशिवाय गोपाळरावजींना दुसरा उद्योग राहिला नाहीं. स्वतःच्या पायावर उभें राहून संसाराचा गाडा हांकण्यास सुरुवात याप्रमाणें झाल्यावर जिकडे तिकडे सर्व प्रकार शांतसा भासत होता. लौकिकाकाश स्वच्छ निरभ्र होतें. परिस्थितीचें वारें संथ वाहत होतें, व आतां वादळांच्या कचाट्यांतून आपण सुटलों अशा समजाचा नुकता अंकुर फुटत होता. तोंच केसरीला एक मदोन्मत्त गजराजाच्या मदगंधाचा वास आला. त्याची गर्जना सुरू झाली. तिकडे करवीराच्या बाजूस आकाश काळेंकुट्ट झालें. वादळाची सपाटून तयारी झाली. तोंच इकडे काळमुखी विजेचा कडकडाट होऊन कै० शास्त्रीबोवांची आहुती त्या महामायेनें घेतली. झालें. सर्व आकाश कोसळलें. बाळगोपा-

ळांच धैर्य कसास लागण्याचा अति दुर्धर प्रसंग गुदरला; व या तरुण नरकेसरींस डोंगरीच्या पिंजऱ्यांत पडावें लागलें. स्वभावतः मानी व आचरणतः कर्तव्यदक्ष असल्यामुळें असल्या पिंजऱ्याची आमच्या बाळगोपाळांस मुळींच परवा वाटली नाहीं. मुदत संपतांच कृतसंकल्पार्थ बांधलेलें कंकण दृढतर करून हे दोघे वीर बाहेर पडले. अहाहा! केवळ सत्यपक्षासाठीं भांडून बंदीखान्यांतील 'तरळाचें-रकव्याचें' तिखट आमटीचें व लोणीकाप्या वरुयाचें अलौकिक सुख भोगूनही आपलें असिधाराव्रत केंसभरही न ढळूं देणारे प्रचंड पुरुष पृथ्वीच्या पाठीवर किती सांपडतील? धन्य! धन्य! त्या पुरुषांची! कारागृहवास भोगून आल्यावर पुनः सर्वत्र शांतता झाली. वनराजाची गर्जना व न्यू इंग्लिश स्कूलची भरभराट विशेष जोरानें चालू झाली. सुमारें अठराशें–चवऱ्यायशीं सालीं केसरीचें व त्याच वर्षाचे अखेरीस न्यू इंग्लिश स्कुलाचें स्वरूप विशेष मनोहर झालें. शाळेला नवीन अपत्य झालें. कडेवर नवीन मनोहर बाळक घेऊन उभी राहिलेली आपली कन्या पाहून सहृदय बापाच्या हृदयांत वात्सल्याला व प्रेमौघाला भरपूर भरतें आलें असेल यांत काय शंका? तसाच आपला केसरी बच्चा वाढतां वाढतां सभोंवतालच्या प्रांतांत सदर्प संचार करितांना पाहूनही त्यांना किती समाधान झालें असेल बरें! याप्रमाणें केसरीच्या व शाळेच्या संवर्धनांत रात्रंदिवस खटपट करण्यांत गोपाळरावजी एकदिलानें व निस्पृहतेनें झटत असतां पुनः काहूर आलें. केसरीचा व त्यांचा वियोग झाला! आपण स्वतः वाढविलेल्या, स्वतः लालनपालन केलेल्या, स्वतः सर्व तऱ्हांनीं जोपासलेल्या बाणेदार अर्भकास दुसऱ्याच्या स्वाधीन कर-

ण्याची वेळ ज्या बापांवर आली असेल त्यांनाच त्या वेळच्या गोपाळ-रावजींच्या शोकाकुल स्थितीची कल्पना करितां येईल. ज्याच्या-करितां तुरुंगांत पडून एकशें—एक दिवस डोंगरीची हवा पत्क-रिली त्या प्राणाहून प्रिय लाडक्याला हातचा सोडायाचा म्हणजे त्यांच्या पराकाष्ठेचें जिवावर आलें. पण परिस्थितीच्या असह्य तडा-क्यामुळें त्यांस केसरीस शेवटचा नमस्कार करावा लागला. त्यांच्या सहकारी मंडळींचे व त्यांचे विचार भिन्न, निदान ते लोकांपुढें मांड-ण्याचे व ते अमलांत आणण्याचे मार्ग भिन्न असल्यामुळें अठराशें—अठ्याऐंशीं सालापासून त्यांना आपल्या नांवावरच जगापुढें यावें लागलें. जिकडे तिकडे निंद्य, तिरस्करणीय झालेल्या सुधारणेचे हे कट्टे भक्त. तिचा पक्ष खरा आहे व तिचाच शेवटीं विजय व्हाव-याचा आहे, असें जगास-वेडावलेल्या जगास-स्पष्टपणें सांगावयाचें काम व इच्छा त्यांची. "सर्वतोमुखीं निंद्य होत असलेल्या सुधा-रणेचा व सुधारकांचा पक्ष लोकांस वाटत असल्याप्रमाणें दुर्बळ नाहीं इतकेंच नाहीं तर त्यांचेंच सर्वत्र साम्राज्य होणार असें युक्ति-वादानें सिद्ध करण्यासाठीं आगरकरांची खरी खटपट. ती खटपट सफल व्हावी म्हणून अठराशें—अठ्याऐंशीं सालीं त्यांच्या हातून सुधारकाचा अवतार झाला; व एव्हांपासून त्यांचा खरा प्रांत, त्यांचें खरें काम त्यांना मिळालें म्हणावयाचें. हिंदु धर्माच्या ज्या रोगांना, हिंदु समाजाला खाऊन टाकणाऱ्या ज्या चिकट कृमींना, लोक माया-पाशानें कवटाळीत होते व आहेत ते रोग व कृमी झाडून पार व्हावे याकरितां समाजाच्या प्रत्येक नाडीचें परीक्षण करणें, भ्रमिष्ट झालेल्या, गोंधळून गेलेल्या व म्हणूनच चंदन म्हणून सापाला

पोटाशीं धरणाऱ्या समाजाला प्रसंगीं पलिस्तरें मारणें, तर कधीं मोरावळ्यांत गोड औषध देणें, जाणूनबुजून आड रस्त्यानें जाणाऱ्या जनतेस व तिच्या प्रिय पुढाऱ्यांस वाटेवर आणण्याकरितां कळकळीनें पण जोरानें त्यांवर सणसणीत कोरडे ओढणें, आपल्याला रास्त वाटतात त्या मतांच्या प्रतिपादनार्थ सारें जग उलटलें तरी—प्रत्यक्ष काळ आ पसरून पुढें आला तरी—लेखणी सरसावून उभें ठाकणें, व प्रतिपक्षाच्या धमकावण्यांना न भितां कोण स्वस्थ बसणार; सुधारक अं! टांकांतून अर्थबोधक अक्षरें काढण्याचें सामर्थ्य असेल व तीं वाचण्यास एक इसम तरी तयार असेल तोंपर्यंत तरी हें स्त्रैण कर्म सुधारकास स्पर्श करूं शकणार नाहीं, असा बाणा बाळगणें, हेंच त्यांचें खरें कर्तव्य व तें चोखपणें बजावण्यास या वर्षीं मोठ्या अभिमानानें त्यांनीं सुरवात केली. सुधारक पत्राचा जन्म झाल्यापासून गोपाळरावजींचा उघड उघड छळ होऊं लागला. लोकांनीं आपल्याकडून त्यांचा हवा तेवढा उच्छेद मांडला; "आम्ही तुम्हांस ठार करूं," अशीं पत्रें तर पाठविलीं; शिमग्यांत ते जिवंत असतां भर रस्त्यानें त्यांच्या नांवानें खोटेंच प्रेत तर मिरविलें; असला छळ, असली लोकनिंदा, असला अपमान, असला उच्छेद नित्यशः होत असूनही ज्यांनीं तो धिमेपणानें सहन केला व अप्रिय पण पथ्य विचार लोकांच्या कानांवर आदळणें ज्यांनीं सोडलें नाहीं, असले थोर पुरुष ज्या देशांत निर्माण झाले व होतात तो देश खचित मेलेला नाहीं. आमच्या महाराष्ट्रांत आपल्याच लेखणीच्या प्रखर विद्युच्छक्तीनें जीव—चेतना ओतणारे धन्वंतरी जर आजपर्यंत कोणी झाले

असतील तर ते कै॰ चिपळूणकर शास्त्री व त्यांच्या मागें--हाय! हाय! आतां कैलासवासी प्रि. आगरकर होत यांत संशय नाहीं. असो. यापुढील हकीगत लोकांपुढेंच आहे. अलीकडे चारपांच वर्षांत त्यांचा दमा अधिक झाला, व तो या वर्षीं विशेषच जोरावला, व त्याच्या अनुषंगानें त्यांच्या यकृतासही विकार झाला. गेल्याच्या मागच्या गुरुवारपर्यंत त्यांची प्रकृति फारशी अस्वस्थ नव्हती. त्या दिवशीं त्यांस अनावर जुलाब होऊं लागले व तेव्हांपासून त्यांची प्रकृति बेताल होऊन उदराचाही प्रादुर्भाव झाला. सोमवारीं पहाटेस त्यांना शेवटचा जुलाब झाला, तेव्हां ते स्वतःच्या पायांनीं जाऊन आले. बायका माणसांस "आतां तुम्ही निजा; मला थोडेंसें बरें वाटत आहे व मीही निजतों" म्हणून ते पहाटेस सुमारें तीन वाजतां निजले ते कायमचे निजले! सोमवारीं सकाळीं त्यांना त्रास देणाऱ्या दम्यानें कायमची विश्रांति घेतली! व आम्हां सर्वांस--विशेषतः आपल्या प्रिय पत्नीस व तीन अज्ञान मुलांस दुःखसागरांत लोटून गोपाळरावजींनीं शांतपणें आपला देह ठेवला! रा. गोपाळरावजींस महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनाचें महत्कार्य घडवून आणणाऱ्या ऐतिहासिक पुरुषांत आम्ही श्रेष्ठ स्थान देतों. देशाची उन्नति व उद्धार सर्वांशीं तरुण मंडळीवर अवलंबून असतो. त्या तरुण पिढीच्या मनाला पिळदार वळण लावणारे, तिच्या वाढत्या बुद्धीला जोम व दम देणारे, किंबहुना तिच्यांत जीव घालणारे व तिची कर्तव्य-दिशा तीस दाखवून देणारे आध्यात्मिक नायक तेच देशाचे भाग्यकर्ते, उद्धारकर्ते पुरुष होत. कापसाच्या तंतूंप्रमाणें सैरावैरा हवेंत तरंग-

णाऱ्या नवीन विचारांच्या व्यक्ति अठराशें–अठ्याऐशीं सालपूर्वी तुरळक असतील. परंतु अठराशें–अठ्याऐशीं सालानंतर नवीन मतवाल्यांची जी एक अफाट सेना निघाली; एक सबंध पक्ष, एक नवा तट, निर्माण झाला; व महाराष्ट्राचा एक हात–उजवा हात–चांगला खंबीरपणें वावरूं लागला; तो गोपाळरावजींच्या अनवरत श्रमांमुळें यांत संशय नाहीं, व म्हणूनच आम्ही गोपाळरावजींना महाराष्ट्राच्या उद्धारकर्त्यांत श्रेष्ठ स्थान देऊन त्यांच्या नांवावांचून महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचें एक पृष्ठही लिहितां येणार नाहीं असें म्हणतों. इंग्लंडमध्यें कार्लाइलनें जें कर्तृत्व केलें तेंच गोपाळरावजींचें. मनुष्याच्या सार्वजनिक चरित्रापेक्षां खाजगत आचरणांत त्याचें खरें स्वरूप सांपडतें, असें आजपर्यंत शहाण्या लोकांनीं म्हटलें आहे. त्या दृष्टीनें पहातां, गोपाळरावजींसारखा साध्या, निर्मळ, निष्कपट हृदयाचा, सरळ, दोरीसूत, निष्कलंक आचरणाचा, खऱ्या बालबोध नीतीचा, अभंग धैर्याचा, बाणेदार ब्रीदाचा, व सदय अंतःकरणाचा, जागृत कर्तव्यदक्षतेचा, जिवंत आस्थेचा, खऱ्या व जाज्वल्य देशाभिमानाचा, व नम्र विनयशील सभ्यतेचा, व शेवटीं, मितव्ययी व्यवहाराचा गृहस्थ दुसरा सांपडणें नाहीं. वरील प्रत्येक गुणाचे उदाहरणीय प्रसंग त्यांच्या चरित्रांत हवे तितके आहेत. पण आमच्या दुर्दैवानें ते येथें नमूद करितां येत नाहींत. महाराष्ट्रभाषेची सेवा त्यांचे हातून किती झाली हें महाराष्ट्रास ठाऊक आहे. आपल्या इच्छेप्रमाणें ते भाषा–सुंदरी कशी नटवीत, सजवीत, किती भिन्न सोंगें तिला देऊन तिच्या

सदा–चंचल–स्वरूपानें प्रेक्षकांस कसें मोहून टाकीत; त्यांच्या हातीं मराठी भाषा कधीं सालंकार तर कधीं सहज–सुंदर, कधीं तरुण युवती तर कधीं वृद्ध प्रौढ गृहिणी; कधीं रुष्टबाला तर कधीं हृष्ट-पत्नी–अशीं सदा नवीं रूपें घेऊन रंगभूमीवर नाचत असे. याप्रमाणें ज्यानें आपल्या समाजाकरितां व परहिताकरितां कंकण बांधिलें; लोकहिताप्रीत्यर्थ ज्यानें दुर्धर कारागृहवास भोगण्यासही मागें घेतलें नाहीं; सर्व सुखावर पाणी सोडून, निरपेक्षतेनें होळ-करांनीं देऊं केलेली पांचशें रुपयांची नोकरी आनंदानें नाकारिली; सत्य पक्षाच्या अभिमानाकरितां, लोकनिंदेचें स्थान झालेल्या सुधारणेचा पक्ष चालविला; राजसेवा न करितां नव्या पिढीला चांगली तयार करण्याकरितां, फुप्फुसांचा आजार असतांही थोड्या पगारावर आज पंधरा वर्षे शिक्षकाचें काम केलें; रूढ पण घातक लोकाचारांवर हत्यार धरण्याचें घोर पातक केल्यामुळें ज्याला व ज्याच्या निरपराध पत्नीला विनाकारण छळवाद सोसावा लागला; केवळ उदात्त विचारांचा व खऱ्या मार्गाचा जय व्हावा म्हणून ज्याला, बालपणापासून लालनपालन करणाऱ्या, मांडीवर खेळ-विणाऱ्या निकट आप्तांच्या सहवासासही मुकावें लागलें; केवळ महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनार्थ, आपल्या देशाच्या उत्कर्षार्थ रात्रं-दिवस ज्यानें आपल्या मांसाचे रज न रज झिजविले; ज्यानें असंख्य संकट–शत्रूंशीं टक्कर देऊन आपल्या दमदार, जलाल मात्रांनीं रुग्ण समाजाच्या एका अंगाला तरी ताळ्यावर आणिलें; अशा असामान्य सत्पुरुषाचा छळ व्हावा व त्याची किंमतही आम्हांस कळूं नये काय ?

अथवा त्यांची किंमत कळण्याचे, त्यांचें महत्व समजण्याचे, व त्यांच्या मृत्यूनें झालेली हानि चांगली भासमान होण्याचे दिवस अजून यावयाचे आहेत असेंच म्हणावयाचें. असे दिवस येतील यांत शंका नाहीं. पण ते पाहण्यास गोपाळरावजी मात्र पुनः येणार नाहींत. त्यांनीं लाविलेल्या वृक्षाला व पेरलेल्या बियांना चांगलीं फळें व चांगलें पीक येईल हें खचित. पण तीं फळें चाखण्यास व तें पीक पाहण्यास त्यांना मात्र दुष्ट काळानें येथें ठेविलें नाहीं!

---

# शिवराम महादेव परांजपे.

## कालाची विशालता.

पूर्वीं, पुढें, हल्लीं इत्यादि व्यवहार जे आपण नेहमीं करितों त्या सर्वाला आधारभूत जी कांहीं कल्पना तिलाच आपण काळ असें म्हणतों. काळ हा पदार्थ डोळ्यानें दिसण्यासारखा नाहीं; किंवा स्पर्शानें जाणतां येण्यासारखा नाहीं; तरी पण तो डोळ्यांना दिसत नाहीं किंवा हाताला लागत नाहीं म्हणून त्याचें अस्तित्वच नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण ज्ञानाचीं द्वारें अनेक आहेत. जें प्रत्यक्ष दिसत नाहीं तें कदाचित् अनुमानानें सिद्ध होत असतें. प्रस्तुत विषयाची स्थिति अशीच आहे. काल, आज, उद्यां, पूर्वीं, हल्लीं, पुढें इत्यादि व्यवहार काळ म्हणून कांहीं पदार्थ नसता तर आपणाला करतांच आला नसता. आंब्याचें झाड नसलें तर त्याजवरील फळ खावयाला मिळणें जसें अशक्य, तसेंच काळ हा पदार्थ अस्तित्वांत नसता तर पूर्वींचा काळ, पुढचा काळ असले जे प्रयोग आपण पावलोपावलीं करतों ते करतां आले नसते. पण ज्याअर्थीं ते करतां येतात त्याअर्थीं काळाचें अस्तित्व कबूल करणें भाग आहे. ह्या काळाला आदि आणि अंत हे मुळींच नाहींत. ज्याप्रमाणें सूर्य पूर्वेकडील क्षितिजावर आल्यापासून पश्चिमेकडील क्षितिजाच्या खालीं जाईपर्यंतच काय तो आपल्याला दिसतो, त्याच्या आधींच्या आणि नंतरच्या स्थितीबद्दल आपल्याला कांहींच कळत नाहीं; त्याप्रमाणें काळाचा देखील कांहीं भाग मात्र जाणतां येतो; आणि त्याच्या आधींचा भाग आणि नंतरचा भाग ह्यांविषयीं मनुष्याचें

पूर्ण अज्ञान असतें. पृथ्वीच्या पृष्ठभागावर उभा राहिलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें आपल्या पायांखालील जमिनीच्या पोटांत काय आहे आणि आपल्या डोक्यावरील आकाशाच्या पोकळींत काय आहे हें समजत नाहीं, त्याप्रमाणें काळाच्या आद्य आणि अंत्य स्थितीचा विचार करूं लागलें म्हणजे मनाची चमत्कारिक अवस्था होऊन जाते. होकायंत्र बिघडून जाऊन वादळांत सांपडलेलें गलबत, चोहोंकडून धुक्यानें वेढून गेल्यामुळें वाट चुकलेला वाटसरू, आणि काळाच्या आनंत्याचें मोजमाप काढणारा तत्त्ववेत्ता ह्यांना फार झालें तर आपल्या पुढील चार हात जागा एवढेंच काय तें दिसत असतें. इतिहासाच्या साधनानें काळाच्या उगमाकडे जाण्याविषयीं मनुष्याचे सतत प्रयत्न चालले आहेत. पण त्यांना कितीसें यश आलें आहे ? उपलब्ध साधनांपैकीं अतिशय प्राचीन असे जे वेद त्यांच्या कालमानाविषयींच्या वादाच्या भानगडींत न पडतां स्थूलमानानें वेद सहा हजार वर्षांचे जुने आहेत असें कांहींच्या मताप्रमाणें घटकाभर मानलें तरी काय ? सहा हजार वर्षांपासूनच काळाला सुरवात झाली असें त्यावरून कोणाला म्हणतां येणार आहे ? किंवा आजपासून पुढें सहा हजार वर्षांनीं ग्रहांची स्थिति अमुक अमुक होईल, त्यांचीं अमुक अमुक फलें येतील हें जरी कळलें तरी काय ? त्या मुदतीच्या पुढें काळाची गति खुंटणार असें कोणा ज्योतिषाला सांगतां येणार आहे ! सारांश परमेश्वराप्रमाणेंच काळ हाही आद्यंतरहित आहे; आणि आदि व अंत ह्यांनीं विरहित हा काळ असल्यामुळें परंपरेनें ह्याच्याही अंगांत पुष्कळ शक्तींचा समावेश झालेला आहे. परमेश्वर हें सगळ्याचें मुख्य कारण आहे

आणि काळ उपाधिभूत आहे. काळ हा जसा अनादि आणि अनंत आहे तसाच तो सर्व ठिकाणीं आणि सर्व वेळीं असतो. म्हणून जगांत आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या सर्व काळानें पाहिलेल्या आहेत, व यापुढें ज्या ज्या गोष्टी घडून येणार असतील त्याही सर्व काळाला पहावयाला सांपडतील. अशा प्रकारचें काळाचें भव्य, उदात्त, गंभीर आणि अतर्क्य स्वरूप लक्षांत आणलें म्हणजे कांहीं कांहीं तत्त्ववेत्ते काळ हें निराळें द्रव्य न मानतां त्याचें परमेश्वराशीं तादात्म्य मानितात तें किती यथार्थ आहे हें चांगलें लक्षांत येईल; आणि त्याच तत्त्वाला अनुसरून थोड्याशा लाक्षणिक रीतीनें बोलावयाचें म्हटलें तर, आजपर्यंतच्या सर्व अनंत गोष्टी काळानें केलेल्या आणि पाहिलेल्या आहेत असें म्हणण्याला हरकत नाहीं. मध्य-आफ्रिकेंत आणि राजपुतान्यांत हत्तीच्या अंगाएवढाल्या समुद्राच्या लाटा उसळतांना आणि त्यांवरून हत्तीच्यापेक्षां दसपटीनें 'मोठीं अशीं गलबतें फिरतांना यानें पाहिलीं असलीं पाहिजेत. हिमालय पर्वताच्या जागीं डोळे फिरून जातील इतके खोल खळगे आणि अटलांटिक महासागराच्या जागीं मेघमंडळांत घुसणारीं पर्वतशिखरें कदाचित् यानें पाहिलीं असतील. ईजिप्त देशांतील उंच उंच मनोरे, बांधलेले आणि जमीनदोस्त झालेले यानें पाहिले आहेत. बॅबिलो-नच्या कळसाचें काम चाललें असतां दररोज वाढत वाढत तो अगदीं स्वर्ग–लोकाजवळ जाऊन ठेपलेला यानें पाहिला आहे व त्याच्या पूर्वीचे सारे लोक एक भाषा बोलत होते ती त्यानें ऐकिली आहे. निनेव्ही, केरो, सीरिया, पॅलेस्टाइन इत्यादि शहरांचा आणि देशांचा

उत्कर्ष आणि अपकर्ष दोन्ही यानें पाहिलेले आहेत. रोमचें राज्य उभारलेलें आणि मोडलेलें दोन्ही यानें पाहिलीं आहेत. यानें घोड्यांना आणि पर्वतांना पंख असलेले पाहिले आहेत. यानें समुद्राचें गोडें पाणी प्राशन केलेलें आहे. अर्जुनाच्या एका बाणापासून हजारों बाण उत्पन्न होत आणि रावणाला दहा तोंडें होतीं ह्या गोष्टी याला थोतांड वाटत नाहींत. ह्यानें ऋषींना ऋग्वेदांतील सूक्तें रचीत बसलेले असतांना पाहिलें आहे. यानें विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या भांडणाला काय काय कारणें झालीं तीं लक्षांत ठेविलीं आहेत. यानें आजपर्यंत कैक राजांचीं राज्यें, गर्विष्ठांचा गर्व, धनाढ्यांचें धन, बलाढ्यांचें बल, आणि मस्तवालांची मस्ती हीं लयाला गेलेलीं पाहिलीं आहेत; आणि यापुढें पाहील. एजिस, टार्किनस, नीरो यांनीं गरीबांवर पुष्कळ जुलूम केला, पण अखेरीस याच्यापुढें त्यांचा जुलूम चालेनासा झाला. अलेक्झँडर आणि जूलिअस सीझर यांनीं आपल्या सैन्यानें साऱ्या शत्रूंना जेरीस आणलें, पण जेव्हां याच्याशीं लढाई करण्याचा प्रसंग आला तेव्हां तेच उलटे जेरीस आले. सालोमन आणि मार्कस ऑरेलिअस हे राजे मोठे शहाणे होऊन गेले, पण ह्याच्यापुढें त्यांचें शहाणपण चालेना. गरीब लोक जुलमानें गांजून, भुकेनें व्याकूळ होऊन, उन्हानें करपून, किंवा थंडीनें गारठून गुडघ्यांत डोकें घालून डोळ्यांतून टिपें टाकीत बसत, तेव्हां खऱ्या मित्राप्रमाणें चार युक्तीच्या गोष्टी सांगून हाच त्यांच्या मनाला धीर देत असे. लढाईंत पराभव होऊन जिवंत शत्रूच्या हातीं सांपडलेल्या राजांकडून रोमन बादशाहा रोम शहरांतून आपले विजयरथ ओढवीत असत, त्यावेळीं त्या गुलाम

राजांना किंवा राजकीय गुलामांना शत्रूंचें वैभव आणि आपली विपत्ति सहन करण्याचें सामर्थ्य खऱ्या शूराप्रमाणें हाच त्यांच्या डोळ्यांपुढें येऊन देत असे. ल्युक्रेशिआवर टार्किनसनें जुलूम केला, रावणानें सीतेला चोरून नेलें, आणि दुःशासनानें द्रौपदीला भर सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं ब्रूटसच्या, रामाच्या आणि भीमाच्याही आधीं मोठ्यानें गर्जना करून 'सूड सूड!' हे शब्द हाच ओरडला. दैत्यांनीं रसातळाला पोंचविलेल्या वेदांचा प्रचार यानेंच फिरून सुरू केला, हिरण्यकाशिपूचें पोट यानेंच फाडिलें, बळीचें डोकें यानेंच ठेंचलें, आणि रावणाचे गळेही यानेंच कापिले. जेव्हां जगांत अनाचार अतिशय वाढला तेव्हां लोकानुग्रहासाठीं शुक्राचार्य, नारदमुनि, सॉक्रेतीस, गौतम बुद्ध, जीजस खाईस्ट इत्यादि महात्म्यांना यानेंच लोकांपुढें आणून ठेविलें. असे मोठमोठे उपकार यानें जगावर केले आहेत व पुढेंही याचे हातून होतील. वास्तविक पाहतां उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या तिहींला हाच कारणीभूत आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां ब्रह्मा, विष्णु आणि शिव ह्या तिन्ही देवतांचा हा एकवटलेला अवतार आहे. वास्तविक हा त्रिमूर्तिमय असून कधीं फक्त शिवाची आणि ह्याची एकरूपता आहे असें वर्णन करण्यांत येतें; पण हें भ्रममूलक आहे. दुरदर्शी राजकारणी पुरुषांप्रमाणें यानें पुढें काय काय गोष्टी करावयाच्या तें सुद्धां सर्व ठरवून टाकिलें आहे. कोणते किल्ले निरुपयोगी म्हणून पाडून टाकावयाचे आण कोणते नवान बांधावयाचे, कोणत्या भरभराट संपलेल्या शहरांची जागा रानें लावण्यासाठीं मोकळी करून द्यावयाची आणि कोणत्या

रानांतली जागा साफ करवून नवीन शहरें वसवावयाचीं, कोणत्या राजांना तक्तावरून खालीं ओढायाचें आणि कोणाला नेऊन तेथें बसवायाचें, कोणत्या लोकांच्या गळ्यांत विजयश्रीकडून माळा घालावयाच्या आणि कोणाच्या पायांत गुलामगिरीच्या बिड्या अडकवायाच्या, हें सर्व यानें कायम करून ठेविलें आहे. आणखी हजारों वर्षांनंतरच्याही पृथ्वीच्या पृष्ठभागावरील राष्ट्रांचा नकाशा यानें कुशल चितान्याप्रमाणें सर्व रंगवून तयार केलेला आहे. हिरवा, पिवळा, तांबडा, निळा, पांढरा हे निरनिराळे रंग कोठकोठें कसे भरावयाचे ह्याचा ह्यानें कधींच निकाल लावून टाकलेला आहे!

---

# प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन.

## "सारेंच विलक्षण"

### ( मनोरंजन )

### शंकर.

"तें खरं, शंकरराव! पण वडील माणसं जें करितात तें तरी आपल्या बऱ्यासाठीं करतातना? कांहीं झालें तरी त्यांनीं जगांत पांचपंचवीस पावसाळे तुम्हांआम्हांपेक्षां अधिक घालविले आहेत. संसारांतील अडीअडचणी त्यांना जशा ठाऊक आहेत, तशा तुम्हांआम्हांला कशा असणार? तुमच्या आईबापांनीं जर तुमचं लग्न यंदा करून टाकण्याचं योजिलं असेल तर त्यांत तुमचं अकल्याण खास नाहीं!"

"या असल्या आजीबाईच्या गोष्टी मीं पुष्कळ ऐकिल्या आहेत!" शंकरराव म्हणतात. "वडील माणसं जें करितात तें जरी करतांना आमच्या बऱ्याकरितां म्हणून करतात, तरी त्यापासून आमचं नेहमीं बरंच होतं असं थोडंच आहे! उलट त्यांनीं करावयाला जावं बरं आणि व्हावं जन्माचं मातेरं, असंच पुष्कळदां होतं! मला किती तरी अशीं जोडपीं माहीत आहेत कीं, त्यांत नवऱ्यालाही सुख नाहीं न् बायकोलाही नाहीं!"

"असतील तशीं जोडपीं. पण त्याचा दोष आईबापांकडे काय म्हणून? त्यांनीं पहायचं तें पाहिलं, करायचं तें केलं. याउपर जर त्या जोडप्यांना सुख लाभलं नाहीं तर त्यांनीं काय करावं?"

“ अरे, पण यांनीं आधीं हा नसता कारभार करावाच कशाला ? मुलांनीं आपला जन्म पुढें कसा घालवावा हें आधींच ठरवून टाकण्याचं निसर्गविरहित काम यांनीं करावंच कशाला ? माझंच उदाहरण घ्याना, माधवराव ? माझ्या मनांत सध्यां हजारों विचारांचें काहूर माजलेलं आहे. जिकडे पहावं तिकडे अपरंपार रान माजलं आहे, उकिरडे वाढले आहेत, घाण सांचली आहे, ही सगळी घाण काढणं, या सगळ्या उकिरड्याची वाट लावणं, हें रान तोडून टाकणं आणि सर्व दृष्टिपथ सर्वांगसुंदर बनविणं, हें आम्हां नव्या पिढीच्या तरुणांचें काम आहे, असं माझं मन मला सांगतं. आणि ‘कामाला लाग’ अशी वाणी मला चोहोंकडून ऐकूं येत आहे. ‘अरे, हें हातीं घे,’ ‘अरे इकडे ये,’ ‘आधीं मला हातभार लाव,’ अशा आरोळ्या माझ्या कानीं पडत आहेत. आणि मी इकडे पहा, तिकडे धांव, त्याला हात घाल, असं करीत आहें. आजूबाजूस सगळीकडे करावयाच्या कामाचे पर्वतांचे पर्वत पसरले आहेत. पिकाव, पावडीं घेऊन कामाला लागणारे मजूरच मिळत नाहींत, असं मला दिसतं. आणि वाटतं, छेः, संसारांत—स्वतःच्या खासगी प्रपंचांत—गुरफटून जाऊन या सर्वसंचारी वाणीकडे दुर्लक्ष्य करणें म्हणजे महत्पातक आहे. लग्न केलं, पैसा मिळविला आणि चार पोरांना जन्म दिला, तर त्यांत मीं केलं तें काय ? माजलेल्या ढिगाऱ्यांत भर घातली, इतकंच होईल कीं नाहीं ? छेः माधवराव, या विचारांनीं माझं डोकं भणभणून जातं, आणि करावं काय हेंच सुचत नाहीं ! ”

"याकरितांच वडील माणसांचं ऐकावं! तुमचीं माथीं अशीं फिरणार, भलतींच वेडं तुमच्या डोक्यांत भरणार, आणि तुम्ही वाहवणार, फुकट जाणार, हें स्वप्न त्यांना पडलेलं असतं म्हणूनच ते तुम्हांला आवरण्याचा—वाटेवर आणण्याचा—उपाय योजीत असतात. जनावरं बेफाम झालीं नाहींत तोंवर त्यांना लगाम—दावीं—घातलीं तर उपयोग, नाहीं तर काय?"

"नाहीं तर भलतंच व्हायचं! जनावरांचीं माणसं व्हायाचीं एखादे वेळेस! आम्हांला माणसं होऊं देत नाहींत, 'मुकीं बिचारीं! कुणीहि हांका' अशीं जनावरं आम्हांला हीं वडील माणसं बनवून टाकितात, म्हणूनच तर आम्ही त्यांच्या नांवानं रडतों. सगळं जग झपाट्यानं पुढं धांवत सुटलं आहे, इतर ठिकाणचीं माणसं देवाशीं स्पर्धा करूं पहात आहेत, आपली जनावराची कात टाकून माणसं बनताहेत, इतकंच नाहीं, कोठें कोठें माणुसपणानंही तृप्त न रहातां देवाचं वैभव प्राप्त करून घेताहेत, आणि आम्ही मात्र जनावरं तीं जनावरंच! काय माधवराव, आम्हांला जनावरं बनवून टाकणारीं हीं लगाम—दावीं आमच्या तोंडांत, गळ्यांत अडकाविणाऱ्या वडील माणसांचा कैवार घेऊन तुम्ही माझ्याशीं वाद घेतां, तेव्हां तुम्हांला काय म्हणूं! काय हो, आजपर्यंत आईबाप लहानपणींच मुलांना चतुर्भुज करीत आले त्यामुळंच आम्ही सांदीकोपऱ्यांत कुजत पडलों आहों, आमची आम्हांला पुरी ओळखही होऊं देत नाहींत हो! सिंहाचे छावे आम्ही, पण आम्हांला मेंढरांच्या दावणींत गोवून टाकतात हे आईबाप! आणि ते करतात तें आमच्या बऱ्याकरतांच करितात, असं तुम्ही म्हणतां. म्हणा बाबा! आपण

तर साफ त्याला कबूल होणार नाहीं! हें असलं बरं आमचं न झालेलंच बरं!"

"आतां मात्र तुमचं माथं फिरलं खास! आजपर्यंत ज्यांचीं लग्नं त्यांच्या आईबापांनीं केलीं तीं का सगळीं जनावरं होतीं? अहो, त्यांनीं मोठाले पराक्रम केले, कारस्थानं रचिलीं, काव्यं लिहिलीं, कौशल्याची करामत दाखविली, असं इतिहास सांगतो. अजूनही त्यांच्या कर्तृत्वाची साक्ष पटविणाऱ्या खुणा या देशांत आहेत. हीं सारीं जनावरं म्हणतां?"

"चार पाय नाहींत, शिंगं नाहींत, नि शेंपूट नाहीं, इतकंच! बाकी हीं सारीं जनावरेंच! यांतून ज्यांनीं कांहीं कर्तृत्व दाखविलं तीं चुकून नराच्या पदवीला पोंचलीं, इतकंच! पण मी म्हणतों, आम्ही जर गुरं नव्हे, जनावरं नव्हे, तर मग आम्हांला वेसणी घालायचा, आणि पायबंद बांधायाचा असा जुलूम कां! वडिलांनीं आम्हांला अवश्य तेवढं शिक्षण द्यावं आणि मोकळं व्हावं! आम्हांला वाटलं आम्ही लग्न करूं, नाहीं वाटलं नाहीं करणार! सगळ्यांनींच लग्न करून काय करायचं आहे? पृथ्वी ओस पडणार आहे?"

"पृथ्वी ओस पडेल कीं नाहीं, याचा नाहीं ते विचार करीत! त्यांचं जग अजून इतकं वाढलेलं नाहीं, आणि त्यांची दृष्टिही इतकी फांकली नाहीं! आपल्या हातपुसण्यानं न् पायधुण्यानं सगळं जग उलथंपालथं होणार आहे, इतकं तत्त्वज्ञानही त्यांना अजून झालं नाहीं! तीं आपलीं भोळींभाबडीं माणसं. त्यांना वाटतं,

आपण तशींच आपलीं मुलं. वयोमानाबरोबर आपल्याला जशी प्रपंचाची गोडी लागली तशीच मुलांनाही लागणार, त्याची तरतूद आधीं केलेली बरी. तहान लागल्यावर विहीर खणायाला जागा शोधीत बसण्यापेक्षां आधीं विहीर बांधून ठेवावी, म्हणजे तहान लागतांच पाणी मिळेल. मला वाटतं, हा माणसासारखाच विचार आहे. जनावरांना असा दूरचा विचार करितां येत नाहीं."

"अरे, पण तहान लागल्यावर अमक्याच विहिरीवर जाण्याचा जुलूम कां? आम्हांला लागणाऱ्या गोष्टी आम्हीं मिळवाव्या; त्या आयत्या आमच्यासाठीं तयार ठेविल्यानें त्या मिळविण्यांत मिळणाऱ्या अनुभवाला आम्ही आंचवतों. आणखी, अनायासें मिळालेल्या वस्तूंची आम्हांला कांहीं किंमत वाटत नाहीं. आमचा दोन्हीं-कडून तोटाच होतो. मुलांनीं वडिलांचें ऐकावें हें बरोबर. पण तें कोठपर्यंत ? वडीलही आपल्या हातानें आपली अवज्ञा करून घेणार नाहींत तोंपर्यंतच. मी तरी निदान लग्नाच्या बाबतींत कोणाची भीडमुर्वत ठेवणार नाहीं !"

" बरें आहे शंकरराव, पाहूं आतां. परीक्षेची वेळ ज़वळच येणार आहे!"

शंकरराव आणि माधवराव यांचा हा संवाद एका टेंकडीवर चालला होता. त्यांचें कॉलेज शहरापासून सुमारें दीडदोन मैल अंतरावर होतें. त्यामुळें कॉलेजाच्या आवारांत शहरांतील अशुद्ध हवेचा प्रवेश फारसा होण्याची भीति नसावी, असें सामान्य माणसांना वाटे. आणि कांहीं अंशीं तशी स्थिति होतीही. परंतु शंकररावांच्या

कॉलेजांत शहरांतून जाणारीं मुलें बरींच होतीं. त्यामुळें शहरांतलीं बरींच खेंकटीं त्यांच्याबरोबर कॉलेजांत जात असत, व तेथील निवांत प्रदेशांत थोडीशी खळबळ उत्पन्न करीत. शंकरराव धड शहरांतही रहात नव्हते, धड कॉलेजाच्या आवारांतही रहात नव्हते. घरीं राहून त्यांच्या मनाला अवश्य असणारा मोकळेपणा त्यांना मिळण्यासारखा नव्हता. महादेव भटासारखा कडकडीत वैदिक ब्राह्मण डोक्यावर असल्यावर शंकररावांला काय, किंवा त्यांच्या सारख्या कोणत्याही मुलाला काय अगदीं बांधल्यासारखें व्हावयाचें. शिवाय, अभ्यासाला लागणारा निवांतपणाही महादेव भटाचे घरीं नव्हता. त्यामुळें शंकरराव नेहमीं बाहेरच रहात. आणखीही एक त्यांच्या बाहेर राहण्याला कारण होतें. घरच्या राहणींत त्यांना बऱ्याच गोष्टी नावडत्या होत्या. इंग्रजी शिक्षणाचा परिणाम त्यांचे-वर बराच झाला होता. सामान्य विद्यार्थ्यांप्रमाणें ते आपले धडे नुसते घोकून पाठ करीत नसत, किंवा नुसत्या परीक्षा उतरण्यावरच त्यांची दृष्टि नसे. विचारलेल्या प्रश्नांचीं पुस्तकाप्रमाणें उत्तरें देतां आलीं म्हणजे काम झालें, असें त्यांना वाटत नसे. प्रत्येक गोष्टीचा आगापिच्छा पाहण्याची, आणि हें असें कां? आणि तसें कां नाहीं? याची चौकशी करण्याची त्यांना संवय होती. नुसत्या शब्दांनीं त्यांचें समाधान होत नसे. कोणताही विषय मुखोद्गत कर-ण्यापेक्षां, तो तत्त्वतः समजून घेतल्याशिवाय त्यांना राहवत नसे. घाण्याच्या बैलाप्रमाणें त्यांची तऱ्हा नव्हती. त्यांच्या मनाचे दरवाजे सताड उघडे होते. त्यामुळें नेहमींच्या वागण्यांतल्या गोष्टीसुद्धां अंधपणानें करावयाला ते तयार नसत. ‘ अमुक एक गोष्ट करूं

नको,' म्हटलें, कीं, ती कां करूं नको, हें समजेपर्यंत ते स्वस्थ बसायचे नाहींत. लहानपणीं त्यांची मुंज झाल्यावर रोज संध्या करून पिंपळाला पाणी घातल्यावांचून त्यांना जेवण मिळत नसे. प्रथम प्रथम तर, ते शरीरानें तसेच मनानें जोंवर लहान होते तोंवर ते नेमानें पिंपळाला पाणी घालून येत असत; परंतु पुढें पुढें त्यांचे मनांत असा प्रश्न उभा राही, कीं, हें काय प्रकरण आहे? पिंपळाला पाणी काय म्हणून घालावयाचें? इतर झाडें आणि पिंपळ यांत जातिशः अंतर काय? बाभळीच्या झाडाला कोणी पाणी घालीत नाहीं, मग पिंपळालाच कां? शेवटीं हा प्रश्न त्यांनीं आईला विचारिला. ती काय बिचारी! तिला काय उत्तर देतां येणार! झालें! शंकररावांचें घोडें अडलें. ते पिंपळाला पाणी घालीतनासे झाले! हा एक त्यांच्या उमलत्या स्वभावाचा मासला दिला. असले प्रकार पुढें पुढें फार होऊं लागले. शंकरराव कॉलेजांत जाऊं लागल्यावर त्यांच्या चौकसपणाच्या कचाट्यांतून कांहींच सुटेना. संध्या कां करावी? सोवळें कशाला नेसावें? गळ्यांत जानवें कशाला? असे नानातऱ्हेचे प्रश्न त्यांच्या डोक्यांत येत. आणि ते उपस्थित झाले कीं शंकररावांचें गाडें त्या त्या बाबीपुरतें थांबलेंच. असें त्यांचें होत असल्यामुळें त्यांना घरांत रहाण्यापेक्षां बाहेरच रहाणें बरें वाटे. घरांत हें कांहीं चालावयाचें नाहीं, एखादवेळीं वडिलांच्या तोंडास तोंड देण्याचा प्रसंग यावयाचा. त्यापेक्षां आपलें दूरच असावें हें बरें, असा विचार करून ते बाहेर रहात असत.

याचा परिणाम शंकररावांच्या अंतर्बाह्य विकासास सर्वथा अनुकूल झाला, यांत काय नवल आहे! शहरांतल्या कोंदट हवेंत राह-

णाऱ्या कुडींतलें प्राण कोंडलेलेच असावयाचे, आणि त्यांना कोंडलेलें राहणेंच बरें वाटावयाचें; परंतु बाहेरच्या खुल्या माळावर राहाणारांचा आत्माही तसाच खुला व्हावयाचा. इकडे भिंत—तिकडे भिंत, पुढें भिंत—मागें भिंत, कोणत्याही बाजूनें दृष्टीला—म्हणूनच मनोमय जीवाला—मोकळेपणीं संचार करावयाला जागा नसेल तेथें दृष्टीचा पल्ला वाढत नाहीं, तसाच मनाचा पोंच व वेंध हीं कोतीं राहतात. परंतु जिकडे पहावें तिकडे अफाटच अफाट माळरान, स्वर्गपृथ्वीची भेट होऊन तीं एकमेकांत लीन झालेलीं रमतात—भ्रमतात तेथपर्यंत दृष्टीनें खुशाल संचारावें, तिला आडकाठी नाहीं. अशा ठिकाणीं मनुष्याच्या अंतरात्म्याची वाढ अनिर्बंध व्हावी आणि तो चोहोंबाजूंनीं शरीरांत तसाच शरीराबाहेर वावरूं लागावा, हें स्वाभाविक आहे. खुरट्या माणसांच्या संगतींत उंच माणसेंही, शरीरानें नाहीं तरी मनानें खुरटीं होतात; परंतु येथें सर्वच विशाल. सभोंवारचा दृक्प्रांत विशाल, डोक्यावरचें आकाशमंडल विशाल, त्यांचा अंत पाहण्यास इतस्ततः फिरणारें मन विशाल, आणि त्यांचे योगें उद्भूत होणारे विचारही विशाल ! अशा स्थितींत शंकररावांच्या मनाचे सर्व बंध तुटावे आणि तें सर्वांशीं स्वतंत्र व्हावें, यांत आश्चर्य काय ? सृष्टीची शाळाच अशी आहे. तेथें बाहेरून घालायाच्या बंधाऱ्याचें नांव नाहीं. लगाम—दावीं सृष्टीला ठाऊक नाहींत. तिची स्फूर्ति आणि नियति दोनही एकच असतात. बंध आणि मुक्ति हीं सृष्टीचे ठिकाणीं एकत्र वास करितात. शिस्त आणि स्वतंत्रता यांचा तंटा तिच्या शाळेंत कधींही झाला नाहीं. अशा शाळेंत वाढणारे शंकरराव ! त्यांना शहरांत राहणाऱ्या, आणि शहरच्या चाली-

रीतींनीं व विधिविधानांनीं जखडलेल्या माणसांच्या रहाणीचा आणि करणीचा अचंबा वाटावा, खेद व्हावा, संताप यावा, यांत विशेष काय आहे? त्यांना वाटे, सगळें जग वाट चुकलेलें आहे. जगानें नकळत स्वतःच्या भोंवतीं नसत्या बंधांचें जाळें गुरफटून घेतलें आहे, तें पार तोडलें पाहिजे, आणि जगाला परत निसर्गमार्गावर खेंचून आणिलें पाहिजे. हे त्यांचे विचार त्यांच्या मनांत आपोआप उत्पन्न झाले होते, किंवा त्यांनीं वाचिलेल्या पुस्तकांचा आणि ऐकिलेल्या व्याख्यानांचा त्यांच्या मनावर जो संस्कार झाला होता त्यानें या विचारांस जन्म दिला होता, हें सांगणें कठीण आहे. इतकें खचित, कीं, ते अमुक एका लेखांतून किंवा भाषणांतून आपण घेतले असें त्यांना सांगतां आलें नसतें. किंबहुना हे विचार आपल्या डोक्याशिवाय दुसऱ्या कोठें आहेत किंवा होते, असेंही त्यांना ठाऊक नव्हतें. क्षुल्लक गोष्टीपासून अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीपर्यंत सर्वांकडेच त्यांचें सारखें लक्ष वेधे. क्षुल्लकांचा क्षुल्लकपणा आणि महतांचा महिमा हीं केवळ दिखाऊ आहेत, कीं, त्यांचे मुळाशीं खरोखरच कांहीं तारतम्य आहे, हें धुंडाळून काढण्याचा त्यांना नाद असे. त्यामुळें पुष्कळदां जगाला क्षुद्र वाटणाऱ्या गोष्टीच खरोखरी फार महत्त्वाच्या असतात असें त्यांना आढळून येई. आणि ज्याचें जगाला फार महत्त्व वाटतें, तें पुष्कळदां मुलाम्याचें नाणें असतें असा त्यांना प्रत्यय आलेला होता. तेव्हां ते जगाच्या नेहमींच्या चालीनें व रुळलेल्या वाटेनें चालण्यास तयार नव्हते. त्यांचे वडील व ते या उभयतांमध्यें यात्रमाणें किती तरी अंतर पडलें होतें आणि तें उत्तरोत्तर अधिका-

धिकच वाढत होतें. कॉलेजांत सुद्धां त्यांना 'विक्षिप्त' म्हणणारे पुष्कळ विद्यार्थी होते. त्यांच्या अध्यापकवर्गांतही एकादोघांस शंकरराव म्हणजे एक गूढ कोडें होतें! असो.

माधवरावांच्या शेवटच्या शब्दांचा शंकररावांवर कांहीं निराळाच परिणाम झाला. ते शब्द ऐकण्याचे आधीं ते लग्नाच्याच प्रश्ना-संबंधानें बोलत होते खरे; पण ते सामान्यपणें बोलत होते. स्वतःचें लग्न डोळ्यांपुढें ठेवून त्यासंबंधानें बोलत होते, असें नाहीं. वादाच्या किंवा भाषणाच्या ओघांत सरळ आणि एकमार्गी माणसांच्या तोंडून 'मी नाहीं असें करणार!' किंवा 'आपण नसतें बोवा असें केलें!' असे उद्गार पुष्कळदां निघतात, ते असेच अर्धवट त्रयस्थ वृत्तीनें निघत असतात. 'मी तरी निदान लग्नाचे बाबतींत कोणाची भीडमुर्वत ठेवणार नाहीं!' हे शंकररावांचे उद्गार त्याच मासल्याचे होते. आपल्या लग्नाची वाटाघाट सध्यां सुरू असून ती लवकरच रंगारूपास येणार आहे, आणि आपल्याला लवकरच आपल्या वडिलांची अवज्ञा करावी लागणार आहे, वगैरे गोष्टींची जाणीव ठेवून ते उद्गार त्यांनीं काढिले नव्हते. खरें म्हटलें तर ते त्यांनीं काढिले नाहींतच. बोलण्याच्या आवेशांत आणि विचाराच्या ओघांत ते निघून गेले. शंकररावांसारख्या माणसांची मनःप्रकृतिच कांहीं विलक्षण असते. तिला आत्मनिरपेक्ष होण्यास उशीरच लागत नाहीं. स्वतःचें भान तिचें तेव्हांच हरपतें. स्वदे-हाचा आणि स्वमूर्तीचा तिला तेव्हांच विसर पडतो. आणि स्वेत-रांशीं—बाह्य विषयांशीं व बाह्य विषयांच्या हृदयाशीं तिचें तादात्म्य होतें. अशा वेळीं त्या माणसांच्या तोंडून निघणारे शब्द त्यांचे

असतात किंवा नसतातही. मनुष्याला दोन आत्मे असून एक नेहमीं बाहेर हिंडत असतो, व एक त्याचे शरीरांत असतो, अशी कित्येक रानटी लोकांची समजूत आहे असें म्हणतात. तसें खरो-खर आहे कीं नाहीं कोण जाणे—परंतु तसें असलें तर शंकररावां-सारख्या माणसांच्या प्रकृतींचा विलक्षणपणा उकलितां येतो. आवे-शांत येऊन सामान्यपणें जेव्हां तीं माणसें बोलतात तेव्हां त्यांचेवर त्यांच्या दुसऱ्या म्हणजे बाहेर संचरणाऱ्या आत्म्याचाच पगडा असतो, असें म्हटलें म्हणजे झालें. जीवात्म्यापेक्षां परमात्म्याचेंच त्यांचे ठिकाणीं त्या वेळीं प्राधान्य होतें, असें म्हणावें हवें तर. तें कसेंही असो, एवढें खरें कीं, असलीं माणसें आवेशांत आलीं म्हणजे त्यांचे शब्द त्यांचे स्वतःचे—व्यक्तीचे राहत नाहींत. ते सामान्य समाज—पुरुषाचे असतात. निदान त्यांचें वैय्यक्तिक स्वरूप व संबंध तितके ठळक राहत नाहींत. तसेंच शंकररावांच्या शेवटच्या शब्दांचें होतें. पण माधवरावांच्या अखे-रच्या बोलण्यानें ते दचकल्यासारखे झाले, आणि लग्नाच्या विष-याचें सामान्य स्वरूप जें आतांपर्यंत त्यांच्या दृष्टीपुढें होतें तें लागलीच विशेष झालें. त्याचा धागा स्वतःशींच येऊन भिडलेला त्यांना स्पष्ट दिसला. घरांत एकदां आईनें भीत भीत काढिलेल्या गोष्टीची त्यांना आतां आठवण झाली. आपल्या लग्नाचें बोलणें सध्यां चालू आहे हें त्यांच्या लक्षांत आलें आणि त्याच्या अनुरोधानेंच माधवरावांचें शेवटचें थोडेंसें टोंचून बोलणें होतें हेंही, त्यांना सम-जलें. परीक्षेची वेळ जवळच येणार आहे, या शब्दांतला अर्थ माधवरावांनीं त्यांत जितका घातला होता त्यापेक्षां किती तरी

पटींनीं अधिक शंकररावांना प्रतीत झाला. माधवरावांना शंकररावांच्या आवेशाचा आणि विश्वासाचा फारसा गंध नव्हता. ते त्यांना साधे–फाजिल साधे–थोडेसे वेडपेच समजत! त्यांना वाटे, 'सुधारका' सारखीं वर्तमानपत्रें वाचून आणि बोलक्या सुधारकांचीं फुसकीं व्याख्यानें ऐकून शंकररावांच्या मनांत हे उसने विचार घुसले आहेत. वेळ आली म्हणजे ते एकीकडे राहतील आणि दहा जणांसारखेच शंकरराव 'चतुर्भुज' होतील. कां कीं, शंकर दोन वर्षांचे मागें अगदीं गरीब, सांगितलें काम मुकाट्यानें करणारा, मुलगा होता. या दोन तीन वर्षांतच हळुहळू त्याला स्वतःचे विचार सुचूं लागले होते. माधवरावांचा स्वतःचा स्वभाव दहा जणांसारखा, आली वेळ मारून नेणारा असल्यामुळें त्यांना शंकररावांच्या प्रकृतींत अंतर्बाह्य होणारा फरक तितका उमगला नव्हता. त्यामुळें त्यांनीं 'परीक्षेची वेळ लवकरच येणार आहे,' म्हटलें तें थोडेंसें खोंचून, तर थोडेंसें, हें यांचें बोलणें लवकरच फोल होणार आहे अशा खात्रीनें, आणि त्यापासून होणाऱ्या आगाऊ आनंदानें, म्हटलें होतें. माधवरावांचें स्वतःचें लग्न नुकतेंच झालें होतें. त्यामुळें त्यांना शंकररावांचेंही लग्न तसेंच व्हावें असें मनाच्या एखाद्या कोपऱ्यांत वाटत होतें कीं काय नकळे. परंतु त्यांनीं जें केवळ विनोदाच्या खोंचीनें म्हटलें तें शंकररावांना खरोखरच अंजनासारखें भिनलें. आपल्या लग्नाची जुळवाजुळव झाली आणि आपल्याला वडिलांनीं लग्नाला खेंचलें तर मग कसें, हा प्रश्न त्यांचा सगळा अंतर्याम आतां व्यापून राहिला. आपलें कशाचें कांहींच ठरलें नाहीं! आपण जन्माला आल्यासारखें करणार काय, याचा

अजून विचारही केला नाहीं! संसार आहे काय, वाहतो कसा, याची पुसटही कल्पना अजून आपल्याला नाहीं; पुस्तकांतील चित्रांशिवाय, काव्य–कादंबऱ्यांतील पात्रांशिवाय आणि आपल्याच बरोबरीच्या मित्रांशिवाय दुसऱ्या जगाची आपली अजून फारशी ओळख नाहीं. जगांतील पसाऱ्याचे अनंत प्रकार आणि असंख्य पदर यांचा गुंताडा अजून आपल्याला पुरता दिसला नाहीं. या सगळ्या व्यापांत आपलें काम काय, आपल्या हातून होणार काय, हें कोणीं सांगावें? अशी स्थिति असतांच आपल्याला विवाहाचें बंधन बसणार काय? पंख पुरते वाढण्यापूर्वींच ते छाटून टाकावे तशी आपली अवस्था होणार काय? या विचारानें त्यांचें मन आतां घेरून टाकिलें.

या वेळीं ते जेथें बसले होते ती जागा एका टेंकडीच्या सगळ्यांत उंच पठारावर होती. तेथून ती टेंकडी आग्नेयीस उतरत उतरत गेली होती. तशीच पश्चिमेसही उतरण होती; परंतु पश्चिमेच्या बाजूस एक लांबच लांब दुसरी डोंगरांची ओळ होती. तिचा माथा आणि या टेंकडीचा माथा जवळ जवळ सारखाच उंच होता. ती डोंगरांची ओळ आणि आपली टेंकडी यांना जोडणारा मध्यें एक लांबट उंचवटा होता. पिछाडीचे डोंगर आपले हात पसरून उभे होते. शंकरराव व माधवराव बसले होते तेथून पश्चिम बाजूची डोंगरांची ओळ सर्व दिसत होती, आणि दक्षिणेस व उत्तरेस दूर अंतरावर असणारे पर्वत दूरच्या काळ्या किंवा सांवळ्या ढगाप्रमाणें दिसत होते. मधला खोल भाग बहुतेक हिरवळीनें, झाडांझुडपांनीं, आच्छादिलेला होता. पूर्वेच्या बाजूस सर्व प्रदेश सपाट होता.

तरीही तो इतका लांब पसरला होता, कीं, त्यांतील झाडांझुडपांत माणसाच्या वस्तीच्या सर्व खुणा गडप झाल्यासारख्या दिसत होत्या. मधून मधून एखादें देवळाचें शिखर चकाके, किंवा उंच वाड्यांच्या खिडक्यांचीं तांबडीं तावदानें तेवत तेवढ्यांवरून या झाडींत गांव असून तेथें मनुष्यांची वस्ती असावी, असें वाटे. शंकरराव व माधवराव गांवाकडे—पूर्वेकडे पाठ करून बसले होते. जणों काय, मानवी जगाचा त्यांना इतक्यांतच कंटाळा आला होता! निदान सगळा दिवस—दिवसाचा बराच भाग त्यांनीं माणसांच्या संगतींत घालविला असल्यामुळें झाडांच्या हिरव्या पांघरुणांत दडून गेलेला गांव आतां संध्याकाळचे वेळीं मनोहर दिसत असला तरीही तिकडे पहावेंसें त्यांना वाटत नव्हतें. त्यांना त्यापेक्षां मानवेतर सृष्टीची संगत आतां बरी वाटत होती. कावळ्यांच्या शाळा सुटल्यामुळें त्यांचे थवेच्या थवे आकाशांतून चाललेले दिसत होते. त्यांचा कावकाव शब्द, जगाला कावून गेलेल्या हतभागी लोकांच्या हृदयांच्या प्रतिध्वनींसारखा ऐकूं येत होता. परंतु शंकररावांचें लक्ष या वेळीं तिकडे नव्हतें. स्वतःच्या मारून मुटकून होऊं घातलेल्या लग्नाच्या विचारानें ओढून घेतलेलें त्यांचें मन माधवरावांकडून केव्हांच परतलें होतें, आणि पूर्वेकडे ओढ घेणाऱ्या आपल्या किरणांस परत ओढणाऱ्या दिनमणीकडे, त्यांच्या डोळ्याबरोबर, धांवत चाललें होतें. यावेळीं पश्चिमेचा देखावा पाहण्यासारखा होता. आग्नेयीकडे व नैर्ऋत्येकडे धवधवीत रुप्याचा मुलामा दिल्याप्रमाणें दिसत होतें; परंतु पश्चिम क्षितिजाचा मध्यभाग—सुमारें आठ अंशांचा पट्टा—अत्यंत तेजस्वी सुवर्ण—रसांत पोहत होता. त्याचे वरचे अंगास कांहीं पातळ,

कांहीं जाड ढगांचे थर होते. त्या ढगांचे मागचे बाजूस सूर्याचे तप्त किरण पसरलेले असल्यामुळें त्यांना अपूर्व शोभा आली होती. काळ्या, पिवळ्या, गुलाबी, क्वचित् निळ्या शालूमधून—अत्यंत तलम पोताच्या शालूंतून सुवर्ण शरीराचा गौर वर्ण जसा दिसतो, तसा हा पश्चिमेचा भाग दिसत होता. एरवीं अगदीं बेरंग दिसणाऱ्या ढगांस या वेळीं निरनिराळे रंग चढले होते, आणि या सगळ्या ढगांचे वर आणि खालीं कांहीं भाग अत्यंत देदीप्यमान झाला होता. तेथील प्रांत पिवळेपणांत सोन्याला, आणि लालपणांत अळत्यालाही मागें टाकीत होता. अग्नीची दीप्ति, चंद्राची सुधा, सुवर्णाचें तेज, आणि रुप्याचा धवलपणा, हीं सर्व एकत्र ओतून ही नवीनच प्रभा निर्माण केली होती कीं काय, कोण जाणे! कारण, हीं सर्व तेथें एकवटलेलीं होतीं. इतकेंच नव्हे, पण यांतही नसणारें असें कांहीं तेथें होतें. तें कांहीं भाग्यशाली दृष्टींनाच दिसे. तें शंकररावांना दिसलें आणि त्याबरोबर त्यांच्याही चेहऱ्यावर तसेंच तेज चमकूं लागलें. त्यांचे डोळे आणि अस्ताचलावर टेकलेला मित्र यांचा एकजीव झाला आणि क्षणभर तेही त्या मित्राबरोबर अंतराळीं फुलत—खुलत आहेत अशी त्यांची मुद्रा झाली. माधवराव, ती टेंकडी, तो गांव, तें त्यांचें कॉलेज, हीं कोठें आहेत? शंकररावांच्या या वेळच्या स्थितींत तीं असून नाहींतच! गेला—मित्र पश्चिमेच्या डोंगराच्या मागें गेला. त्याचें बिंब दिसेनासें झालें. त्याची प्रभावळ मात्र अजून वरतीं आकाशांत पसरली आहे! तो पहा, त्या तेजःपुंज प्रभेच्या पट्ट्यांत, अगदीं डोंगराच्या धारेशीं एक लहानसा ठिपका दिसत आहे. तो स्थिर नाहीं, खालीं वर खालीं वर

हेलकावे खात आहे. दिव्याच्या ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें तो सारखा तेथेंच धडपडत आहे. सूर्याशीं—दिव्यलोकाशीं मैत्री ठेवणारा व मित्रप्रेमास्तव अगदीं सांज होईपर्यंत पश्चिम क्षितिजावरच गुंगत राहणारा तो कोण असावा बरें? तो एखादा सूर्यभक्त असेल काय? तो मनुष्याचा आत्मा असेल काय? कीं एखादा पक्षी आहे? कांहीं असो. तो आपल्या ओळखीचा नसला तरी शंकररावांच्या ओळखीचा आहे खास! कां कीं, ते त्याचेकडेच टक लावून तो दिसेनासा होईपर्यंत पहात आहेत. आपल्याला त्याचा मधुर शब्द ऐकूं येत नाहीं, तरी तो शंकररावांना येत असावा! कां कीं, ते पहा—ते आपल्याशीं गुंगत आहेतसे दिसतात. त्यांचा हात त्यांच्या गुंगण्याच्या तालानें हालत—आंदोलत आहे. 'जिकडे दिनमणि मी तिकडे! आज कालच्या सरें पुढें' हे शब्द त्यांच्या तोंडून गाण्याच्या सुरांत आणि तालांत बाहेर पडत आहेत. तेच क्षितिजावरील त्यांच्या सहृदयाचें गाणें असेल काय? कोणास ठाऊक! क्षितिजावरील तो ठिपका आतां दिसेनासा झाला म्हणून असो, किंवा जिकडे तिकडे आपलें झापड घालणारा अंधार हळुहळू खालून वरतीं डोकावूं लागला म्हणून असो, शंकररावांचें लक्ष परत माधवरावांकडे वळलें आणि त्यांचे शेवटचे शब्द पुनः त्यांना आठवले. "होय! परीक्षेची वेळ येणार आहे असें दिसतें खरें! पण, माधवराव! परीक्षेची वेळ नवीन काय यावयाची आहे. आपण रोज खरोखर परीक्षाच देत नसतों काय? आपल्या नेहमींच्या आयुष्यक्रमांत ज्या ज्या गोष्टी आपण करितों किंवा आपले हातून होतात, त्या सर्व आपल्या परीक्षाच नव्हेत काय? बऱ्यावाईटांची, खऱ्याखोट्यांची, सरळवांक-

ड्याची निवड करण्याचे आणि त्यांपैकीं एकाचा आश्रय करण्याचे प्रसंग आपल्या रोजच्या व्यवहारांत काय थोडे असतात? त्या प्रसंगांतून आपण ज्याप्रमाणें या बाजूस किंवा त्या बाजूस बाहेर पडतों, तसेंच येथें व्हावयाचें आहे. यांत आणि त्यांत फरक काय ?" शंकरराव अर्धवट विचारमग्नतेनें म्हणाले.

"रोजच्या व्यवहारांत कसल्या आल्या आहेत परीक्षा? रोजच्या व्यवहाराचें गाडें रुळलेल्या मार्गानें चालूच असतें. तेथें कोण इतका विचार करीत बसतो? असा प्रत्येक लहानसान बाबी-चाही कीस काढीत बसलें तर व्यवहार चालायचाच नाहीं. सगळेंच गाडें थांबेल. परीक्षा असते ती कधींमधीं येणाऱ्या विशेष महत्त्वाच्या प्रसंगींच असते." माधवरावांनीं उत्तर दिलें.

"असेल, तसेंही असेल कदाचित्! परीक्षेची वेळ कधींमधीं येवो, नाहीं तर रोज येवो, आपण आपलें परीक्षेला तयार असावें म्हणजे झालें. गणितांतल्या सांखळीप्रमाणें आपलें वागणें कांहीं ठरीव नियमांनीं किंवा तत्त्वांनीं बांधिलेलें असलें म्हणजे परीक्षांचें कांहीं मोठेंसें भय नाहीं. कदाचित् जितक्या परीक्षा जास्ती तितकी तयारी सरस—"

**'जिकडे दिनमणि मी तिकडे ! आज कालच्या सरें पुढें.'**

हे शब्द पुनः शंकररावांच्या तोंडीं आले. आणि टेंकडी उत-रून ते परत आपल्या बिऱ्हाडाकडे जात असतां—व गेल्यावरही-तेच शब्द त्यांचें मनांत घोळत होते.

**'जिकडे दिनमणि मी तिकडे ! आज कालच्या सरें पुढें.'**

---

## १. सांपळ्यांत सांपडलेला सिंह.

## डोळे कसे उघडले ?

**कै० ह० ना० आपटेः**—कै० हरीभाऊ आपटे यांचें नांव प्रत्येक मराठी भाषाभिज्ञास परिचित आहे. विश्वविद्यालयाच्या परिक्षेस लागणाऱ्या तुटपुंज्या अभ्यासाचा त्यांना तिटकारा असून, भाषेच्या अभ्यासांत स्वेच्छ गढून जाऊन ती आपलीशी करून घेण्याची त्यांना दांडगी उत्कंठा होती, व त्याप्रमाणें विश्वविद्यालयाच्या परीक्षेचा नाद सोडल्यापासून त्यांनीं मराठी भाषेचा अभ्यास कळकळीनें केला होता. मुकुंदराजापासून तो अगदीं आधुनिक केशवसुतांपर्यंत सर्व ग्रंथकारांच्या ग्रंथांचें व सर्व कवींच्या काव्यांचें त्यांनीं इतक्या मनःपूर्वक परिशीलन केलें होतें कीं मराठी भाषा त्यांच्या अगदीं हस्तगत होऊन तिच्याकडून वाटेल त्या लीला त्यांना करवून घेतां आल्या. कादंबरी लेखनांत तर त्यांचा इतका हातखंडा होता कीं ते वर्णन करीत असलेल्या गोष्टी प्रत्यक्ष घडत असल्याचा भास वाचकांस झाल्यावांचून राहात नाहीं. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत "पण लक्ष्यांत कोण घेतो" व ऐतिहासिक कादंबऱ्यांत " उषःकाल " ह्या फार लोकप्रिय आहेत. ज्यांना मराठी भाषा अगदीं साध्या परंतु शुद्ध स्वरूपांत पाहावयाची असेल त्यांनीं कै० हरीभाऊंच्याच ग्रंथांकडे वळलें पाहिजे.

"**केवळ स्वराज्यासाठीं** ":-थोरले छत्रपतींच्या पश्चात् त्यांच्या एकनिष्ठ सेवकांनीं मराठी राज्याच्या सेवेसाठीं हातावर शीर कसें धरलें, संभाजी मोंगलांच्या कैदेंत गेल्यामुळें वठत चाललेल्या स्वराज्याचे रोपट्यास पुनः तजेला आणण्यासाठीं त्यांनीं कसे भगीरथ प्रयत्न केले, व संभाजीला आपल्या पूर्ववर्तनाबद्दल मागून कसा पश्चात्ताप झाला ह्याचें हुबेहुब शब्दचित्र ह्या कादंबरींत रेखाटलें आहे.

**सांपळ्यांत सांपडलेला सिंहः**—मोंगलांच्या तुरुंगांत गेल्यानंतर संभाजीच्या झालेल्या मनःस्थितीचें हें यथार्थ वर्णन आहे. संभाजी शौर्यांत व कर्तबगारींत बापसे सवाई होता, परंतु तुरुंगांत सांपडल्यामुळें तो सांपळ्यांत सांपडलेल्या सिंहाप्रमाणें झाला आहे. थोरल्या छत्रपतींच्या विश्वासू

सरदारांना काढून टाकल्याबद्दल, आईला भिंतींत चिणून मारल्याबद्दल त्याला पुरापुरा पश्चात्ताप होत आहे. ह्याच वेळच्या संभाजीच्या मनःस्थितीचें चित्र कै० गडकऱ्यांनीं आपल्या राजसंन्यास नाटकाच्या पांचव्या अंकांत दिलें आहे. त्याचा शिक्षकांनीं विद्यार्थ्यांस परिचय करून द्यावा.

**डोळे कसे उघडले:**—संभाजी कलुषा कबजीच्या नादीं लागून अगदीं त्याच्या तंत्रानें चालत असे, व सर्व गोष्टींत कलुषा सांगेल तेंच आपल्या हिताचें असें त्यास वाटत असे. कबजी लबाड आहे, तो मोंगलांचा हेर आहे वगैरे गोष्टी जरी त्याचे हितचिंतक त्यास सांगत असत, तरी तो त्यांच्याकडे अगदीं कानाडोळा करीत असे. परंतु तुरुंगांत जेव्हां कबजीची व त्याची भेट झाली, व धर्मांतर करावयास पडलें तरी हरकत नाहीं पण आपले प्राण वांचवावे असा उपदेश जेव्हां तो त्याला देऊं लागला, तेव्हां तो हलका उपदेश संभाजीच्या मानी मनाला फार झोंबला, त्याचे डोळे उघडले, व कबजीचें खरें स्वरूप त्याला स्वच्छ दिसूं लागलें.

पा० ५ भुरळ—मोह, मोहिनी.

पा० १० शिखानष्ट—शेंडी नसलेला. निंदार्थी, मुसलमान.

---

# २. हिंदुधर्म आणि सुधारणा.

**कै० प्रि० गोळे:**-कै० प्रि० गोळे हें एक झांकलेलें माणिक होतें. त्यांनीं राजकीय किंवा सामाजिक उलाढालींत कांहींच भाग घेतला नाहीं. परंतु सर्व परिस्थितीचें त्यांनीं आस्थापूर्वक निरीक्षण केलें होतें अशी खात्री त्यांचें "हिंदु-धर्म आणि सुधारणा" हें एकच पुस्तक वाचून होते. त्यांनीं आपलें आयुष्य विद्यादानांत वेंचलें, व विद्यार्थ्यांकरितां संस्कृतचीं चार पुस्तकेंही लिहिलेलीं आहेत. त्यांचीं अगदीं प्रसिद्ध व महत्त्वाचीं चार पुस्तकें म्हटलीं म्हणजे "हिंदु-धर्म आणि सुधारणा" व "ब्राह्मण व त्यांची विद्या" हीं होत.

**हिंदुधर्म आणि सुधारणा:**-ह्या पुस्तकांत प्रि० गोळे यांनीं हिंदुधर्माचें खरें स्वरूप प्रकट करून त्यांतील प्रत्येक चालरीत व्यक्तीच्या व समाजाच्या कशी हिताची होती, हल्लींच्या सुधारणांनीं बाह्यात्कारीं जरी उन्नति होतीसें दिसलें

त्तरी त्यामुळें समाजाची कशी कायमची अवनति होत आहे, व शेवटीं हिंदु-धर्मांत सुधारणेची कालाकालव नको आहे व पूर्वीच्या आचारविचारांतच समाजाचें शाश्वत कल्याण व स्थैय आहे, ( हें सोदाहरण सिद्ध करून दाखविलें आहे. ) हें दाखविण्याचा यत्न केला आहे.

**शहरवासी होण्याचे ऱ्हासकारक परिणामः---**

( अ ) युरोपीय समाजांतील घडामोड—बुद्धिपरिश्रम न करणारे व दारिद्र्यांत अंगमेहनतीनें दिवस कंठणारे जे खेड्यापाड्यांतील लोक ते समाजाचा अचल पाया होत. बुद्धि व आरोग्य ह्यांचा खेड्यांतील संचय शहरांत जाऊन कामास लागतो. ह्यांतच त्या समाजाचें स्थैर्य व प्रगति आहे.

( आ ) हिंदु समाज व युरोपीय समाज यांतील भेद-त्या समाजांतील सर्व लोक एकजातीय आहेत, त्यामुळें बुद्धिवैभव एकाच जातीचें खर्च होत नाहीं. परंतु हिंदु समाजांत एकदम बुद्धिपरिश्रमांची आवश्यकता जेव्हां उत्पन्न झाली, तेव्हां तो सर्व भार वरिष्ठ जातीच्या लोकांवर पडला.

( इ ) आपल्या समाजांत रूढ झालेला सिद्धांत---उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ठ नोकरी.

१. पूर्वी उदयास आलेला पुरुष इनाम, जहागीर वगैरे घेऊन खेड्यांत राहण्यास जात असे; यामुळें पुढील पिढीसाठीं पुनः बुद्धि व आरोग्य ह्यांचा संचय होत असे. गेल्या तीस चाळीस वर्षांत उदयास आलेल्या पुरुषांत खेड्यांतूनच आलेले फार.

२. नवीन विद्वानांनीं वडिलांची वृत्ति सोडली. त्यांस खेड्यांत जाणें रुचेनासें झालें व घातक सुधारणांस प्रारंभ झालाः--

( १ ) पहिली घातक सुधारणा खेडीं सोडून शहरांत स्थायिक होण्याची.

( २ ) द्रव्योपार्जनाकरितां पिढीमागें पिढी विद्येच्या चरकांत घालून तिची. अमर्याद व अकालिक वाढ करूं पाहण्याची.

( ३ ) पुष्कळ मालमत्ता जंगम स्थितींत राखण्याची.

( ४ ) धर्मास मोठा धक्का देऊन दुर्बळ करून नास्तिकपणा उत्पन्न करण्याची.

३ शहरांत आरोग्याची हेळसांड–कारणें:–

( १ ) कोंडल्या जागेंत राहणें.

( २ ) शरीर अधिक आच्छादित.

( ३ ) खाण्यापिण्यांत अपरिमितपणा.

( ४ ) रोगांचें प्राबल्य.

( ५ ) चैनीचे पदार्थ.

ह्याप्रमाणें बुद्धीचे अतिरिक्त परिश्रम व शहरची वस्ती ह्या दोन्ही कारणांनीं वरिष्ठ जाती विनाशपंथास लागल्या आहेत.

## सुधारणा सुचविण्यांत केवढी सावधगिरी राखणें जरूर असतें:–

१. आपली सुधारणा युरोपीयांस पसंत पडते, पण ते आमचीं दुःखें सानुकंपपणें पाहणारे नाहींत.

२. सरासरी स्थितीच्या एका कल्पित व्यक्तीस सुविचारानें जें वर्तन उचित होईल, तें प्रत्यक्ष व्यक्तींपैकीं एकीसही उचित होणार नाहीं. उदा० पुनर्विवाह.

३. धर्मवेड अशी संज्ञा दिलेल्या जेवढ्या चाली आहेत, त्या प्रत्येकीकडून कांहीं विशिष्ट कार्यें होत आहेत. हिंदुत्वाचा अभिमान कायम राहण्यास सर्वच धार्मिक संस्था, चांगल्या व वाईट, कारण होतात.

४. केवळ धर्मवेड नाहींसें करून समाज सुखी होत नाहीं. सर्व गोष्टींचा विचार करून मनोवृत्तींस दुसरा अधिक योग्य आधार देऊन मग धर्मवेडास धक्का लाविला पाहिजे. या मार्गानें सुधारणा सावकाशच होणार. उतावळे सुधारक समाजाचे शत्रु होत.

५. पूर्वींच्या धर्मक्रांतिकारांची धर्मश्रद्धा प्रज्वलित होती व त्यांनीं सुधारणा फार धिमेपणानें केली. त्यांनीं एक धर्मवेड काढून दुसरें स्थापिलें, किंवा मूळचें धर्मवेड कमी केलें.

**पा० २६ ब्रह्मदेवाचे भक्त इ०**–सृष्टींत उत्पत्ति, स्थिति व लय अशा तीन अवस्था आहेत. ब्रह्मदेव उत्पादक, विष्णु पोषक व शिव लयकारक असा समज आहे. त्याचप्रमाणें युरोपीय समाजांत बुद्धि व आरोग्य ह्यांचे उत्पादक

कनिष्ठ वर्गाचे लोक, पोषक मध्यम वर्गाचे लोक, व त्यांचा उपयोग करून स्वतः विलयास जाणारे उच्च वर्गाचे लोक.

पा० ३१ हरळीची मुळी-हरळी हें दुर्वासारख्याच एका जातीच्या गवताचें नांव आहे. त्याची मुळी नेहमीं सजीव असते. त्यावरून एखाद्या कायम टिकणाऱ्या उत्पन्नास ‘ हरळीची मुळी ’ म्हणतात.

पा० ३२ विनाशकाले विपरीतबुद्धिः—नाशाचा काल आला म्हणजे चांगल्या विचारी मनुष्याचा सुद्धां वाईट गोष्टीकडे कल होतो, व तीच त्याला गोड वाटूं लागते.

पा० ३३ ग्रामीण—खेड्यांत राहणारा. ग्रामीणांचें पौरीभवन-खेड्यांतील लोकांची खेडीं सोडून शहरांत स्थायिक होण्याची क्रिया.

पा० ४० दारान् अपत्याय-विवाह संस्था शारीरिक सुखासाठीं नसून वंशपरंपरा व समाजस्थैर्य हीं राखण्यासाठीं आहे.

---

# ३. हिमालय वर्णन.

**कै० प्रि० आगरकर**-मूर्तिमंत दारिद्र्यांत जन्मास येऊन ज्यांनीं राष्ट्रकार्यासाठीं आमरण दारिद्र्याचें व्रत स्वीकारलें अशा पुरुषांमध्यें कै० प्रो० आगरकरांचा फार वर नंबर लागतो. डेक्कन एज्युकेशन सोसायटी, केसरी ह्या संस्थांच्या उत्पादनांत त्यांचा बराच हातभार असून स्वतंत्र असें सुधारक पत्र ते चालवीत असत. त्यांच्या लेखांत दिसून येणारीं ओज व तेजस्वित्ता हीं अपूर्व होत. परंतु आगरकरांचें ज्याच्याशीं अगदीं तादात्म्य झालें होतें असा विषय म्हणजे सुधारणा होय. समाजाच्या हाडींमासीं खिळलेल्या वेडगळ चालीरीति घालवून देण्यासाठीं त्यांनीं आटोकाट प्रयत्न केले, हृदयाला जाऊन भिनणारे लेख लिहिले, प्रसंगविशेषीं अपमानहो सोसल, परंतु आपलें व्रत सोडलें नाहीं. समाजाला कै० आगरकरांसारखे कळकळीचे सुधारक लाभल्यावांचून नुसत्या वल्गनांनीं सुधारणा होणार नाहीं.

१. हिंदुस्तानच्या नकाशांत सर्वां आधीं डोळ्यांत भरणारी हिमालय पर्वताची आकृति. त्याच्या भव्य उंचीमुळें व अफाट रुंदीमुळें १५०० मैल लांबीचा तो एक दुर्गम तटच हिंदुस्तानच्या संरक्षणार्थ आहे.

२. हिमालयावर नेहमीं बर्फ कोठून येतें? बंगालच्या उपसागराच्या पाण्याची सूर्याच्या उष्णतेनें वाफ होते. वाऱ्यानें त्या बाष्पराशींचे सजल जलद होतात. व कडक थंडीमुळें ह्या ढगांची जलावस्था नाहींशी होऊन त्यांस पाषाणघनता येते, व ते बर्फाचा थर करून राहतात.

३. हिमालयावर जितका पाऊस पडतो तितका पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं पडत नाहीं. ह्या पर्वतावर प्रतिवर्षीं सरासरी ५२३ इंच पाऊस पडत असावा.

पा० ४७ अस्त्युत्तरस्यां०—उत्तर दिशेला हिमालय नांवाचा पर्वत आहे. त्यावर देवतांचें वास्तव्य असतें; व पूर्वपश्चिम समुद्रांस मिळाल्यामुळें पृथ्वी मापण्याचा तो जणुं काय एक दांडाच आहे असें वाटतें!

---

# ४. मराठेशाही कशानें बुडाली?

**रा० रा० न० चिं० केळकर:**—केसरीची आठवण झाली कीं रा० केळकर यांची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं, आणि ज्याच्या डोळ्यांसमोर 'केसरी' दिसत नाहीं असा कोण महाराष्ट्रीय आहे? रा० केळकर केसरी व मराठा या पत्रांचे संपादक असून त्यांनीं कांहीं नाटकेंही लिहिलेलीं आहेत. हल्लींच्या मराठी लेखकांत ते निःसंशय उच्च वर्गांत मोडतात. त्यांच्या लेखांची मुख्य खुबी ही कीं त्यांतील विचारांची मांडणी अगदीं मुद्देसूद असते, व त्यामुळें वाचकांच्या मनावर त्यांचा इष्ट परिणाम होतोच.

**"मराठे व इंग्रज"**:—हें पुस्तक रा० केळकर यांनीं १९१८ सालीं लिहिलें. मराठी राज्याचा बींमोड १८१८ सालीं झाला व १९१८ सालीं त्याला बरोबर शंभर वर्षें झालीं. व्यक्तीच्या मरणानंतर तिचें श्राद्ध करितात, तसें मराठी साम्राज्याचें शतसांवत्सरिक वाङ्मयश्राद्ध करण्याच्या हेतूनें हें पुस्तक लिहिलें आहे. ह्यांत मराठे व इंग्रज ह्यांचा पहिला संबंध कसा होता, पुढें तो कसकसा वाढत गेला, व शेवटीं त्याचें पर्यवसान मराठी साम्राज्याच्या नाशांत कसें झालें ह्याचें

यथार्थ व मुद्देसूद विवेचन केलें आहे. पक्षपात बुद्धीनें केवळ इंग्रजांस नांवें न ठेवतां, आपल्या लोकांच्या घोड्याएवढ्या चुका त्यांनीं दाखवून दिल्या आहेत.

१. ब्राह्मणांची जबाबदारीः—मराठी राज्य टिकविण्याची जबाबदारी एकट्या पेशव्यांवरच होती असें म्हणतां येत नाहीं; पेशव्यांइतकीच सातारकर महाराजांवर व मराठे सरदारांवरही ती होती.

२. मराठ्यांची जबाबदारीः—शिंदे, होळकर, गायकवाड यांच्या मनांत साताऱ्च्या गादीचा अभिमान धरण्याचें कधीं आलें असें दिसत नाहीं. ते पेशव्यांच्या अमदानींत उदयास आले म्हणून त्यांस पेशवेच आपले धनी असें वाटे.

सर्व गोष्टींचा विचार करितां पेशवाई बुडविण्यास एकच जात किंवा एकच घराणें कारणीभूत झालें असें न म्हणतां इंग्रजी सत्तेचा पूर आला व त्यांत मराठी राज्यें वाहून गेलीं असेंच म्हणणें जास्त संयुक्तिक आहे.

३. व्यापारी धोरण चुकलें काय? मराठ्यांनीं इंग्रजांना व्यापाराची परवानगी दिली हीच चूक केली असेही म्हणणें समंजसपणाचें नाहीं. कारण त्यापूर्वी तागडीवाल्यांनीं तख्त बळकावल्याचें उदाहरण घडलेलें नव्हतें. वैश्यवृत्ति व क्षात्रवृत्ति ह्या वेगळ्या आहेत व त्यांची अदलाबदल होऊं शकत नाहीं असेंच त्यांस वाटत होतें. उलट पक्षीं ते आपल्या राज्यांत आले तर बरें असेंच मराठ्यांस वाटलें असावें. कारणः—

( १ ) स्वदेशीचा मंत्र त्यावेळीं त्यांस सुचला नाहीं. कारण तो विशेष आपत्तीच्या प्रसंगीं आठवतो.

( २ ) मनुष्य स्वभावतःच विलासप्रिय असतो. चैनीचे व विलासाचे पदार्थ मिळतील तेथून, आपपर भाव न ठेवतां, मनुष्य विकत घेतो.

( ३ ) स्वदेशी कारागिरीचें बीज व फैलाव होण्यास परकी व्यापाऱ्यांची मदत घेणें जरूर असतें.

( ४ ) व्यापारी पेशाचे इंग्रज पुढें राज्य बळकावतील असें भविष्यचित्र त्यांना दिसलें नव्हतें.

४. इंग्रजांची मदतः—दुसरी समजूत—मराठ्यांनीं इंग्रजांची मदत घेऊन त्यांचा हात आपल्या राजकारणांत शिरूं दिला ही मोठी चूक झाली. ह्या समजुतींत सत्याचा बराच अंश आहेः—

( १ ) संकटांत सांपडलेला मनुष्य आत्मसंरक्षणासाठीं परक्यांची मदत घेईल. पण मराठ्यांनीं आपल्या भांडणांत इंग्रजांची मदत आत्मसंरक्षणासाठीं घेतली नसून वैरबुद्धि व स्वार्थबुद्धि यांच्या प्रशमनार्थ घेतली. ही चूक पहिल्यानें राघोबानें केली नसून १७५५ सालीं नानासाहेबानें आंग्र्यांचा मोड करण्याकरितां केली. आंग्र्यांची दहशत गेल्यानें इंग्रजांना ह्यापुढें कोंकणपट्टीवर अनिरुद्ध संचार करतां येऊं लागला.

( २ ) स्वकीयांविरुद्ध इंग्रजांची मदत घेण्यापासून बहुधा कोणीच अलिप्त नव्हता. खुद्द नाना फडणविसानें देखील टिपूविरुद्ध किंवा शिंद्याविरुद्ध इंग्रजांची मदत घेतली.

( ३ ) इंग्रजांची यावेळची स्थितीच अशी होती कीं एतद्देशीय राजेरजवाड्यांनीं त्यांची मदत मागावी. कारणें (i) मराठे लोकांतील तंट. (ii) इंग्रजांजवळची कवायती फौज व युद्धसामग्री.

( ४ ) स्वकीयांविरुद्ध हिंदुस्थानांत मदत घेतली नाहीं इंग्रजांनीं. युरोपांतल्या कंपन्यांविरुद्ध फुटून किंवा बंड करून कोणीही युरोपीयन निघाला नाहीं. आपापसांत भांडून परक्यांची मदत घेतल्यामुळेंच हिंदी लोकांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. मदत घेणारांना अदूरदर्शी म्हणण्यापेक्षां अशी मदत घेणें परिस्थितीच्या मानानें योग्य होतें असेंच म्हणणें बरें. फक्त दोष हा कीं कित्येकांना मदत घेण्याचें कारण संपल्याबरोबर मदतनिसाला झाडून दूर टाकतां आलें नाहीं.

५. नाशाचीं खरीं कारणें:—राज्य जाण्याचीं खरीं कारणें दोनः—

( १ ) मराठ्यांमधील सवत्या सुभ्याची आवड, आणि जुटीचा, शिस्तीचा व राष्ट्राभिमानाचा अभाव.

( २ ) कवायती लष्कर व सुधारलेली युद्धसामग्री यांचा अभाव.

i इंग्रजांबरोबरच आपणा खेरीज इतर सरदारांचें वर्चस्व कमी झालें तर हवें— मग तें इंग्रजांच्या हातून घडून आल्यानें मधल्यामधें इंग्रज प्रबल झाले तरी तें चालेल—अशी प्रत्येक मराठा सरदाराच्या मनांत गुप्त भावना होती.

ii इंग्रज व्यापारांतून निघून राजकारणांत पडले ही गोष्ट १७६५ च्या सुमारासच मराठ्यांस दिसून आली होती. पण उतरणीवर उभें असतां भरला

गाडा अंगावर आलेला जसा सांवरून धरतां येत नाहीं, तसेंच मराठ्यांचें इंग्रजांसंबंधीं झालें.

iii मराठ्यांच्या मानानें इंग्रजांना राज्य मिळविण्याला कितीतरी अधिक अडचणी होत्याः–

( १ ) इंग्रजांना सर्व मुल्ख परका होता, मराठ्यांना तो खडान् खडा माहीत होता.

( २ ) इंग्रजांच्या फौजेंत शकडा विसांहून अधिक इंग्रज नव्हते.

( ३ ) या प्रचंड मुलुखांत सर्व मराठ्यांचें राज्य होतें. मराठे जर एकमतानें वागते, तर इंग्रजांचें नुसतें टपालही या मुलुखांतून फिरूं शकलें नसतें.

६. मध्यवर्ती सत्तेचा अभावः—

१. शिवाजीच्या वेळीं राज्य एकसत्तात्मक असून, अष्टप्रधान हे सल्ला देणारे जबाबदार कामगार होते.

२. बाहेर राज्यविस्तार होण्यास लागल्यामुळें सरंजामी सरदारकीची सुरवात झाली. मराठ्यांमधील आनुवंशिक दोन गुणः– ( i ) स्वातंत्र्यप्रियता ( ii ) वतनाची आवड. राजा तरतरीत, कर्तृत्ववान् व स्वाभिमानी असता, तर त्याला सरंजामी सरदारांच्या सत्तेला व अधिकारातिक्रमणाला आळा घालतां आला असता.

३. एक निव्वळ एकतंत्री राजसत्ता तरी चालते किंवा निव्वळ लोकप्रतिनिधिसत्ता तरी चालते. पण निव्वळ एकतंत्री प्रधानसत्ता कधींही चालूं शकत नाहीं. इकडे छत्रपतीचाही जोर नाहीं व तिकडे जतनेचाही जोर नाहीं अशा स्थितींत अगदीं निरुंद पायावर पेशव्यांच्या सत्तेची इमारत उभी होती.

याप्रमाणें शिवाजीच्या वेळीं जोरकस असलेली मध्यवर्ती सत्ता त्याच्या दुर्बल वंशजांच्या कारकीर्दींत पेशव्यांकडे, थोरल्या माधवरावाच्या पश्चात् नाना फडणविसाकडे, अशी पायरी पायरीनें उतरत जाऊन शेवटीं सरंजामी सरदारांत तिर्चीं शकलें शकलें होऊन ती निर्जीव व निःसत्व झाली.

पा० ५४ मुलाजा–दिक्कत, खातरजमा.

---

# ५. पंताची भूमिका व काव्यतुलना.

**रा० रा० ल० रा० पांगारकर**:-संतांचे ग्रंथ श्रद्धायुक्त अंतःकरणानें व पवित्र भावनेनें वाचले तरच त्यांतलें इंगित वाचकांच्या मनांत प्रवेश करूं शकतें. अशा रीतीनें विनीतत्वेषानें केलेल्या अभ्यासानें संतांच्या ग्रंथींचीं विलक्षण कोडीं तर उकलतातच, पण त्याबरोबरच तो दिवसेंदिवस वाचकास संतांचें निर्मळ अंतःकरण, पवित्र भावना व श्रद्धायुक्त आचरण हीं थोडीं थोडीं दिल्यावांचून राहत नाहीं. ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे रा० पांगारकर होत. ते चालवीत असलेला "मुमुक्षु" व त्यांनीं लिहिलेलीं संतचरित्रें यांवरूनच पांगारकरांची भूमिका दिसून येत आहे. संतांचे पायीं डोई ठेवून, त्यांच्या ग्रंथांच्या परिशीलनानें मानवदेहींचे दोष घालवावे व भगवद्भक्तीच्या रंगांत देहभान विसरावें हेंच त्यांचें ध्येय होय. ( सध्यांच्या भौतिक कालांतही असलें ध्येय पुढें ठेवणारा पुरुष वंद्य होय असें कोण म्हणणार नाहीं ? ) रा० पांगारकरांचीं संतचरित्रें फार गोड व भक्तिरसानें थबथबलेलीं आहेत.

१. एक महत्वाचा मुद्दा—अलीकडील कांहीं लोकांना तुलनात्मक यंत्रांतून पाहण्याची संवय झाली आहे. व कधीं कधीं अधिकार, हेतु, भाषापद्धति व विषयांची निवड ह्या चार महत्त्वाच्या बाबतींत ज्यांचें मुळींच साम्य नाहीं अशा कवींची त्यांकडून तुलना केली जाते. उदा० मोरोपंत व तुकाराम, रामदास.

२. ज्ञानेश्वरादि ईश्वरनिष्ठ पुरुषांचीं स्तवनें पंत फार भाविकपणें व विनयानें करितात. ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम असल्या मुक्त झालेल्या महात्म्यांशीं पंत, बाळक मातेशीं, तशी लगट करितात.

३. भगवद्भक्त म्हणून तुकोबा जर पंतांच्या वरचे आहेत, तर भाषा कमावणारे व शुद्ध व सरस बृहद्ग्रंथ प्रसवणारे कवि म्हणून पंतांची योग्यताही असामान्य होय.

**पंतांची भूमिकाः—**

स्वचित्तशुद्ध्यर्थ देवकथा व संतकथा गाव्या एवढाच मुख्य हेतु त्यांच्या काव्यरचनेच्या मुळाशीं आहे, व "वाङ्मन पूत कराया" त्यांनीं रामकृष्णादि अवतारांच्या, प्राचीन व अर्वाचीन संतांच्या व तीर्थांच्या कथा

वर्णिल्या आहेत. पंत इतके मार्मिक आहेत कीं 'संतस्तवनांत' त्यांनीं आपली साम्यता दोघांशीं मात्र सुचविली आहे. ते दोघे म्हणजे वामन व मुक्तेश्वर होत.

## मोरोपंत व वामन पंडितः—

( अ ) सादृश्यः—दोघेही जाडे पंडित होते, दोघेही संस्कृत भाषेत निष्णात होते व दोघांसही मराठी भाषेचा मोठा अभिमान होता. मराठी भाषेवर संस्कृतांतले अलंकार चढवून तिला अभियुक्तता आणण्याचें श्रेय दोघांसही आहे.

( आ ) वैसादृश्यः—( १ ) पंडितांचा भर अध्यात्मविषयावर. त्यांना अध्यात्मविद्येची फार गोडी असल्यामुळें ते वर्ण्य विषयाशीं तादात्म्य पावतात. अध्यात्मपर पंतांचा एकही ग्रंथ नाहीं.

( २ ) सुसंगत कथानकें वर्णन करितांना स्वभाववैचित्र्य पंतांना जसें दाखवितां येतें तसें तें पंडितांना येत नाहीं.

( ३ ) पंडित न्यायमीमांसादि शास्त्रांत निपुण, तर पंत साहित्यशास्त्रांत निपुण होते.

( ४ ) अत्यंत कोमल कल्पनांशीं पंत खेळत, तसे वेदांत विचारांशीं पंडित खेळत.

( ५ ) पंतांनीं भाषेच्या ठाकठिकीकडे लक्ष दिलें, पंडितांनीं दिलें नाहीं.

( ६ ) भाषांतर करण्यांत पंडितांचा हात धरणारा कोणीही नाहीं.

( ७ ) रसिकतेचा उत्कर्ष जसा पंतांत दिसतो, तसा पांडित्याचा उत्कर्ष पंडितांत दिसतो.

पंतांनीं वामनाविषयीं जागोजाग प्रेमोद्गार काढिले आहेत. 'श्रीपतिभक्तिरसज्ञ,' 'श्रीपतिभक्तोत्तम,' 'बहुतजन्मसिद्ध' वगैरे विशेषणें त्यांनीं पंडितांस लाविलीं आहेत.

**मोरोपंत व मुक्तेश्वरः—**

१. मुक्तेश्वरी भारताच्या स्वरूपाहून मोरोपंती भारताचें स्वरूप भिन्न आहे. मोरोपंत भारतीय काळांत जितके डुबून जातात, तितके मुक्तेश्वर जात नाहींत. मुक्तेश्वरांत कालविपर्यासाचा दोष बरेच वेळां आढळतो.

२. मुक्तेश्वरी भारतांत राष्ट्रीय नीतितत्त्वें विखुरलीं आहेत, मोरोपंती भारतांत कौटुंबिक नीतितत्त्वें पसरलीं आहेत. मराठींतल्या सर्व भारत-ग्रंथांत मुक्तेश्वरी भारतच सर्व प्रकारें श्रेष्ठ आहे.

३. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची नदी "खळखळाट वाहविली" आहे. पंतांनीं दुतर्फा मनोहर घाट बांधून, व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही तीरांमधून अचूक सोडून दिला आहे.

४. तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां "दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः" ह्या दुष्यन्ताच्या उक्तीचें स्मरण होतें.

पा० ८६ मुमुक्षा—मुक्त होण्याची उत्कट इच्छा.

पा० ९० वाङ्मन पूत कराया—वाचा व मन हीं शुद्ध करण्याकरितां.

पा० ९५ ओज—तेजस्विता, पाणी.

पा० १०० कालविपर्यास—एकाकालीं घडलेल्या गोष्टी दुसऱ्या कालीं घडल्या असें दाखविणें.

पा० १०३ दूरीकृताः खलु इ०:-शकुन्तला व तिच्या सख्या ह्यांस प्रथम पाहिल्यावर ही दुष्यन्ताची उक्ति आहे. तिचा पूर्वार्ध असाः—"शुद्धान्तदुर्लभमिदं वपुराश्रमवासिनो यदि जनस्य." आश्रमांतल्या या कन्यकांचें स्वरूप ज्या अर्थी इतकें मनोहर आहे त्या अर्थी वनांतल्या लतांनीं बागेतल्या लतांवर ताण केली असेंच म्हणावयाचें ! रा० पांगारकरांचा अर्थ-मुक्तेश्वराची कविता जरी खेडवळ व साधीभोळी असली तरी पंतांच्या ठाकठीक कवितेपेक्षां ती सरस होय.

---

# ६. विरोळ्यानें काय शिकविलें ?

**कै० प्रो० पटवर्धनः**—कांहीं विद्वानांच्या बाबतींत असें आढळून येतें कीं त्यांनीं परभाषेचा किती जरी अभ्यास केला, तरी सामान्य जनांप्रमाणें ते स्वभाषेला विसरून जात नाहींत. उलट परभाषेची व स्वभाषेची तुलना करून स्वभाषेंतील न्यूनें भरून काढून तिला परभाषेच्या तोडीला नेऊन बसविण्याचा ते यत्न करितात. प्रो० पटवर्धन हे सुधारक होते हें ह्या लेखावरूनच दिसून येत आहे. आपल्या समाजांतील जुलूम व वेडगळ चालीरीति जरी त्यांना नको असल्या, तरी कांहीं सुधारकांप्रमाणें त्या चालीरीतींबरोबर बिचाऱ्या मराठी भाषेचा तिटकारा त्यांना कधींच आला नाहीं. त्यांचा मराठीचा अभ्यास काळजीपूर्वक झालेला असून ज्ञानेश्वरासारख्या प्राचीन कवींचे तर त्यांनीं मनःपूर्वक परिशीलन केलें होतें. त्यांच्या भाषेवरील अधिकारानुरूप ते विश्वविद्यालयाच्या एम्. ए. च्या परीक्षेस परीक्षक नेमले गेले होते.

**विरोळ्यानें काय शिकविलें ?—**

१. पांच सात दिवस पाऊस पडत राहिल्यामुळें मुठा नदीला पूर आला असतां आम्ही मजा पाहण्यासाठीं बंडावर गेलों होतों. एका विरोळ्याची व नदीच्या लाटांची झटापट आम्हांस दिसली.

२. त्यावरून आम्हांस सुचलेले विचार—सृष्टीचा तरी काय न्याय ? एवढासा जीव एवढ्या प्रचंड कल्होळांत सृष्टीनें कां आणून सोडावा ? विरोळ्याचा अपराध म्हणावा, तर धरणीकंप, ज्वालामुखी पर्वत, समुद्रांतील वादळें हे निसर्गाचे संचार कोणाच्या अपराधामुळें घडतात ?

३. जलौघाच्या झपाट्यांत झगडत राहून तींत प्राणाची आहुति देणाऱ्या विरोळ्याचा शेवट पाहून मनांत आलेले विचारः—

( i ) सृष्टीचे आविर्भाव पाहिले म्हणजे तिच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो व आपल्या क्षुद्रपणाचें भान होतें.

( ii ) पण याहीपेक्षां खोल व मनुष्य स्वभावाला अत्यंत निकट असे विचार सुचतात ते हेः—या विरोळ्याप्रमाणेंच हजारों मानवी जीव हजारों वर्षांच्या

सांचत आलेल्या देवाच्या, धर्माच्या व पवित्रतेच्या भेसूर संमर्दापुढें तडफडत आहेत. विरोळ्यानें आपल्या जन्माचें सार्थक केलें. आम्हांसारख्या हताश सुधारकांस प्राणान्तिक प्रयत्नांचें आणि आजन्म उद्योगाचें उदाहरण घालून दिलें. आमची आम्हांला ऐकूं न येणारी आजची कुई सगळया जगाला खडबडून जागें करणारी विश्वगर्जना झाली पाहिजे. समाजांत चालत आलेले जुलूम व्यक्तींच्या अपराधामुळें किंवा सृष्टीच्या अवकृपेमुळें आलेले नसून आपणच ते आणलेले आहेत. जुलूम व अन्याय यांशीं झगडणें आपलें काम. रूढीच्या अनावर लोंढ्यांत आपण सांपडून विरोळ्याप्रमाणेंच कदाचित् नामशेष होऊं. परंतु मागून येणारांस वाट तरी करून ठेवूं. हाच विरोळ्यानें आपणांस शिकविलेला धडा होय.

पा० १०९ सृष्टिप्रकोप—सृष्टीच्या क्रमांत आढळून येणारे रागाचे अविर्भाव.

पा० ११० हे निसर्गाचे संचार अनंत व अगाध आहेत—तुफानें, भूकंप, ज्वालामुखी इत्यादींच्या रूपानें दिसून येणाऱ्या सृष्टींतील हालचाली अमुकच स्थळीं किंवा अमुकच काळीं घडतात असें नाहीं; व त्या कां घडतात, कोणाकडून घडविल्या जातात ह्यांविषयीं जों जों अधिक खोल विचार करूं लागावें तों तों त्या अधिक गूढ वाटूं लागतात.

पा० १११ हैदोस—नाच, अकांडतांडव.

पा० ११३ संमर्द—समुदाय, त्यावरून लोंढा, एक मोठी अडचण.

पा० ११५ निर्घृण—( निर्—नाहीं+घृणा–दया ) निर्दय, निष्ठुर.

---

# ७. सुभाषित, कोटी व विनोद.

## सुभाषितः—

१. सुभाषित या शब्दाचा योगिकार्थ व रूढार्थ ह्यांवरून निश्चित अर्थबोध मुळींच होत नाहीं. सुभाषितरत्नभांडारांत नुसता पद्यांचा संग्रह आहे. सुभाषित पद्यच असलें पाहिजे अशी त्यांची समजूत दिसते. संस्कृत

भाषेंत काव्य, नाटकें, कादंबरी वगैरेमध्यें सुद्धां सुभाषिताची योग्य व्याप्ति ठरविण्यास जागा नाहीं.

२. सुभाषिताची पृथक्करणाच्या रीतीनें व्याख्या:—सु–चांगलें, सुखोत्पादक किंवा आनंददायक. ' केवळ सुख किंवा आनंद देणारा शब्दप्रबंध म्हणजे सुभाषित ' असेंच जर आपण म्हणूं लागलों, तर तो निखालस अप्रयोजकपणा होय. आनंद मुख्यतः दोन तीन प्रकारांनीं होऊं शकतो:—(i) मनोविकारांचें समाधान (ii) कल्पनाशक्तीचें समाधान (iii) बुद्धीचें समाधान. परंतु तिन्ही प्रकारचें समाधान देणाऱ्या वचनांस सुभाषित म्हणतां येतेंच असें नाहीं.

३. शब्द चमत्कृति हा सुभाषिताचा आत्मा नसून, तो आत्मा म्हणजे अर्थचमत्कृति हा होय. खरी अर्थचमत्कृति ओळखणें मनुष्याच्या सहृदयत्वावरच अवलंबून आहे.

**कोटी व विनोद:—**

१ विनोद शब्दाचा धात्वर्थ—" हांकून देणारा " अर्थात् शब्द बनविणाराचे मनांत " काळजी घालवून देऊन आनंदमय भावाची जागृति करणें. "

२. विनोदानें येणारें हास्य व साधें हास्य हीं भिन्न असतात. पहिल्यामध्यें मनःसंस्कृतीचा परिणाम दिसून येतो, दुसऱ्यांत तो दिसून येत नाहीं. ज्या मनोभावांचा परिणाम विनोदी हास्य हा होय, त्या मनोभावांत कोमलता असते, तीव्रता नसते. विनोदी हास्य ऐकतांच त्या हांसणाऱ्याच्या मनांत शांतता, खेळकरपणा, आनंद, सहिष्णुता, सात्विकपणा इत्यादि भाव वसत आहेत अशी ऐकणाराच्या मनाची खात्री होते.

३. विनोदी मनुष्याची वस्तुस्थितीकडे पाहण्याची रीति एकच नसते; व ह्यामुळें एकाच वस्तुस्थितीचे निरनिराळे भाग त्याच्या दृष्टीस पडून, त्याच वस्तूच्या निरनिराळ्या परंतु सर्वस्त्रीं खऱ्या स्वरूपाची त्यास प्रतीति होते. तीव्र मनोवृत्तींच्या व विनोदी मनोवृत्तींच्या मनुष्यांत फरक–दोघांसही परिस्थिति एकच, व तिजपासून होणारें हिताहित दोघांसही सारखेंच. परंतु एकजण आपल्या मनोविकारांच्या तीव्रतेनें करपून जातो, व दुसरा आपल्या मनोविकारांच्या स्निग्धतेमुळें सुरक्षित राहतो.

४. हास्यास्पद व हास्योत्पादक ह्या दोन भिन्न स्थिति. हास्यास्पद गोष्टींमध्यें एक प्रकारचा वाईटपणा किंवा कमीपणा असतो, परंतु हास्योत्पादक गोष्टींत तसा वाईटपणा असत नाहीं. एकाच गोष्टीस हास्यास्पद व हास्योत्पादक अशीं दोन अंगें असूं शकतात. तीव्र मनोवृत्तींचीं माणसें तिच्या हास्यास्पद अंगाकडे पाहतात, परंतु विनोदी माणसें फक्त हास्योत्पादक अंगाकडे पाहतात.

५. विनोदी मनुष्य खरा परोपकारकर्ता होय. तो स्वतः जरी एखादे वेळीं दुःखी, कष्टी अगर उदासवाणा असला, तरी तो आपलेंच दुःख उगाळीत न बसतां आपल्या विनोदशक्तीनें दुसऱ्यांवर उपकार करतो. उदा० कार्लेनीची गोष्ट.

६. विनोदवचन हें कोटी किंवा चतुरालाप याप्रमाणें बहुधा थोडक्या शब्दांत संग्रहीत करतां येत नाहीं. मात्र शब्दरचना विस्तृत असली, तरी तींत एक प्रकारचें औचित्य हें असतेंच. किंबहुना जितका शब्दविस्तार जास्त तितका विनोद अधिक खुलेल.

पा० ११८ यौगिकार्थ—शास्त्रसिद्ध अर्थ, मूळचा अर्थ.
रूढार्थ—प्रचारांत असलेला अर्थ.

पा० ११९ अव्याप्तिदोष—( अ—नाहीं. व्यापावयास पाहिजे तेवढी जागा न व्यापणारी ) जेव्हां वर्ण्य वस्तूच्या व्याख्येंत किंवा कल्पनेंत तिच्या सर्वांगांचा समावेश होत नाहीं तेव्हां तो अव्याप्तिदोष होय.

अतिव्याप्तिदोष—( अति—फाजील. वाजवीपेक्षां फाजील जागा व्यापणारी ) जेव्हां वर्ण्य वस्तूच्या व्याख्येंत किंवा कल्पनेंत अवर्ण्य वस्तूंचाही समावेश होऊं लागतो तेव्हां अतिव्याप्तिदोष घडतो.

---

## ८. सृष्टिसुंदरीची दिवाळी.

**राव० वि० मो० महाजनि:**—राव० महाजनींसारख्या जाड्या विद्वानाचा लोकांना परिचय करून द्यावयाचा म्हणजे प्रत्यक्ष सूर्याकडे बोट दाखवून हा सूर्य असें जाहीर करण्यासारखें आहे. महाजनींची विद्वत्ता कोणता महा-

राष्ट्रीय जाणत नाहीं ? त्यांचें मराठी भाषेवर अस्खलित प्रभुत्व असून त्यांनीं शेक्सपीयरच्या कांहीं नाटकांचें मराठींत भाषांतर केलें आहे. त्यांची कवित्वशक्तीही प्रगल्भ असून त्यांच्या छोट्या छोट्या पुष्कळ कविता प्रसिद्ध आहेत. मग सदरहू लेखांत त्यांनीं वर्णन केलेल्या सृष्टिसौंदर्याचें चित्र वाचकांच्या मनःचक्षूंपुढें मूर्तिमंत उभें राहिलें तर त्यांत नवल काय ?

१. शरदृतूचा एक महिना बहुतेक संपत आल्यावर बाह्यसृष्टींत व मनुष्येतर जीवसृष्टींत जिकडे तिकडे आनंदी आनंद होऊन जातो.

२. अशा रमणीय व शांत ऋतूंत दिवाळीचा सण आपल्या महात्म्या पूर्वजांनीं घालून ठेविला आहे. जेव्हां बाह्यसृष्टींत व मनुष्येतर जीवसृष्टींत प्रसन्नता व शांति नांदते, तेव्हां मनुष्यानेंही आपल्या चित्तांत प्रसन्नता व शांति धरावी असा त्यांचा उदात्त विचार असावासें दिसतें.

३. दिवाळीच्या सणाचें स्वरूप—शांति राहण्याला—(i) घरांत स्वच्छता पाहिजे, म्हणून झाडणें, सारवणें, रांगोळ्या घालणें हीं आलीं. (ii) घरांत जशी स्वच्छता तशी देहांतहीं असावी म्हणून नरकचतुर्दशी आली, व सुगंधी उटणीं तेलें व अभ्यंगस्नान ह्यांचा प्रघात पडला. (iii) व्यवसायांत होणाऱ्या अश्रांत परिश्रमाचा परिहार होण्याकरितां चार दिवस खेळीमेळींत गेले पाहिजेत.

४. महाराष्ट्रांत भाऊबीजेचें माहात्म्य.

पा० १३७ वरोळा, वरोळी—शेताच्या हद्दीच्या जागीं घातलेला बांध.

हुंदडणें—शिंगानें किंवा डोक्यानें हिसडा मारणें.

पा० १३९ अभ्यंगस्नान—तेल, उटणें वगैरे लावून व्यवस्थितपणें केलेलें स्नान.

पा० १४० उर्वरित—शेष; शिल्लक राहिलेली.

---

## ९. प्रतिभा.

“ **काव्य व काव्योदयः** ”—ह्या पुस्तकांत प्रो० पटवर्धनांनीं काव्य म्हणजे काय, त्याचीं निरनिराळीं अंगें कोणतीं, तें उत्पन्न होण्यास कोणत्या गोष्टींची जरुरी आहे, ह्यांचें सांगोपांग विवरण केलें आहे. ह्या विषयावर

इंग्रजी भाषेंत पुष्कळ ग्रंथ आहेत, पण आपल्या भाषेंतील हा पहिलाच होय. केवळ वृत्तांत संकलित केलेल्या शब्दसमूहास काव्य समजणाऱ्या विद्वानांनीं ह्या पुस्तकाचें सूक्ष्मावलोकन केल्यास त्यांस सहज कळून येणार आहे कीं खरें काव्य असें वाटेवर पडलेलें नाहीं.

( अ ) प्रतिभा म्हणजे काय व ती कशी असते ? प्रतिभा ओळखतां येते, पण सांगतां येत नाहीं.

( आ ) काव्यशक्ति व बुद्धि हीं मानवाच्या मनाचीं भिन्नांगें आहेत. प्रतिभा हें काव्य-शक्तीचें एक महत्वाचें अंग आहे. प्रतिभा म्हणजे आन्तर-बाह्य विषयांच्या मनोमय छाया हव्या तेव्हां हव्या तितक्या ठळक आणि सगुणसदृश उठविण्याची शक्ति होय. प्रतिभेचीं मुख्य लक्षणें:-

( १ ) कवीचीं ज्ञानेंद्रियें व हृत्पट हीं तीव्र आणि मृदु असावीं लागतात. बाह्य विषयांचे संदेश स्पष्ट व त्वरेनें मनोराजाकडे नेणारीं ज्ञानेंद्रियें, आणि या संदेशांचे ठसे जिवंत उठतील असा हृत्पट.

( २ ) हे संदेशांचे ठसे मनाच्या स्मृतीच्या कपाटांत सांठवून ठेवणें आणि जरूर लागेल तेव्हां त्यांस कामाला हजर करणें ही त्याच्या पुढची पायरी होय.

( ३ ) बाह्यसृष्टीप्रमाणेंच अंतःसृष्टींतील प्रसंग आणि घडामोडी सांठवून ठेवून त्यांचे ठळक व सुसंवेद्य चित्र उठविणें. बाह्यसृष्टीचें चित्र देणाऱ्या प्रतिभे-पेक्षां अंतःसृष्टीचें हुबेहुब चित्र देणारी प्रतिभा अधिक प्रतिष्ठेची होय.

( ४ ) परचित्त प्रवेश—स्वतःच्या अनुभवाच्या आणि आंतर संवेदनांच्या साहाय्यानें कोणत्याही स्वेतर प्रकृतीच्या अनुभवाचे प्रत्यय घेणें.

( ५ ) परिचयानें नष्ट केलेलें कौतुक परत आणण्याचें सामर्थ्य तिला असलें पाहिजे.

( ६ ) जें-आहे किंवा होतें तें आहेसें करण्यापेक्षां, जें नाहीं किंवा नव्हतें तें आहेसें करण्याचें अघटित घटना सामर्थ्य कवीच्या प्रतिभेंत असतें. नसत्यास असतें आणि असत्याचें नसतें करणें ही कवीची अपूर्व शक्ति आहे. कवीच्या प्रतिभेचा विकास होतां होतां ती या पदवीस पोंचली म्हणजे ती स्वतंत्र, स्वयंभू व स्वयंप्रकाशी होते.

(इ) प्रतिभा म्हणजे काव्य नव्हे. काव्याचा जन्म होण्यास लागणाऱ्या अनेक शक्तीपैकीं ती एक आहे. तिचा विकास झाल्याशिवाय, अभ्यासानें ती वाढविल्याशिवाय, तशाच प्रसंगांनीं तिला हालवून जागें केल्याशिवाय, काव्य-निष्पत्ति होणें नाहीं.

(ई) प्रतिभेनें उत्पन्न केलेल्या काव्याच्या जीवाला देहाची जरूर ही आहेच. मनामध्यें तयार झालेलें निर्गुण काव्य अनुरूप शब्दांत ग्रथित केल्या-शिवाय तें जगाला दिसणार नाहीं, किंवा ऐकूं येणार नाहीं.

पा० १४१ परपुष्टपणा—उसन्या गोष्टींवर अवलंबून असण्याचा गुण.

पा० १४७ निसर्गाविर्भाव—सृष्टींत घडून येणारे निरनिराळे प्रसंग व घडामोडी.

---

# १०. गोकुळ विसरभोळा.

**कै० रा० ग० गडकरी**:—ज्याच्या अकालिक निधनानें सारा महाराष्ट्र हळहळला त्या प्रसिद्ध लेखकाची महाराष्ट्रीयांस ओळख कशाला करून द्यावयाला पाहिजे ? गडकरी या नांवानें नाटककार म्हणून, गोविंदाग्रज या नांवानें कवि म्हणून व बालकराम या नांवानें विनोदी लेखक म्हणून कै० गडकऱ्यांचा महिमा आज चहूंकडे दुमदुमत आहे. रा. गडकऱ्यांचीं नाटकें रचनाचातुर्य, स्वभाव परिपोष, भाषाशैली वगैरे सर्व अंगांनीं अगदीं परिपूर्ण आहेत. हल्लीं मराठींत नाटककार म्हणून मिरविणाऱ्या बऱ्याच लेखकांच्या नाटकांची व रा. गडकरी यांच्या नाटकांची तुलना करूं गेल्यास "कहां राजा भोज और कहां गंगा तेली" ह्या म्हणीची सार्थकता पटल्याशिवाय राहणार नाहीं. तीच गोष्ट गोविंदाग्रजांच्या काव्याची होय. गोविंदाग्रजांची प्रतिभा त्यांच्या काव्यांत इतकी चमकते, त्यांची कल्पनाशक्ति इतकी प्रगल्भ आहे, व नसत्याचें असतें व असत्याचें नसतें करण्याची शक्ति त्यांच्या ठायीं इतकी मुसमुसलेली दिसते कीं त्यांचें काव्य वाचत असतांना वाचकाचें वर्ण्य विषयाशीं तादात्म्यच होऊन जातें. विनोदांत तर गडकऱ्यांसारखे मराठी लेखकांत गडकरीच होत. त्यांचे विनोद प्रसंग वाचक एकटाच वाचत असला तरीही तो पोट धरधरून हांसल्याशिवाय राहात नाहीं.

“ **प्रेमसंन्यास** ”:—हें कै० गडकरी ह्यांचें अगदीं पहिलें गद्य नाटक. ह्यांत बालविधवांच्या दारुण स्थितीचें करुणास्पद चित्र रेखाटलें असून विधवा-विवाहाची तरफदारी केली आहे. लीलाजयंतांचा विवाह घडून नाहींच आला. परंतु लीलेच्या मरणानंतर, लीलेच्याच आज्ञेप्रमाणें जयंतानें त्या बाबतींत समाजाची कानउघाडणी करण्याकरितां प्रेमसंन्यास केला आहे. गडकऱ्यांचीं दुसरीं सामाजिक नाटकें ‘ पुण्यप्रभाव ’ ‘ एकच प्याला, ’ व ‘ भावबंधन ’ हीं होत. त्यांचें ऐतिहासिक नाटक ‘ राजसंन्यास ’ आपल्या अपूर्ण स्थितींतही जर वाचकांस इतकें वेडावून सोडीत आहे, तर तें पूर्ण झालें असतें तर वाचक त्याला डोक्यावर घेऊन नाचले असते ह्यांत संशय नाहीं.

**जज्जासमोर गोकुळ विसरभोळाः**—गोकुळ विसरभोळा हें गडकऱ्यांचें प्रेमसंन्यासां’तील विनोदी पात्र आहे. त्याच्या प्रत्येक कृतीनें व उक्तीनें वाचकांस अनावर हांसूं लोटतें. कचेरींत त्यानें वकिलास व न्यायाधिशास दिलेलीं प्रश्नोत्तरें, व त्याला नालायक ठरविल्यावर “ शाहाण्यानें कोर्टाची पायरी चढूं नये म्हणून वाडवडील म्हणत आले तें कांहीं खोटें नाहीं ” असा त्यानें दिलेला अभिप्राय हीं कोणास हांसें आणल्याशिवाय राहतील ? शिक्षकांनीं प्रेमसंन्यासांतील गोकुळचे दुसरे प्रसंग, त्याचप्रमाणें एकच प्याल्यांतील तळिरामाच्या मरणाचा प्रसंग, भावबंधनांतील कामण्णाचे प्रसंग, व राजसंन्यासांतील जिवबा व देहू यांचें संभाषण हीं विद्यार्थ्यांस वाचून दाखवून कै. गडकऱ्यांच्या अप्रतिम विनोदाचा त्यांना चांगला परिचय करून द्यावा.

पा० १६७ टांक मोडून टाकतात—ज्या टांकानें आरोपीला देहान्त शिक्षा दिली, तो टांक मोडून टाकण्याचा प्रघात आहे.

---

# ११. प्रि० आगरकरांचें अल्पचरित्र.

## ( अ ) चरित्राचा पहिला भागः—

१. सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडापासून दोन मैलांवर टेंभू नांवाचें लहानसें खेडें आहे. तेथें सन १८५६ सालीं गोपाळरावजींचें जन्म झालें. अगदीं लहानपणींच आईबापांचें छत्र सोडून त्यांस कऱ्हाडास आपल्या मामांकडे राहावें लागलें,

व बारावर्षांच्या वयापर्यंत कऱ्हाडासच त्यांचा सगळा मराठी व इंग्रजी तीन इयत्तां-इतका अभ्यास झाला.

२. पुढील अभ्यासाचें साधन कऱ्हाडास नव्हतें. म्हणून त्यांनीं कऱ्हाड सोडून रत्नागिरीस त्यांचे एक आप्त होते त्यांचा आश्रय मिळेल या आशेनें तिकडचा रस्ता धरला. तेथें दोन वर्षें काढल्यावर बिकट परिस्थितीमुळें त्यांस रत्नागिरी सोडावी लागली.

३. ते परत कऱ्हाडास आले. शिकण्यास शाळा नाहीं, साधन नाहीं. तेव्हां त्यांनीं तेथील दवाखान्यांत कांपौंडरची नोकरी धरली.

४. पुढें ते अकोल्यास गेले व तेथील हायस्कुलांतून १८७५ सालीं प्रवेश-परीक्षा पास होऊन ते अकोला सोडून पुण्यास आले.

## ( आ ) चरित्राचा दुसरा भागः—

१. डेक्कन कॉलेजांत उत्तम मराठी लिहिणारास स्कॉलरशिप होती, ती यांना मिळाली; व पुढें दुसऱ्याही स्कॉलरशिपा मिळून कॉलेजक्रमास बरीच मदत झाली.

२. बी. ए. चा अभ्यास करीत असतां त्यांचें लग्न झालें.

३. १८७८ सालीं बी. ए. ची परीक्षा पास होऊन ते फेलो झाले.

४. न्यू इंग्लिश स्कूलचा जन्म. न्यू इंग्लिश स्कुलांत शिरल्यापासून त्यांचा सार्वजनिक खात्यांत प्रवेश झाला; लवकरच केसरीचें चालकत्व त्यांचेकडे आलें.

५. कोल्हापूर प्रकरण. डोंगरीच्या तुरुंगांत त्यांस १०१ दिवस काढावे लागले.

## ( इ ) चरित्राचा तिसरा भागः—

१. १८८८ सालापासून त्यांना आपल्या नांवावरच जगापुढें यावें लागलें. जिकडे तिकडे निंद्य, तिरस्करणीय झालेल्या सुधारणेचे ते कट्टे भक्त. सुधारकाचा अवतार, व तेव्हांपासूनच त्यांचा खरा प्रांत व त्यांचें खरें काम त्यांना मिळालें.

२. महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनाचें महत्कार्य घडवून आणणाऱ्या ऐतिहासिक पुरुषांत गोपाळरावजींस श्रेष्ठ मान देणें अवश्य आहे. त्यांच्या नांवावांचून महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचें एक पानही लिहितां येणार नाहीं.

३. त्यांचे हातून झालेली महाराष्ट्र भाषेची सेवा. आमच्या महाराष्ट्रांत आपल्या लेखणीच्या प्रखर विद्युच्छक्तीनें जीवचेतना ओतणारे धन्वंतरी जर आजपर्यंत कोणी झाले असतील तर कै० चिपळूणकर शास्त्री, व त्यांच्या मागें कै० आगरकर होत यांत संशय नाहीं.

पा० १७४ कहाली---आग, तळमळ.

पा० १७८ पलिस्तर---फोड आणणारें औषध.

---

## १२. कालाची विशालता.

**रा० रा० शि० म० परांजपे**:---ज्यांनीं कित्येक वर्षेंपर्यंत 'काळ' वर्तमानपत्र चालवून राजकीय बाबतींत देशाची, व वाङ्मयाच्या बाबतींत महाराष्ट्र भाषेची पुष्कळ सेवा केली तेच हे परांजपे होत. ते हल्लीं 'स्वराज्य' पत्राचे संपादक असून प्रसंगविशेषीं ते व्याख्यानेंही देतांना आढळतात. त्यांच्या लेखनाची व वक्तृत्वाची खुबी ही कीं त्यांचा ओघ एकदां सुरू झाला म्हणजे तो असा खळखळाट वाहूं लागतो कीं वाचक व श्रोते आपलें देहभान विसरून जातात, व तो ओघ थांवल्यावर त्याच्या खळखळाटाबद्दल आश्चर्य व तो थांबल्याबद्दल खेद होतो. फर्डे लेखक व अस्खलित वक्ते म्हणून यांची ख्याति आहे.

१. पूर्वी, पुढें व हल्लीं इत्यादि व्यवहार जे आपण नेहमीं करितों, त्या सर्वाला आधारभूत जी कांहीं कल्पना, तिलाच आपण काळ असें म्हणतों. तो प्रत्यक्ष जरी दिसत नसला तरी अनुमानानें सिद्ध करितां येतो.

२. कालाचें स्वरूपः---कालाचें स्वरूप भव्य, उदात्त, गंभीर व अतर्क्य आहेः--

( i ) काळाला आदि, अंत हे मुळींच नाहींत. त्याचा कांहीं भाग मात्र जाणतां येतो.

( ii ) परमेश्वराप्रमाणेंच काळ आदि व अंत ह्यांनीं विरहित असल्यामुळें, परंपरेनें ह्याच्याही अंगांत पुष्कळ शक्तींचा समावेश झालेला आहे.

( iii ) वास्तविक पाहतां उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तिहींना ह्याच कारणीभूत आहे.

( iv ) हजारों वर्षांनंतरचाही पृथ्वीच्या पृष्ठभागावरील राष्ट्रांचा नकाशा ह्यानें कुशल चिताऱ्याप्रमाणें सर्व रंगवून तयार केलेला आहे.

पा० १८५ उपाधिभूत—मुख्य कारणाच्या खालोखाल त्याला साहाय्य करणारें दुसरें कारण.

पा० १८८ हिरवा, पिवळा इ०—नकाशांत निरनिराळे रंग निरनिराळ्या राष्ट्रांच्या सत्तेखालीं असलेला मुलूख दाखवितात. हजारों वर्षांनीं कोणत्या राष्ट्राच्या सत्तेखालीं कोणता देश जाणार हेंही कालानें ठरवून ठेविलें आहे.

---

# १३. शंकर.

शंकर हें एक ताज्या दमाच्या, कर्तव्यास जागृत असलेल्या, होतकरू सुधारकाचें शब्दचित्र प्रो० पटवर्धनांनीं रंगविलें आहे.

१. कडकडीत वैदिक ब्राह्मणाच्या घरांत त्यास बांधल्यासारखें होत असे, व म्हणून तो होतां होईतों आपला काळ बाहेर काढीत असे. बाहेर खुल्या माळावर सभोंवारचा दृक्प्रान्त विशाल, डोक्यावरचें आकाशमंडल विशाल, त्यांचा अंत पाहण्यास इतस्ततः फिरणारें मन विशाल, मग त्यायोगें उद्भूत होणारे विचारही विशाल असतात.

२. समाजांत जिकडे तिकडे अपरंपार रान माजलें आहे, उकिरडे वाढले आहेत. हें रान तोडून टाकणें व उकिरड्यांची वाट लावणें हे तरुण पिढीचें काम आहे. "कामाला लाग" अशी वाणी चोहोंकडून ऐकूं येत असतां, संसारांत—स्वतांच्या खासगी प्रपंचांत गुरफटून जाऊन या सर्वसंचारी वाणी-कडे दुर्लक्ष्य करणें महत्पातक आहे असें त्याला वाटत आहे.

३. गणितांतल्या सांखळीप्रमाणें आपलें वागणें कांहीं ठराविक नियमांनीं किंवा तत्त्वांनीं बांधलेलें असलें, म्हणजे कितीही मोठे प्रसंग जरी परीक्षा घ्याव-यास आले तरी त्यांचें कांहीं मोठेंसें भय नाहीं. किंबहुना जितक्या परीक्षा जास्ती तितकी तयारी सरस. "जिकडे दिनमणि मी तिकडे । आज कालच्या सरें पुढें" हें ध्येय प्रत्येकानें समोर ठेवलें म्हणजे कशाचेंही भय बाळगण्याचें कारण नाहीं असें त्याचें मत आहे.

पा० १९८ आत्मनिरपेक्ष—(आत्म-स्वतः + निर्—नाहीं + अपेक्षा—इच्छा) स्वतःच्या सुखाची कोणत्याही प्रकारची इच्छा न बाळगणारा; स्वतःच्या सुखा-कडे दुर्लक्ष्य करणारा.

पा० २०३ अळता—लाखेचा तांबडा रंग.

---